






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंडळ पुरस्कृत )

 



प्रकाशन-दिनांक
५ डिसेंबर, १९६८

वर्ष ४२ : अंक १६६
जुलै-सप्टेंबर १९६८

संपादक
के. नारायण काळे

महाराष्ट्र-साहित्य-परिषद : पुणे २

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ४३ अंक १६६ १९६८

★

## या अंकात

★



★

अनुक्रमणिका







# महाराष्ट्र साहित्य परिषद प्रकाशने

..................

| | | |
|---|---|---|
| १ | मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभावअखेर )<br>● कै. बा. अ. भिडे ● | |
| २ | महाराष्ट्र साहित्य-परिषद इतिहास<br>● द. वा. पोतदार ● | |
| ३ | संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुती ( द्वितीयावृत्ती )<br>● गं. बा. सरदार ● | ३ रु. |
| ४ | द्रौपदी स्वयंवर ( अवचितसुतकाशीकृत )<br>● कै. वा. दा. गोखले ● | ५ रु. |
| ५ | शास्त्रीय परिभाषा कोश<br>● आपटे-जोशी ● | ६ रु. |
| ६ | साहित्य समीर ( गद्य-पद्यवेचे ) | २॥ रु. |
| ७ | साहित्य-प्रासाद ( गद्यवेचे ) | २॥ रु. |
| ८ | साहित्य-कलश ( पद्यवेचे ) | ३ रु. |
| ९ | साहित्य-चिंतामणी ( गद्यवेचे ) | ३ रु. |
| १० | साहित्य-पराग ( पद्यवेचे ) | २॥ रु. |
| ११ | लेखनविषयक नियम ( महामंडळाचे ) | २० पैसे |
| १२ | मराठी वाङ्मयाचा इतिहास ( खंड ४ )<br>● संपादक : रा. श्री. जोग ● | १५ रु. |

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

[ महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृतिमंडळ पुरस्कृत ]

वर्ष ४३ अंक १६६ १९६८

# संपादकीय

## व्याख्याने आणि त्यांचे वृत्तान्त

विचारविनिमयाच्या सार्वजनिक साधनात व्याख्यानांना महत्त्वाचे स्थान आहे. वक्ता आणि श्रोता यांच्या प्रत्यक्ष साहचर्यामुळे, अन्य कोणत्याही साधनापेक्षा, व्याख्यानांच्या द्वारा अधिक जवळीक, अधिक सजग, अधिक जिवंत विचारविनिमय साधता येतो. ग्रंथ, नियतकालिके यांहूनही त्यांचे आवाहन अधिक प्रभावी असते. परंतु उच्चारलेला शब्द हवेत विरून जातो. व्याख्यानाला उपस्थित असतील तेवढ्यांच्याच कानी तो पडू शकतो. विवक्षित व्याख्यानाला हजर राहण्याची इच्छा असताही, अनेक कारणांनी, अनेक वेळा, अनेकांना, सुविधा नसल्याकारणाने, ते जमू शकत नाही; व त्यामुळे त्यांना त्या लाभाला मुकावे लागते.

अर्थात् सर्वच व्याख्यानांतील सर्वच भाग संस्मरणीय असेल असे नाही. परंतु अधिकारी व्यासंगी, चिंतनशील, तज्ज्ञ आणि स्वतंत्र विचाराच्या वक्त्यांनी, आपापल्या व्यासंगाच्या विषयावर, अभ्यासपूर्वक, तयारी करून दिलेल्या व्याख्यानांतील फार मोठा भाग तसा असतो, यात संशय नाही. तो केवळ विवक्षित ठिकाणच्या मूठभर श्रोत्यांच्या कानी पडून हवेत विरून जावा, वाया जावा, ही अनेक वेळा हळहळ वाटावी अशी गोष्ट असते. वक्ता आणि सर्वत्र पसरलेले जिज्ञासू साधक दोघांचेही त्यांत अपरिमित नुकसान आहे.

पूर्वी, मध्यंतरीच्या काळातल्याप्रमाणे, वक्ते आणि व्याख्याने यांना महामूर पूर आला नव्हता तेव्हा, वक्तेही निवडक असत आणि व्याख्यानेही मोजकी होत. त्या काळी वक्ते आपल्या विषयांचे परिशीलनपूर्वक मनन चिंतन करून आपली व्याख्याने लिहून काढीत. त्याकरिता परिश्रम करीत. यामुळे त्यांच्या त्या व्याख्यानात, बहुशः त्या त्या विषयावद्दलची भरपूर आणि विश्वसनीय माहिती असे. विचारांची संगती असे. मांडणीचा रेखीवपणा असे. शैलीची आकर्षकता असे. भाषेचा डौल असे. विद्वत्तेची बैठक असे. रानडे गोखले यांच्यासारख्यांची अनेक वर्षांपूर्वी झालेली व्याख्याने आजही उद्बोधक आणि संस्मरणीय वाटतात ती लेखननिविष्ट झाली म्हणूनच आपण आज त्यांच्यासंबंधात असे विधान करू शकतो.

अशा विचारपरिप्लुत व्याख्यानांच्या, वसंत-शरद्-हेमंत-शिशिर – अशा विविधऋतुकालोद्भव – पुष्पमाला ठिकठिकाणी गुंफल्या जात. त्यांत होणाऱ्या वक्तव्यांचे वृत्तान्त वृत्तपत्रात येत. ते वाचनीय असत. ती ऐकण्याची संधी ज्यांना या ना त्या कारणाने मिळू शकली नसेल असे जिज्ञासू ते वृत्तान्त मोठ्या उत्सुकतेने वाचीत. आमच्या पिढीतील विद्यार्थ्यांना तर तो फारच मोठा लाभ वाटे. त्यांच्या द्वारा थोर थोर विद्वानांच्या विचारांचा व व्यक्तित्वाचा परिचय होण्याची संधी सहजासहजी उपलब्ध होई.

त्या वेळची वृत्तपत्रे बहुशः विचारपत्रे असत; आणि त्यांतील बहुतेक साप्ताहिकेच असत. त्यात वातम्या, स्फुटे इत्यादी विभागही असत; परंतु त्या सर्वांची मांडणी ज्ञानसंवर्धनाला, विचारप्रवर्तनाला, मतपरिपोषाला आणि प्रसाराला मदत होईल अशा धोरणाने होत असे. त्या प्रमाणात त्यांचा पसारा मांडला जात असे. व्याख्यानांचे अहवाल कुतूहलाने वाचले जात असत, ही दंतकथा नव्हे. आचार्य अत्र्यांच्या व्याख्यानांचे, हंशा टाळ्यांसह, विस्तृत आणि शब्दशः वृत्तांत सादर करणारे श्री. दामुअण्णा कोकजे आणि त्या वृत्तांतांना ज्ञानप्रकाशात प्रसिद्धी देणारे कै. काकासाहेब लिमये, यांची कामगिरी, आचार्य अत्रे यांची आजची प्रतिमा निर्माण करण्याच्या कार्यात किती उपयुक्त झाली आहे, याची दखल घेतली असता तिची सत्यता पटेल.

जवळ जवळ अडीच तीन तपांपूर्वीपर्यंत महाराष्ट्रात ही परिस्थिती होती. राष्ट्रीय उत्थापनाच्या वैचारिक कार्याला सार्वत्रिक राजकीय आंदोलनाचे स्वरूप प्राप्त होईपर्यंत ती टिकली. त्यानंतर व्याख्यानांचा वापर वाढला; पण त्याबरोबरच त्यांची घनता आणि कस कमी होऊ लागली. व्याख्यान कसे झाले यापेक्षा कुणाचे झाले, आणि त्यात काय सांगितले यापेक्षा वक्ता किती आवेशाने बोलला, याला अधिकाधिक महत्त्व येऊ लागले; ती एकसुरी ठरीव ठशाची 'नारे' गरजणारी

होऊ लागली; स्वाभाविकच, ती 'झाली' यापेक्षा त्यांचा अधिक वृत्तांत देण्याची गरज नसे. साप्ताहिकांचा काल संपून दैनिकांचा जमाना सुरू झाला. वक्त्यांची प्रसिद्धी एवढेच व्याख्यानांचे वृत्तान्त देण्याचे प्रयोजन राहिले.

जे झाले ते यथाक्रम आणि ठीकच झाले. त्यावद्दल खेद अथवा खंत करीत वसणे अप्रस्तुत होय. परंतु काळाची पावले वदलत असल्याची चाहूल आता पुन्हा येत आहे. स्वातंत्र्योत्तर पुनः संघटनेच्या कालात विचार-परिप्लुत, चिंतनशील व्याख्यानांचा पूर्वीचा जमाना, चक्र-नेमिक्रमाने, पुन्हा येण्याचा योग दिसत आहे. स्वातंत्र्यसंपादनाच्या धन्यतेचा, आत्मगौरवाचा, उत्साह आता हळूहळू ओसरू लागला असून, आत्मनिरीक्षण आणि पुनर्मूल्यांकन करण्याची आवश्यकता पटू लागली आहे. विचारवंतांची दृष्टी अंतर्मुख, संशोधनपर, सत्यान्वेषी आणि प्रामाणिक होऊ लागल्याची चिन्हे दिसू लागली आहेत.

ठिकठिकाणी घडत असलेले परिसंवाद, हे या वदलत्या परिस्थितीचे प्रमुख गमक होत. परिसंवादांत तथाकथित तज्ज्ञ आणि अधिकारी व्यक्तीच भाग घेऊ शकतात. हेतुतः नसले, तरी त्यांचे स्वरूपही अनेक वेळा औपचारिक राहते. परिसंवादांत भाग घेणाऱ्यांव्यतिरिक्त त्या विषयांचा व्यासंग केलेल्या अनेक व्यक्ती समाजात असतात. त्यांचे त्यांसंबंधीचे विचार व्यक्त होणे, प्रसृत होणे आवश्यक असते. अनेक वेळा त्यांना आपले विचार व्यक्त करावयाचे असतात. जिज्ञासूंना ते ऐकावयाची उत्सुकता असते. विचार-मंथनासाठी अशा विचारप्रदर्शनाची, त्यांच्या परीक्षण निरीक्षणाची गरज असते. आता अधिकाधिक वाढू लागली आहे. चर्चात्मक लेखनाने ती गरज काही प्रमाणात पुरी करता येईल; पण विचार लेखननिविष्ट करणे ही अधिक परिश्रमाची, जवावदारीची कामगिरी आहे. फार महत्त्वाचा विचार मांडावयाचा असल्या-शिवाय, ती करण्याकडे माणसाची सहजासहजी प्रवृत्ती होत नाही. काहीशा कमी परिश्रमात, उत्स्फूर्त रीतीने आपले अनुभव आणि विचार प्रकट करण्याचे सुलभ साधन म्हणजे व्याख्यान. त्यात लेखनाच्या तुलनेने काहीसा अधिक अनौपचारिकपणा असतो. लेखक आणि वाचक यांच्यापेक्षा वक्ता आणि श्रोता यांत अधिक जवळिकीचे नाते प्रस्थापित होते. साक्षात् संपर्कामुळे त्यात अधिक जिव्हाळा आणि जिवंतपणा निर्माण करता येतो. अशा विचारगर्भ आणि व्यासंगपूर्ण व्याख्यानांचे प्रमाण गेल्या चार पाच वर्षांत अधिकाधिक वाढत आहे, असे वरवर पाहताही दिसून येईल.

आकाशातून धरणीवर पडणाऱ्या पावसाचे पाणी विना उपयोग वाया जाऊ नये म्हणून ते जमिनीत मुरवण्याचा आणि ठिकठिकाणी कृत्रिम जलाशय निर्माण करण्याच्या नव्या नव्या क्लृप्त्या आणि योजना माणसे आज करीत आहेत. उतारावर पडलेल्या पावसाप्रमाणे अशा व्याख्यानांतून प्रकट होणारा ज्ञानगंगेचा ओघ जनतेच्या जाणिवेत न मुरवता, तसाच वाया वाहू दिला, तो उपयुक्त होण्यासाठी काहीच आयोजन अथवा उपक्रम केले नाहीत, तर तो मोठा अविचार होईल; उधळपट्टी ठरेल. यासाठीं तो लोकांच्या मनोभूमीत मुरवण्याचा, त्याचा संचय करण्याचा प्रयत्न होणे अगत्याचे आहे.

सांस्कृतिक आणि शैक्षणिक क्षेत्रांत अग्रेसर असलेल्या केंद्रांत अशा प्रयत्नांची आवश्यकता विशेष जाणवते. तेथे सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक, वैज्ञानिक विचारांचे संशोधन, संकलन, अध्ययन, अध्यापन करणाऱ्या विविधप्रकारच्या सार्वजनिक संस्था असतात. त्यांच्या वतीने वारंवार परिसंवाद, व्याख्याने, चर्चा, वादविवाद यांसारखे कार्यक्रम होत असतात. विचारांचे प्रवर्तन आणि उद्‌वोधन त्यांच्या द्वारा होत असते. माणसाला निदान बहुश्रुत होण्याला तरी त्यांचा उपयोग असतो. पण त्या संधीचा फायदा अनेकांना अनेक कारणांमुळे घेता येणे शक्य होत नाही. त्यातील अनेक व्याख्याने संस्मरणीय असतात. पण पूर्वीप्रमाणे आता त्यांचे विस्तृत वृत्तांत वर्तमानपत्रा-तून प्रसिद्ध होऊ शकत नाहीत. वृत्तपत्रछपाईसाठी लागणाऱ्या कागदांचा तुटवडा आणि आजच्या दैनिकांच्या वाचकांच्या त्यातील मजकुरावद्दलच्या अपेक्षा, यांमुळे असे होणे अटळही असेल. ते कसेही असले, तरी ते तसे आहे ही वस्तुस्थिती आहे, आणि ती समाधानकारक नसेल तर आपल्याला हवी तशी कांहीतरी नवी व्यवस्था अमलात आणणे भाग आहे. त्यासाठी कांही यंत्रणा निर्माण करणे अगत्याचे आहे.

[ पुढे चालू पृष्ठ ७३ पाहा ]

महाराष्ट्र-साहित्य-परिषद

टिळक-पथ, पुणे २

## हीरकमहोत्सव

महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचा हीरकमहोत्सव चालू वर्षांवधीत करण्याचे परिषदेने ठरविले आहे. परिषदेच्या हातून मराठी साहित्य व भाषा यांच्या अभिवृद्धीसाठी आजवर जे कार्य झाले आहे, ते मराठी साहित्यप्रेमी लोकांपुढे व जनतेपुढे आहेच, परंतु महाराष्ट्र-साहित्यिक व सांस्कृतिक कार्याचा विकास यापुढे फार झपाट्याने व विस्तृत प्रमाणावर व्हावयास हवा, अशी आमची मनीषा आहे. या महान कार्यात आपला योग्य तो वाटा उचलण्याचे सामर्थ्य परिषदेस लाभावयास हवे. हे उद्दिष्ट मनात ठेवून हीरकमहोत्सवाच्या या समारंभात सक्रिय सहभागी होण्याचे आवाहन सर्व मराठी साहित्यप्रेमी जनतेस आम्ही या पत्रकाने करीत आहोत.

अनुक्रमणिका






परिषदेच्या कार्याची वाढ आजवर काही दिशांनी झाली व तीत सहभागी होणाऱ्यांची संख्या बरीच मर्यादित राहिली. कार्याचे क्षेत्रही मुख्यतः काही जिल्ह्यांपुरते व तेही मोठ्या शहरांपुरते मर्यादित राहिले. यापुढे परिषदेच्या कक्षेतील बारा जिल्ह्यांतून निदान तालुक्याच्या गावांपर्यंत व समाजाच्या सर्व थरांपर्यंत साहित्य व भाषा यांच्यासंबंधीची आस्था व अभिरुची वाढत गेली पाहिजे. साक्षरतेचा व शिक्षणाचा प्रसार होऊन तालुक्याच्या गावांपर्यंत आज महाविद्यालयीन शिक्षण घेण्यासाठी तरुण पिढी उत्सुक आहे व त्या शिक्षणाची सोयही होत आहे; तशीच साहित्याची उत्कट आवड आणि निकोप अभिरुची या पिढीमध्ये वाढत आहे, व म्हणूनच परिषदेला आपल्या कार्याचा विस्तार वाढविणे आज निकडीचे आहे; व त्यासाठी पुरेसा प्रयत्न केल्यास ते शक्यही आहे.

या दृष्टीने पुणे येथील मध्यवर्ती कार्यालयातील कार्याची गती वाढविणे व त्याचा विस्तार करणे आणि शाखांना साहाय्य देण्यासाठी कार्यालयाचे सामर्थ्य वाढविणे आवश्यक आहे. त्यासाठी आम्ही पुढील योजना सुचवीत आहो :—

श्री. ना. बनहट्टी
रा. श्री. जोग
आ. रा. देशपांडे
श्री. के. क्षीरसागर
वि. वा. शिरवाडकर
वा. ल. कुलकर्णी
वि. भि. कोल्ते
रा. शं. वाळिंबे
स. कृ. पाध्ये
अ गं. मंगरूळकर
मो. रा. वाळंबे
द. बा. डावरे
के. नारायण काळे
वा. रा. ढवळे
ग. ल. ठोकळ
दि. के. बेडेकर
म. ना. अदवंत
वि. म. कुलकर्णी
श्रीपाद जोशी
गो. म. कुलकर्णी
स. शि. भावे
दे. द. वाडेकर
सरोजिनी बाबर
वि. घ्यं. शेटे
रा. ज. देशमुख
अनंतराव कुलकर्णी
पंडित अनंत कुलकर्णी
भीमराव कुलकर्णी
मालती केळकर
चिं. स. लाटकर
केशवराव कोठावळे
अ. ज. प्रभू
राजेंद्र बनहट्टी
सु. दे. जोशी
प्रभाकर पाध्ये

कै. शं. वा. दांडेकर
कै. श्री. दा. सातवळेकर
ग. स. महाजनी
काकासाहेब कालेलकर
बा. ग. खापर्डे
बा. ग. जगताप
स. ज. भागवत
माधवराव बागल
पु. ह. पटवर्धन
द. रा. बेंद्रे
पु. ग. मावळंकर
सेतु माधवराव पगडी
पृ. धुं. भालेराव
के. ना. वाटवे
पु. ल. देशपांडे
मा. गो. देशमुख
मा. प. मंगुडकर
गं. बा. सरदार
बा. म. बोरकर
गंगाधर गाडगीळ
वा. ना. देशपांडे
शं. गो. तुळपुळे
भ. श्री. पंडित
रणजित देसाई
स. गं. मालशे
वि. बा. आंबेकर
मं. वि. राजाध्यक्ष
महादेवशास्त्री जोशी
मालती बेडेकर
म. अ. करंदीकर
र. कृ. फडके
पु. ग. सहस्रबुद्धे
भालचंद्र कहाळेकर
कृ. ब. निकुम्ब
रा. ब. माढेकर

कमलाबाई किबे
मोहन धारिया
कारले गुरुजी
वा. वि. आठल्ये
ग. ज. ठाकूर
कृष्णराव धुळप
वि. वा. फडके
मदनमोहन लोहिया
( कोल्हापूर शुगर मिल्स )
मं. वा. मंत्री,
( कूपर इंजिनिअरिंग वर्क्स )
रा. द. पुसाळकर, ( रस्टन )
गं. वि. पुराणिक (धूतपापेश्वर)
कृ. द. कुलकर्णी,
( कुल्को इंजिनिअरिंग )
शं. वा. किर्लोस्कर
ना. भि. परुळेकर
भालजी पेंढारकर
जयंतराव टिळक
बाळासाहेब पाटील
गोविंद तळवलकर
मु. शं. किर्लोस्कर
पां. वा. गाडगीळ
अ. वि. पाटील
चं. प. मिसीकर
श्री. शं. नवरे
विठ्ठलराव दीक्षित
शंकरराव खरात
कृ. न. जेजुरीकर
वा. वि. भट
न. का. घारपुरे
वि. रा. पाटील
धों. वा. गदें
पु. बा. साठे
आनंदीबाई शिर्के

लालजी पेंडसे
गो. म. वाटवे
बा. रं. सुंठणकर
सुभाष भेंडे,
(गोमंतक साहित्य-सेवक मंडळ, पणजी)
य. गो. जोशी,
(वा. गो. आपटे ट्रस्ट)
रा. ना. गोडबोले,
(नगर वाचनालय, सातारा)
ज. के. रानडे,
(सांगली शाखासभा)
रमेशचंद्र खांडेकर,
(शारदोपासक मंडळ, ग्वाल्हेर)
र. स. लांजेकर,
(सातारा शाखासभा)
त्रि. ग. नाईक,
(नगर वाचनालय, वेंगुर्ले)
दुलाजी सी. पाटील,
(नाशिक जिल्हा परिषद)
रा. शं. यार्दी,
(मराठी साहित्य मंदिर, कल्याण)
तु. ह. वाजेकर,
(कुलाबा जिल्हा परिषद)

म. वि. फाटक
ल. नी. छापेकर
के. नारखेडे
मुरलीधर गंधे,
(व. वा. वाचनालय, जळगाव)
ग. द. देसाई,
(राजाराम वाचनालय, नागपूर)
म. द. करमरकर,
(स्नेहसंवर्धक संघ, मिरज)
द. मो. दामले,
(सोलापूर शाखासभा,
शं. गो. पटवर्धन,
(साहित्य सेवा मंडळ सोलापूर)
द. दा. काळे,
(मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणे)
श्री. वि. ओक,
(मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, दादर)
धों. य. पाटील,
(सांगली जिल्हा परिषद)
पां. शि. देशमुख,
(ठाणे जिल्हा परिषद)

एन. एस. गोरेकर
वि. आ. बुवा
रा. ग. कापसे
सौ. मिराबाई कागदे
वि. आ. एकबोटे,
(आपटे वाचन मंदिर, इचलकरंजी)
वा. आ. सावंत,
(वाङ्मय चर्चामंडळ, बेळगाव)
ह. श्री. शेणोलीकर,
(धुळे शाखासभा)
वि. दि. भागवत,
(भरत नाट्यसंशोधन मंदिर, पुणे)
मा. ग. पातकर,
(करवीर नगर वाचन मंदिर, कोल्हापूर)
द. य. केळकर,
(मराठी साहित्य मंदिर, कल्याण)
प्र. म. मुनशी,
(महाराष्ट्र समाज, अहमदाबाद)
कृ. म. पाटील,
(जळगाव जिल्हा परिषद)

महाराष्ट्र–साहित्य–परिषद

टिळक-पथ, पुणे २





श्री

ज्ञानदेवी बारावा अध्याय

# पाठनिश्चितीची प्रक्रिया

● श्री. ना. बनहट्टी ●

(१)

ज्ञानदेवीच्या बाराव्या अध्यायाची पाठसंशोधित आवृत्ती तयार झाली. तिच्यासंबंधाने अभ्यासक मित्रांची जी पत्रे आली त्यात एक सूचना अनेकांनी केली. 'तुम्ही जे पाठ स्वीकारले ते का स्वीकारले आणि नाकारले ते का नाकारले याची कारणे द्या.' मोकळेपणी विचार-विनिमय व्हावा हा प्रस्तुत लेखकाचाही हेतू असल्यामुळे त्याच्या मनात ही गोष्ट होतीच. पण संशोधित आवृत्तीच्या पुस्तकात पाठचर्चा समाविष्ट करण्यास स्थल-काल-मर्यादांची अडचण आली. 'पत्रिके' च्या संपादकांनी या चर्चेला प्रसिद्धी देण्याचे संतोषाने मान्य केल्यामुळे त्यावेळी राहून गेलेले काम आता हातावेगळे होत आहे.

### ज्ञानदेवीच्या पाठपरंपरा : अजाणीव युग

पाठांतरांच्या चर्चेला आरंभ करण्यापूर्वी तिच्याशी निगडित असलेल्या इतर एकदोन गोष्टींचे दिग्दर्शन करणे अवश्य वाटते. पाठसंशोधनासाठी अनेकानेक पोथ्या चाळण्यात आल्या; त्यांच्या अवलोकनातून ज्या गोष्टी स्पष्ट झाल्या त्यात विशेष महत्त्वाची गोष्ट ही की, ज्ञानदेवीच्या पाठाच्या काही ठळक परंपरा आहेत; त्यांची बाह्य चिन्हे आहेत, ती परस्परव्यवच्छेदक आहेत. या परंपरांचे अंतरंगातले साम्यवैषम्य काय, हा खोल अभ्यासाचा विषय आहे. तो अभ्यास होत आहे. पण आजवर अशा परंपरांची जाणीव नव्हती; ती आता होत आहे, हा एक प्रगतीचा महत्त्वाचा टप्पा होय.

ज्ञानदेवी छापण्यास सुरवात झाल्यापासून आतापर्यंत ज्या आवृत्त्या छापण्यात आल्या त्यांपैकी बहुतेक एकनाथी परंपरेच्या पोथ्यांवरून छापण्यात आल्या. त्यांच्या शेवटी 'शके पंधराशतें सावोत्तरीं। तारणनाम संवत्सरि॥' इत्यादि एकनाथी शुद्धीच्या ओव्या असतात.



पण भिन्न पाठपरंपरा आहेत याची जाणीव नसल्यामुळे काही चमत्कारिक प्रकार घडले. अण्णा मोरेश्वर कुंटे यांनी निर्णयसागर छापखान्यातून छापिलेली ज्ञानेश्वरी वास्तविक बरवा परंपरेच्या पोथीवरून छापिली आहे. त्यात संपूर्ण ज्ञानदेवीनंतर १८ व्या अध्यायाची पुष्पिका छापल्यानंतर ज्ञानदेवीच्या टाइपात एकनाथी शुद्धीच्या ओव्या छापल्या; आणि आधारभूत पोथीमध्ये बरवा परंपरेची दर्शक

शके सोळाशतें तेरोत्तरें। जे पदपद्धति केली ज्ञानेश्वरें।
ते गोविंद बरवा मुखांतरें। जगजीवन लेखक॥

ही जी ओवी होती ती फुली घालून टीपेत दिली आहे; एकनाथशुद्धीच्या ओव्या मूळ पोथीत नव्हत्या असे दिसते. शिवाय कुंटे आवृत्तीची गंमत अशी आहे की तिच्यात पुष्कळसे पाठ एकनाथी परंपरेप्रमाणे बदलले आहेत, पण प्रतीके बरवा परंपरेतली घेतली आहेत. हे सर्व कोणताही खुलासा न करता!

जाणीव नसल्यामुळे हे झाले. अजाणीव युगानंतर अभिनिवेशयुग सुरू झाले. राजवाड्यांना पाटांगण देव-स्थानात एक पोथी सापडली. प्रचलित पाठाहून अगदी निराळे पाठ आणि प्राचीनत्वाची काही बाह्य चिन्हे पाहून त्यांचा असा ग्रह झाला की ज्ञानदेवांनी रचलेल्या ज्ञान-देवीचा अस्सल पाठ देणारी पोथी हीच! साधार शास्त्र-शुद्ध तर्क करायचा तर जास्तीत जास्त एवढे विधान करता आले असते की प्रचलित एकनाथी पाठांपेक्षा निराळे व बऱ्याच अंशी पूर्वीचे पाठ देणारी आणि जुनी रूपे कायम राखणारी ही पोथी आहे; तस्मात अतिशय महत्त्वाची आहे.

वास्तविक राजवाड्यांना मिळालेली पोथी एका परंपरेतली पोथी होती. प्रस्तुत लेखकाने काढलेल्या ज्ञान-देवीच्या १२ व्या अध्यायाच्या पाठसंशोधित आवृत्तीत

या परंपरेच्या तीन पोथ्यांचा उपयोग केला आहे. हिला तूर्त '**पाटांगण परंपरा**' असे नाव दिले आहे. गोपाळाश्रम स्वामींनी तयार केलेल्या पाठसंशोधित संहितेला हिचा बराच उपयोग झालेला दिसतो; म्हणून या संहितेला सध्या पाटांगण परंपरेत गणिले आहे. एकनाथी परंपरेचा संपर्क न घडलेले पाठ आणि प्राचीनतर शब्दरूपे देणे हे या परंपरेचे मुख्य लक्षण मानिता येईल.

डॉ. रा. ग. हर्षे यांना मिळालेली विप्र प्रत हिची गोष्ट अशीच. ही प्रत शके १२७२ मधील म्हणजे जवळ जवळ ज्ञानदेवांच्या काळची, असा डॉ. साहेबांचा ग्रह झाला. या ग्रहाने राजवाडे प्रत अव्हेरिली; एकनाथी परंपरा तर बिचाऱ्या वारकरी सांप्रदायिकांची. ती मुळातच आपले मूल्य हारवून बसलेली. एकंदरीने हा हारजितीचा खेळ झाला.

संशोधन म्हणजे सामना नव्हे. स्वपक्ष, प्रतिपक्ष असा भाव उत्पन्न होणे सत्यमार्गणाच्या आड येण्याचा संभव असतो. हर्ष्यांना मिळालेली विप्र प्रत ही एका परंपरेतली पोथी आहे, जिला सध्या सोयीकरिता '**सिद्धनाथ परंपरा**' हे नाव दिले आहे. शेवटी येणारी

एणेंचि गुरुसंप्रदायें अनुग्रहीतु ।
परशराम सिद्धनाथ सुतु ।
सिद्धनाथ स्वयें हस्तु । गीता ग्रंथु लिहिला ॥

ही ओवी हे या परंपरेचे बाह्य चिन्ह होय. हे चिन्ह धारण करणाऱ्या ४ पोथ्या ( महत्त्वाच्या ) प्रस्तुत लेखकास उपलब्ध झाल्या, त्यांचा उपयोग पाठसंशोधित आवृत्तीकरिता केला आहे. आजवर मिळालेल्या या परंपरेच्या पोथ्यांमध्ये सर्वात जुनी देखील ही नव्हे. सरकारी आवृत्तीत वर्णिलेली शाळिग्राम प्रत एक महिना पाच दिवसांनी हिच्यापेक्षा वडील आहे. हर्षे यांनी मानिल्याप्रमाणे ही विप्र प्रत शके १२७२ मधील नसून डॉ. कोलते, कै. मोडक प्रभृति मानितात त्याप्रमाणे १५७२ मधील होय असे गृहीत धरून हे विधान केले आहे.

शाळिग्राम प्रत सिद्धनाथ परंपरेची आहे. पण या परंपरेमध्ये विप्र बल्लाळ याने एक उपपरंपरा सुरू केली असावी. शाळिग्राम प्रत ही या उपपरंपरेतील महत्त्वाची पोथी होय. मूळ सिद्धनाथ परंपरेचे पाठ विप्र बल्लाळाने बरेचसे बदलून एकनाथी परंपरेवर नेले असावे असे दिसते. या उपपरंपरेतील पोथ्यांच्या शेवटी 'सिद्धनाथ ओवी' नंतर 'श्री यकनाथ स्वामि समर्थ। त्याच्या शिष्याच्या रंकाचें रंक विप्र बलालु तेणे हा ग्रंथु लिहिला' असा मजकूर आढळतो. यावरून, आणि शाळिग्राम प्रतीतील पाठ एकनाथी पाठांच्या तऱ्हेवर बरेचसे गेलेले दिसतात, या प्रत्यक्षानुभवावरून वरील अनुमान करावेसे वाटते.

बल्लाळ उपपरंपरेची एक पोथी डॉ. हर्षे यांना मिळाली होती असे दिसते. ( श्री भगवद्गीता व्याख्यान ज्ञानदेवी, प्रस्तावना पान २७ ). आश्चर्याची गोष्ट ही की, ही पोथी त्यांना शाळिग्राम नावाच्याच गृहस्थांकडे मिळाली व तिला त्यांनी शाळिग्राम प्रत असे नाव दिले. शाळिग्राम हे आडनाव एक असले तरी व्यक्तिनामे भिन्न आहेत; आणि या भिन्न व्यक्तींच्या द्वारा उपलब्ध झालेल्या पोथ्याही भिन्न आहेत. हर्ष्यांना मिळालेली शाळिग्राम प्रत शके १६१६ मध्ये, तर प्रस्तुत लेखकाला मिळालेली प्रत शके १५७२ मध्ये लिहिलेली आहे. या दोन्ही पोथ्यांच्या अंती सिद्धनाथी ओवी असून त्याच्या पुढे 'श्री एकनाथ स्वामी समर्थ....' हा वर दिलेला मजकूर आहे. हा ओवीसारखा मजकूर ही या उपपरंपरेची खूण होय. हा ओवीसारखा दिसला तरी ओवीप्रमाणे आमच्या शाळिग्राम प्रतीत चरण तोडलेले नाहीत व यमके नाहीत. याचा अर्थ काय करायचा हा एक प्रश्न, आणि विप्र बल्लाळ हा कोण, केव्हा झाला, हा दुसरा प्रश्न. दोन्ही अद्याप सुटलेले नाहीत. डॉ. हर्षे यांचे प्रतिपादन त्यांना मिळालेली 'विप्र' प्रत ही अती प्राचीन असे ठरविण्याच्या रोखाने केले असल्यामुळे त्यातून प्रश्नाचा उलगडा होत नाही.

एणेंचि गुरुसंप्रदायें अनुग्रहीतु ।
परशराम सिद्धनाथ सुतु ।
सिद्धनाथ स्वयें हस्तु । गीता ग्रंथु लिहिला ॥

या ओवीचा अर्थ काय करायचा हा देखील प्रश्न आहे. डॉ. हर्षे व डॉ. कोलते यात दोन सिद्धनाथांचा उल्लेख आहे असे मानतात. तसे मानण्यास खुद्द ओवीत फारसा आधार दिसत नाही. हिच्या अर्थाच्या चिकित्सेतून पाठपरंपरेवर काही प्रकाश पडण्याजोगा दिसत नाही. तेव्हा हे दोन्ही उल्लेख काहीसे कूटात्मक आहेत, असे म्हणून सध्याच्या अवस्थेत ही बाब मोकळी ठेवावी हे बरे. भिन्न परंपरा व उपपरंपरा यांच्या या खुणा होत, इतका फलितार्थ सध्या निष्पन्न होतो तोच महत्त्वाचा.

## ज्ञानदेवीच्या पाठपरंपरा : शास्त्रशुद्ध अभ्यासाचे युग

अभिनिवेशयुगानंतर शास्त्रशुद्ध अभ्यासाचे युग अवतरले. विचारविकासाच्या दृष्टीने हे नंतरचे असले तरी कालदृष्ट्या ते काहीसे समांतर होते. या युगाचे आचार्य कै. गो. कृ. मोडक होत. हे चांगले वैयाकरण व भाषाशास्त्री होते. त्यांनी 'ऐतिहासिक भाषाविज्ञान' हा शब्द वापरला नाही, पण त्याच्या तत्त्वास ते अनुसरले. कालांतराने शब्दरूपांमध्ये बदल होत जातो या तत्त्वाचे अनुसंधान ठेवून त्यांनी वंकटस्वामी ज्ञानेश्वरी आणि राजवाडे ज्ञानेश्वरी यांमधील शब्दरूपांची तुलना केली व त्यांवरून 'राजवाडे ज्ञानेश्वरीचे पुराणत्व' दाखवून दिले. या नावाचा निबंध त्यांनी भारत इतिहास संशोधक मंडळाच्या २२ व्या संमेलनात ता. २ जून १९३४ रोजी वाचला, तो मंडळाच्या त्रैमासिकात, वर्ष १५ अंक १ यात प्रसिद्ध झाला. पुढे डॉ. रा. ग. हर्षे यांचा 'ज्ञानदेवी'चा पहिला अध्याय प्रसिद्ध झाला, त्याचा संपादकीय प्रस्तावनेसह अभ्यास करून 'ज्ञानेश्वरीच्या चार पाठ-परंपरा' हा लेख त्यांनी लिहिला तो महाराष्ट्र साहित्य पत्रिकेमध्ये दोन भागांत प्रसिद्ध झाला. (म. सा. प. वर्ष २२ अंक ४ व वर्ष २३ अंक १; इ. स. १९५०). मोडकांचा हस्तलिखितांशी प्रत्यक्ष परिचय असल्याचे दिसत नाही. त्यांनी अनुमाने काढली ती हर्षांची 'ज्ञानदेवी, अध्याय पहिला' हिच्यावरून. यामुळे त्यांच्या विवेचनाची ग्राह्यता आता विशेष उरलेली नाही. तथापि ज्ञानदेवीच्या हस्तलिखितांमध्ये पाठपरंपरा आहेत याची जाणीव त्यांना झाली ही फार मोठी गोष्ट होय. पूर्वसूरींच्या मानाने आपणाला अधिक दिसते याचे कारण आपण त्यांच्या खांद्यावर उभे असतो, हे सदोदित लक्षात ठेवले पाहिजे. ज्ञाननाथी, एकनाथी, सिद्धनाथी, विश्वनाथी (राजवाडे प्रतीची) अशा चार परंपरा मोडकांनी सांगितल्या आणि जी कोणत्याच परंपरेत बसत नाही अशी अनाथी परंपराही सांगितली. शब्दसाम्याच्या दृष्टीने हे ठीक असले तरी आता पोथ्यांचे विश्वरूप हळूहळू प्रकट होऊ लागले असता त्यांची गृहीत कृत्ये आणि परिकल्पना बऱ्याच अंशी कालबाह्य ठराव्यात हे क्रमप्राप्त होय. सिद्धनाथी परंपरा ही एकनाथी परंपरेत 'अर्थव्यक्तीस अनुकूल' असे बदल करून बनविली गेली, आणि गोपाळाश्रमांनी ज्ञानेश्वरीची 'यथामूल' (ज्ञानदेवलिखित) प्रत सिद्ध करण्याचा पूर्णप्राय यशस्वी प्रयत्न केला तीच राजवाडे प्रतीचे हस्तलिखित मूळ होय, अशी अनुमाने त्यांनी काढली. आता प्रत्यक्ष हस्तलिखितांचा पुरावा पाहता असे दिसते की सिद्धनाथी परंपरा एकनाथांच्या पूर्वीपासून चालत आली असावी; आणि गोपाळाश्रम प्रत ही राजवाडे प्रतीचे मूळ नसून तिच्यासारख्या काही प्रती—आणि इतर परंपरांच्याही प्रती—जमवून केलेला पाठशुद्धीचा प्रयत्न होय. तिच्यात आणि राजवाडे प्रतीत पुष्कळ साम्य असले तरी मुद्द्यांच्या ठिकाणी फरकही पुष्कळ आहेत. राजवाडे प्रत ही एका परंपरेतली प्रत आहे; ती यथामूल ज्ञानेश्वरीचे प्रतिबिंब (छपाईच्या चुका सोडून) आहे, हा मोडकांचा झालेला समज यथार्थ नव्हता. पाठपरंपरांचे सम्यग्ज्ञान होण्यास अभिनिवेशरहित दृष्टी पाहिजे, त्याचप्रमाणे प्रत्यक्ष हस्तलिखितांशी दाट परिचय पाहिजे. त्यांचे अंतेवासित्व पतकरल्याशिवाय ती आपली रहस्ये उकलून दाखवितील कशी?

मोडकांनी व्यक्तविलेली पाठपरंपरांची जाणीव पुढे टिकली नाही. साहित्यपत्रिकेतील मोडकांच्या लेखानंतर ६ वर्षांनी १९५५ साली श्री. बाळाचार्य खुपेरकर यांनी केळकर स्मारक व्याख्यानमालेत 'श्री ज्ञानेश्वरवाङ्मयाचा सांगोपांग अभ्यास' या विषयावर व्याख्याने दिली. त्यांचे पुस्तक १९६३ साली प्रसिद्ध झाले. त्यात मोडकांच्या 'पत्रिके'तील लेखात पाठपरंपरांचे जे स्वरूप प्रकट करण्यात आले तेच पुन्हा निवेदिले आहे. मोडक बाळाचार्यांचे मित्र होते. "त्या (मोडकांच्या) लेखातील सर्व सिद्धान्त हे आमच्याशी त्या वेळी चर्चा होऊनच लिहिले गेले असल्याने त्या लेखातील आवश्यक तेवढा भाग प्रस्तुत प्रसंगी आम्ही येथे उद्धृत करणार आहो." असे व्याख्यान-पुस्तकात (पृ. २४) त्यांनी म्हटले आहे. बाळाचार्य सरकारने स्थापिलेल्या ज्ञानेश्वरी संपादन मंडळाचे सभासद होते. या मंडळाने चार वर्षे प्रयत्न करून ज्ञानेश्वरी प्रसिद्ध केली तिच्या प्रस्तावनेत पाठपरंपरांची जाणीव दिसत नाही. मोडकांच्या व्याकरणदृष्टीस अनुसरणाऱ्या अलीकडील अभ्यासकांच्या लिखाणात ती दिसत नाही. कै. रा. वि. माडगावकरांनी अनेक ठिकाणांहून पोथ्या जमवून पाठसंशोधनाचा प्रदीर्घ यत्न केला त्यांना देखील ही जाणीव झाली असल्याचे दिसत नाही. ज्ञानदेवीचा पाठाभ्यास सुफल व्हावयाचा तर परंपरांची जाणीव जागती ठेवली पाहिजे.

त्याबरोबरच या पाठपरंपरांमध्ये पाठमिश्रण मोठ्या प्रमाणात झाले आहे हे सत्यही ध्यानात वागविले पाहिजे. पाठपरंपरा आणि पाठमिश्रण या दोहोंची जाणीव ठेवून तारतम्याने, सावधपणाने, वस्तुनिष्ठ वृत्तीने अभ्यास केला तर सत्याच्या बरेच जवळ आपण जाऊ शकतो. भगवद्भक्त वैकुंठवासी मामासाहेब दांडेकर हे अशा वृत्तीचे उदाहरण होते. पाठसंशोधनाने प्रतिशुद्ध आवृत्ती तयार करण्याचे काम त्यांनी पाहिले, त्यांना पटले, लगेच प्रांजळपणे त्यांनी त्याचा पुरस्कार केला.

कोणत्याही परंपरेची बाह्यचिन्हे न बाळगणाऱ्या अशा देखील बऱ्याच पोथ्या आढळतात. पाठसंशोधित आवृत्तीसाठी उपयोगात आणिलेल्या पोथ्यांपैकी भांडारकर इन्स्टिटयूटमधील शके १६०८ मधील प्रत (भ), कै. द. वें. केतकर यांनी पाहिलेली जाल्गिरि प्रत (जा)— या कोणत्याही परंपरेत न बसणाऱ्या पोथ्या होत. पाठांच्या बाबतीत या पोथ्या स्वतंत्र दिसतात. विदर्भातून काही मूल्यवान पोथ्या उपलब्ध होत आहेत. त्यांच्यामधून एखादी वैदर्भीय परंपरा दिसून येते की काय, याचा अंदाज घ्यावयाचा आहे. अकोल्याचे प्रा. म. रा. जोशी यांनी ठिकठिकाणांहून पोथ्या मिळविण्याचा फार स्तुत्य उद्योग चालविला आहे. विदर्भातील तरुण विद्वानांमध्ये जुन्या पोथ्यांचे शोधक व अभ्यासक निर्माण होत आहेत. त्यांच्यामध्ये अभिनिवेश उत्पन्न होताना दिसत नाही हे विशेष अभिनंदनीय आहे.

### अतिशय खेदकारक गोष्ट

यासंबंधात एक खेदकारक गोष्ट उल्लेखिली पाहिजे. पोथ्या नष्ट किंवा बेपत्ता होणे ही ती गोष्ट होय. राजवाड्यांनी जिच्यावरून आपली प्रत छापली ती पोथी नष्ट झाली. माडगावकरांनी पाठसंशोधित आवृत्ती १९०७ साली प्रसिद्ध केली; तिच्याकरिता ज्या पोथ्या जमविल्या त्यांत शके १५५१ मध्ये लिहिली गेलेली पैठण मठातील पोथी होती. इतकी जुनी आणि एकनाथांच्या मठात रक्षिलेली, तेव्हा ही फार महत्त्वाची पोथी होय. पण ती आता त्या मठात नाही, बेपत्ता झाली आहे, असे दिसते. पुढे राजवाडे प्रतीशी खूप साम्य असलेली एक पोथी माडगावकरांना मिळाली होती. तिची नक्कल त्यांनी करवून घेतली, ती त्यांच्या चिरंजीवांमार्फत प्रा. नरहरपंत फाटकांकडे आली. तिचा उपयोग फाटकांच्या उदारत्वामुळे अभ्यासकांना होत आहे. पण जिच्यावरून ही नक्कल केली ती मूळ पाटांगण देवस्थानातली प्रत कुठे आहे? सरकारने नेमलेल्या ज्ञानेश्वरी संपादन मंडळाचे एक सदस्य पोथ्यांच्या शोधार्थ गेले असता त्यांना पाटांगण देवस्थानात ही पोथी आढळली नाही असे कळते. माडगावकरांनी आणविलेल्या दोन अतिशय महत्त्वाच्या पोथ्या बेपत्ता व्हाव्यात ही राजवाडे प्रतीची मूळ पोथी नष्ट होण्याइतकीच खेदकारक घटना होय. जुन्या गोष्टी अशा तऱ्हेच्या असल्यामुळे आता प्रस्तुत लेखकाच्या देखरेखीखाली महत्त्वाच्या पोथ्यांची जी पाठनोंदणी होत आहे तिची उपयुक्तता केवढी आहे हे सहज लक्षात येईल.

## (२)

संशोधित संहिता सिद्ध करताना पाठांची निवड कशी, कोणत्या तत्त्वांनुसार केली हा दुसरा महत्त्वाचा प्रश्न. बाराव्या अध्यायाच्या संशोधित आवृत्तीच्या प्रस्तावनेत (पृ. २५-३२) याचा ऊहापोह केला आहे. आता जे लिहिणार ते काही अंशी पुनरुक्ती व बऱ्याच अंशी पुरवणी असे होईल. पाठांची निवड हे मोठे गुंतागुंतीचे काम आहे. प्रत्यक्ष उदाहरणांनीच त्याची प्रक्रिया स्पष्ट होईल. तथापि काही दिग्दर्शन करण्याचा प्रयत्न करू.

### शब्दरूपे आणि वाक्संप्रदाय यांचे आधुनिकीकरण

शब्दरूपे निश्चित करण्याचा प्रश्न त्या मानाने थोडा सोपा आहे. समाधानकारक तोड निघू शकेल अशी सामग्री यासंबंधात उपलब्ध झाली आहे. ज्ञानदेवींच्या काळात रचले गेलेले महानुभावीय ग्रंथ सांकेतिक लिप्यांमध्ये बद्ध होते ते भाषाशास्त्रीय दृष्टी असणाऱ्या आणि यथातथ्यतेची कदर करणाऱ्या संपादकांनी उलगडून प्रसिद्ध केलेले आता उपलब्ध आहेत. सांकेतिक लिप्यांची निर्मिती ज्ञानदेवकालानंतर सुमारे अडीचशे वर्षांनी झाली; तथापि महानुभाव पंथाचे महंत आपल्या वाङ्मयाचे शुद्ध स्वरूपात रक्षण करण्याविषयी विशेष दक्ष असल्यामुळे व प्रचार मर्यादित असल्यामुळे महानुभावीय प्राचीन ग्रंथांचा मूळ पाठ शुद्ध स्वरूपात रक्षिला गेला असण्याचा संभव अधिक. आणखी ताडून पाहण्यास ज्ञानदेवकालापूर्वी पासूनचे शिलालेख शक्य तितक्या यथातथ्य स्वरूपात आता उपलब्ध झाले आहेत. तेव्हा जुन्यात जुनी शब्दरूपे कोणती याचा निर्णय करण्याची बाब आता अभ्याससाध्य झालेली आहे असे म्हणण्यास चिंता नाही. वरील सर्व साधनांच्या आधारे जुन्या विश्वसनीय पोथ्यांमध्ये आढळणारी जी शब्दरूपे जुन्यात

जुनी ठरत असतील ती ग्राह्य, असा पाठनिश्चितीच्या बाबतीत नियम बांधण्यास हरकत नाही.

व्याकरणाच्या दृष्टीने शब्दांची परस्पर आकांक्षा व योग्यता यांच्याकडे बारीक लक्ष पुरविल्यास ग्राह्य पाठाची निवड करणे सुलभ होते. ज्ञानदेव श्रेष्ठ कवी व प्रबंधकार होते. त्यांनी रचलेल्या ग्रंथातील वाक्ये व्याकरणशुद्ध व सुसंगत अर्थ व्यक्त करणारी असली पाहिजेत एवढी अपेक्षा किमानपक्षी बाळगण्यास काही हरकत नाही. ही अपेक्षा बुद्धिवादी आणि भाविक, तत्त्वजिज्ञासू आणि काव्यपिपासू सर्वच प्रकारच्या वाचकांना मान्य होईल. मधल्या काळातील पोथ्या लिहिणाऱ्या लिपिकारांच्या आणि भोंगळपणाने गोळाबेरीज अर्थ करणाऱ्या प्रवाचकांच्या अज्ञपणामुळे सुसंगत अर्थ करण्यास बाधक असे शब्द आणि शब्दरूपे ज्ञानदेवीच्या पोथ्यांमध्ये शिरलेली ठायी ठायी आढळतात. ही त्याज्य समजून व्याकरणशुद्ध आणि सुसंगत अशी वाक्यरचना बनण्यास अनुकूल असा जो उपलब्ध पाठ असेल तो ग्राह्य, असा दुसरा नियम प्रस्तुत बाबतीत धरून चालण्यास हरकत नाही. मात्र हा नियम स्थूलमानाचा आहे हे सदोदित लक्षात बाळगिले पाहिजे. वैयाकरणी किंवा तार्किक काटेकोरपणाचा देखील अतिरेक होऊ शकतो.

भाषेतील शब्दरूपे बदलतात तसे शब्द, वाक्संप्रदायही बदलतात. जुने प्रचारातून जातात व नवे प्रचारात येतात. ज्ञानदेवांच्या काळी प्रचलित असलेले कित्येक शब्द आणि वाक्संप्रदाय पुढे प्रचारातून गेले. त्यांच्या जागी नंतरच्या लिपिकारांनी व प्रवाचकांनी स्वतःच्या काळी प्रचलित असलेले शब्द आणि वाक्संप्रदाय घालून दिले. त्यांचा हेतू स्तुत्य होता : ज्ञानदेवांची वाणी सुलभ व्हावी, सगळ्यांना त्याची गोडी घेता यावी हा. ऐतिहासिक दृष्टीचे आपल्याकडे नाव नसल्यामुळे यात कोणाला गैर वाटले नाही. ज्ञानदेवीला असे स्वकालीन रूप देण्याचे कार्य एकनाथांनी केले असे मोडकांनी म्हटले आहे. पण पोथ्यांचे विश्व न्याहाळले असता एकनाथांनी प्रतिशुद्ध संहिता सिद्ध केली म्हणजे काय केले हे निश्चित सांगता येण्याजोगी परिस्थिती दिसत नाही. ज्ञानदेवीमध्ये शब्दांचे व शब्दरूपांचे आधुनिकीकरण झाले हे निर्विवाद आहे. काही आधुनिकीकरण राजवाडे प्रतीत (म्हणजे तिची मूळ पोथी ज्या परंपरेतली होती त्या परंपरेत) झाले हे आपणांस पुढे दिसून येईल. मोडकांचा दोष नाही. ते पोथ्यांच्या मेळाव्यात बसले असते म्हणजे आधुनिकीकरणाचे दायित्व एकनाथ सिद्धनाथ यांच्याच गळ्यात बांधण्याजोगी वस्तुस्थिती नाही हे त्यांना पटले असते. पूर्वपुरुषांच्या गळ्यात असले बिल्ले बांधण्यापेक्षा आजच्या संशोधकाचा प्रयत्न असा असावयास हवा की त्याने भाषिक इतिहासाची जाणीव ठेवून पोथ्यांमधील शब्दबदलांची छाननी करावी. जुना शब्द किंवा वाक्संप्रदाय काढून टाकून त्याच्याऐवजी काही तरी नवे योजण्यात आले आहे असे वाटण्यास जिथे सबळ कारण दिसेल तिथे जुने स्थापित करावे.

### शब्दांचे बदल आणि ओव्यांचे प्रक्षेप

आधुनिकीकरण व सुलभीकरण पुरवले. थोड्याबहुत आयासाने ते ओळखता येते. पण असे काही बाह्य कारण नसता शब्दबदल होऊन जे पाठभेद उत्पन्न झालेले ज्ञानदेवीत दिसतात त्यांच्यातून निवड कशी करावयाची हा खरा बिकट प्रश्न होय. शब्दांच्या बदलामुळे अर्थात बदल होतो. दोन्ही अर्थ चांगले, चालू वर्णनात शोभण्याजोगे असतात. दोघांचेही समर्थन निरनिराळ्या दृष्टींनी करता येण्याजोगे असते. अशा स्थली कोणते आधार, कोणते युक्तिवाद पाठनिर्णयासाठी उपयोगी पडतात हे प्रत्यक्ष उदाहरणांवरूनच नीटपणे लक्षात येईल. बाराव्या अध्यायाच्या पहिल्या ओवीच्या पहिल्याच चरणात **शुद्धे—सिद्धे** असा पाठभेद आहे. गुरुकृपादृष्टीचे विशेषण म्हणून हे आले आहे. दोन्ही विशेषणे तिला उत्तम शोभण्याजोगी आहेत. पुढे सहाव्या ओवीत **'रिद्धिसिद्धिचिं–आत्मसुखाचिं (बाळलेणीं)'** हाही मोठा विचार करण्याजोगा पाठभेद आहे. बाराव्या अध्यायात असे पाठभेद विपुल आहेत. असे पाठभेद का उत्पन्न झाले असावे याचा तर्क करता आला तर त्याची मूळ पाठाचा निर्णय करण्यास मदत होते.

ज्ञानदेवांच्या शब्दप्रयोगांचा नीट अर्थबोध न झाल्यामुळे, म्हणजेच अज्ञपणामुळे किंवा गैरसमजामुळे, पुष्कळ पाठभेद निर्माण झाले. एखाद्या प्रवाचकाला एखाद्या शब्दाचा अर्थ कळला नाही, की त्याने त्या ठिकाणी निराळा शब्द घालून ओवीचा अर्थ साजरा करावा, असा प्रकार पुष्कळ ठिकाणी घडत गेला असला पाहिजे. **नाटिं–हिंटिं** (९५) हे एक अशा रीतीच्या पाठभेदाचे उदाहरण होय. अशा घातलेल्या शब्दांची झाली परंपरा सुरू. कारण ज्ञानदेवीच्या प्रती तर सारख्या सर्वकाळ होतच होत्या.

ज्ञानदेवांची वाणी चांगल्या शब्दांनी, सुंदर कल्पनांनी मंडित करावी या भाविक उद्देशाने काही कमी पाठभेद निर्माण केले नसतील. निरनिराळ्या पोथ्यांमध्ये ओव्यांचा कमजास्तपणा आढळून येतो त्याला कारण मुख्यतया हाच उद्देश असला पाहिजे. उद्देश फार स्तुत्य. परमेश्वराची मूर्ती नाही का आपण सुंदर वस्त्राभरणांनी अलंकृत करीत? मूर्तीतच कोरलेली आयुधे व भूषणे ही मूर्तीचे अंग होत. तसे ज्ञानदेवीतील मूळच्या कल्पना व मूळचे शब्द कोणते आणि भक्तभाविकांनी समर्पिलेल्या वस्त्रभूषणांप्रमाणे मागाहून चढविलेला शब्दसाज कोणता हे सूक्ष्म निरीक्षणाने आणि तारतम्यविचाराने ओळखून काढावे लागते.

रोगांचे निदान करावे त्याप्रमाणे ज्ञानदेवीतील पाठभेदांच्या कारणांचे निदान करता आले म्हणजे मूळ पाठ कोणता असावा याचा तर्क करणे सुलभ होते. या सर्व प्रयत्नात पोथ्यांच्या अभ्यासाचा फार उपयोग होतो. निरनिराळ्या पोथ्यांमधील भिन्नभिन्न पाठांची परस्पर तुलना मूलशोधनाच्या कामी मार्गदर्शक ठरते. ज्ञानदेवीच्या पोथ्यांच्या अनेक परंपरा आहेत, हे मागे सांगितले आहे. अनेक परंपरांच्या पोथ्यांमध्ये जो पाठ आढळतो तो मूळ किंवा मुळाशी जवळचा पाठ असण्याचा संभव अधिक. या सर्व परंपरांचे मूलस्थान म्हणजे ज्ञानदेवांनी लिहिलेली किंवा लिहविलेली ज्ञानदेवी. तिच्यापासून भिन्न भिन्न काळी भिन्न भिन्न परंपरा निर्माण झालेल्या असणार. एकनाथी परंपरेचे मूळ, सिद्धनाथ परंपरेचे मूळ आणि पाटांगण परंपरेचे मूळ ही ज्ञानदेवीच्या मूलसंहितेपासून फार प्राचीन काळी फुटून निघाली असली पाहिजेत. तेव्हा या तिहींमध्ये समान असणारा पाठ तितक्या प्राचीन काळापासून चालत आला असला पाहिजे. हे झाले सरळ अनुमान. हे पुष्कळ ठिकाणी कामी पडत नाही. भाषेत झालेले परिवर्तन, लेखक-पाठकांचे प्रमाद व अज्ञान, आणि अलंकरणेच्छू प्रवाचकांचे कल्पनाविलसित यांमुळे नवीन पाठ निर्माण होतात व विशिष्ट परंपरांमध्ये रूढ होतात. पाठमिश्रण सदोदित चालू होतेच. ज्ञानदेवीचा पाठेतिहास पाठमिश्रणाने भरलेला आहे. पण नंतर रूढ झालेल्या पाठांच्या बहुल प्रचारामध्ये जुना पाठ कुठे तरी रेंगाळत असलेला आढळतो. बहुल प्रचाराचा पाठ नवा का आणि एकदोन ठिकाणी रेंगाळणारा पाठ जुना का याचे कारण कुठेतरी मिळण्याजोगे असते. बदल कोणत्या दिशेने होऊ शकेल याचा ताळा करून पाहणे हे देखील पुष्कळ ठिकाणी उपयुक्त ठरते. याची उदाहरणे पुढे पुष्कळ येणार असल्यामुळे इथे विस्तार करीत नाही.

अर्थात हे सर्व पोथ्यांच्या निरीक्षणव्यासंगानेच होऊ शकते. नेहमी आकाशनिरीक्षण करणाऱ्याला ज्याप्रमाणे ग्रह कोणते, तारे कोणते, कोणत्या ताऱ्याचे तेज किती नंबराचे, कोणते तारे कोणत्या महिन्यात दिसतात, इत्यादी गोष्टींची माहिती होते, त्याप्रमाणे पोथ्यांच्या विश्वात रमणाऱ्या अभ्यासकाला कोणता पाठ परंपरांच्या पूर्वीचा, कोणता परंपरेतला, कोणता नव्याने घुसलेला, कोणता प्रमादाने आलेला, हे विचाराअंती ओळखता येते. योग्याच्या इंद्रियदमनाचे वर्णन करताना ज्ञानदेव म्हणतात, 'मग संयमाची धाटी। मुनि मुरडिलें पालवटीं।' (१२-४७) इथे 'पालवटीं' ऐवजी 'यालवटीं' हा पाठ वाचनप्रमादाने आलेला, 'उफराटिं' हा पाठ मूळ शब्द कळेनासा झाल्यामुळे त्याचा फलितार्थ सांगण्यासाठी मागाहून घातलेला, 'आवांटिं' हा पाठ अर्थाच्या दृष्टीने सर्वांत सरस, पण दुजोरा नसलेला—हे सगळे ज्ञान पोथीव्यासक्ताला होऊ शकते.

## पोथ्यांची निवड

अर्थात यासाठी पोथ्यांची निवड काळजीपूर्वक केली पाहिजे. पोथी आढळली की घे पाठनोंदणीला, असे करून चालणार नाही. पोथी मठपती, महंत किंवा स्वामी, साधक अशांपैकी कोणा व्यक्तीने तयार करविलेली किंवा चांगल्या आस्थेवाईक लेखकाने लिहिलेली आणि त्यातल्या त्यात जुन्या काळची असावी ही प्राथमिक गोष्ट. पोथीच्या अन्त्योल्लेखावरून बहुधा तिचा मूळ निष्पादक, प्रत करणारा, इत्यादिकांचे ज्ञान होते. कित्येक पोथ्या मठपती किंवा देवस्थानांचे महंत यांनी लिहविलेल्या असतात अशी मंडळी आपल्या उपयोगाची प्रत करवून घेताना आदर्शाची निवड विचारपूर्वक करीत असतील असे सामान्यतः धरून चालण्यास हरकत नाही. अन्त्योल्लेखावरून ज्या पोथीची योग्यता इष्ट पातळीपर्यंत पोचत असल्याचे दिसून येईल तिच्या अंतरंगाची मग वारीक तपासणी करावयाची. पाठांच्या बाबतीत जर तिचे काही लक्षणीय वैशिष्ट्य असेल, अजाणपणाने किंवा निष्काळजीपणाने उद्भवलेले लेखनप्रमाद एवढेच जिच्या पाठांतरांचे स्वरूप नसेल, अशी प्रत प्रस्तुत कार्यात विचारणीय ठरेल. त्यापुढे मग तो ज्ञानदेवीच्या ज्या मोठ्या पाठपरंपरा पूर्वी सांगितल्या त्यांपैकी कोणत्या परंपरेत बसते, त्या पर-

परेत ती स्वतःचे वैशिष्ट्य दाखविते की दुसऱ्या महत्त्वाच्या प्रतीची केवळ नक्कल आहे, इत्यादी विचार उत्पन्न होतात. अशा सर्व विचारांची चाळणी लावण्याचा प्रयत्न प्रस्तुत कार्यात पाठनोंदणीसाठी प्रत निवडताना होत असतो.

प्रस्तुत कार्यास प्रारंभ करण्याच्या वेळी ज्या हस्तलिखित प्रती मिळाल्या त्यांपैकी बऱ्याचशा पूर्वीपासून नामांकित होत्या. डॉ. हर्षे यांच्या आणि सरकारी आवृत्तीच्या प्रस्तावनेत त्यांचे विवरण आल्यावरून अभ्यासकांना त्या व त्यांची योग्यता स्थूलमानाने ज्ञात होती. श्री. बाळाचार्य खुपेरकर यांच्या मुक्तकृपेने, संचालक भांडारकर संस्था, डेक्कन कॉलेज व भारत इ. सं. मंडळ यांच्या नियमानुसारी कृपेने आणि प्रा. न. र. फाटक यांच्या औदार्याने अशा प्रती पाठनोंदणीसाठी मिळत गेल्या, हे भाग्य ज्ञानदेवांच्या कृपेने या कार्याला लाभले.

प्रतिशुद्ध संहितेच्या कार्याचा आरंभ बाराव्या अध्यायाने झाला हा एक चांगला योगायोग. सगुण भक्तांचे उदात्त वर्णन यात असल्यामुळे गीतेचा बारावा अध्याय पूर्वीपासून सर्वांना विशेष प्रिय; ज्ञानदेवांच्या शैलीगुणांचा येथे परमोत्कर्ष झाला असल्यामुळे ज्ञानदेवीचा बारावा अध्याय अतिशय लोकप्रिय. त्यामुळे यात पाठभेदांची रेलचेल; त्यांपैकी बरेच पाठभेद फार महत्त्वाचे. तेव्हा प्रस्तुत पाठसंशोधनकार्याची कसून कसोटी लागण्याचा यात प्रसंग होता. ज्ञानदेवीचे परिनिष्ठित व्यासंगी व कोशकर्ते श्री. शिवाजीराव भावे यांनी लिहिले, " आपण या कार्यासाठी प्रथम बारावा अध्याय निवडला आहे, त्यामुळे या महत्कार्याचे मंगलाचरण अतिशय समुचित रीतीने झालेले आहे, असाही विचार मनात आल्याखेरीज राहात नाही. "

## पाठसंशोधनासाठी उपयोजिलेल्या प्रती

पाठसंशोधित आवृत्तीत ज्या प्रतींमधील पाठ संग्रहित केले आहेत त्यांची माहिती त्यांच्या सांकेतिक चिन्हांसह प्रथम थोडक्यात देऊ; आणि नंतर प्रत्यक्ष पाठचर्चेला सुरवात करू. संक्षेपास्तव या सांकेतिक चिन्हांचा उपयोग पुढील चर्चेत केला आहे. *१ दांडेकर* प्रत–वारकरी संप्रदायात सध्या प्रचलित असलेला पाठ देणारी संप्रदायातील अधिकारी पुरुष दांडेकर यांनी दुरुस्त केलेली प्रत. सांप्रदायिक पाठाची प्रतिनिधी म्हणून हिचे महत्त्व. सांकेतिक चिन्ह **दा.** *२ माडगावकर* प्रत —रा. वि. माडगावकरांनी १२ पोथ्या जमवून पाठभेद टीपेत देऊन काढलेली आवृत्ती. एका गोष्टीसाठी हिचे महत्त्व अतुलनीय आहे. पैठणाहून एकनाथ स्वामींच्या मठातली शके १५५१ मध्ये लिहिली गेलेली पोथी यांना मिळाली होती व तिचे पाठ यांनी बहुतांशी आपल्या संहितेत दिले आहेत. ( ही पोथी पुढे कोठे गेली न कळे ! ) म्हणजे एकनाथी परंपरेचे बहुतांशी यथातथ्य प्रतिबिंब या प्रतीत आढळते. सां. चि. **मा.** *३ तंजावरी* भारद्वाजी प्रत – शके १५१५. सां. चि. **स.** जिच्या शेवटी लेखनकाल दिलेला आहे अशी आज उपलब्ध असलेली सर्वांत जुनी प्रत. हिच्या शेवटी एकनाथशुद्धीच्या तीन ओव्या आहेत, यावरून ही एकनाथी परंपरेतील ठरते. हिच्यात व *मा* प्रतीत फार साम्य आढळावे हे साहजिक आहे. मात्र हिचे लेखन अशुद्ध आहे. हिच्या शेवटी एकनाथशुद्धीच्या शके पंधराशते, ग्रंथु पूर्वीच, नमो ज्ञानेश्वरा, या तीनच ओव्या आहेत. कदाचित एवढ्याच एकनाथांनी रचिल्या असाव्या. बहुकाळ पर्वणी, ही ४ थी ओवी कोणी तरी मागून घातली असणे संभवनीय आहे. जो ज्ञानेश्वरीपाठी, ही शापोक्ती उच्चारणारी पाचवी ओवी तर एकनाथांची नव्हेच. *४ विप्र* प्रत—ही डॉ. रा. ग. हर्षे यांना श्री. केशव नारायण विप्र यांच्याकडून मिळाली. सिद्धनाथ परंपरेतली ही महत्त्वाची प्रत; शके १५७२ त लिहिली गेलेली. ही परंपरा एकनाथांपेक्षा पूर्वीची असावी. पण हिच्यात आधुनिकीकरण बरेच झाले आहे. हिच्यातील पाठ एकनाथांना ग्राह्य वाटले नसावे. सां. चि. **वि.** *५ शाळिग्राम* प्रत–सिद्धनाथ परंपरेच्या बल्लाळ उपपरंपरेतली महत्त्वाची प्रत. लेखन शक १५७२. सिद्धनाथ परंपरेचे पाठ ज्ञानदेवांच्या मूल रचनेस अनुसरून नाहीत असे एकनाथांना वाटले असावे म्हणून त्यांच्या शिष्याचा शिष्य विप्र बल्लाळ याने सिद्धनाथ परंपरा एकनाथी परंपरेच्या धर्तीवर आणून सोडण्याकरिता तिच्यात फेरफार केले असे दिसते. सां. चि. **शा.** *६ बडवे* प्रत ( सां. चि. **ब.** ) आणि *७ काकाजी कोनेर कुलकर्णी* प्रत ( सां. चि. **का** ) –या दोन प्रती अन्त्योल्लेखावरून सिद्धनाथ परंपरेच्या ठरतात. पण विप्र प्रतीपेक्षा पुष्कळ वेळा या स्वतंत्र व जुने पाठ देतात; पाठतुलनेच्या बाबतीत यांचे महत्त्व कमी नाही. *८ आष्टेकर* प्रत ( **अ** ), *९ तंजावरी* बरवा प्रत ( **सि** ) आणि *१० भांडारकर* संस्थेतील क्र. ७६२ ची प्रत ( **भा** )-या तीन पोथ्या बरवा परंपरेच्या होत. या परंपरेचे वैशिष्ट्य म्हणजे

पदपद्धती. पदपद्धती म्हणजे गीतेच्या श्लोकातील पदे त्या पदांची व्याख्या करणाऱ्या ज्ञानदेवीतील ओव्यांच्या अगोदर घालून देणे. ही पदपद्धती शके १६१३ साली ज्ञानदेवीच्या एकनाथी परंपरेच्या पाठावरून तयार केलेली दिसते. थोडेसे पाठ हिच्यात निराळे आलेले आहेत. एकंदरीने पाठतुलनेच्या बाबतीत ही परंपरा फारशी महत्त्वाची नाही. *११ राजवाडे* प्रत ( **रा** ).– प्राध्यापकांना आणि इतर अनेक विद्वानांना प्रमाणभूत वाटणारी ही प्रत एका परंपरेची प्रतिनिधी आहे. या परंपरेच्या दोन प्रती पाटांगण देवस्थानात मिळाल्या म्हणून सोयीकरिता हिला पाटांगण परंपरा असे नाव दिले आहे. या पोथीतील शब्दरूपे एकनाथपूर्वकालीन, किंबहुना बहुतांशी ज्ञानदेवकालीन भाषेची निदर्शक असावीत. पण इतर पाठ मूळ ज्ञानदेवीला अनुसरून आहेत असे सरसकट विधान करता येणार नाही. या परंपरेच्या पोथ्या एकनाथांनी पाहिल्या असाव्या की नाही याविषयी निश्चित काही सांगता येत नाही. पाहिल्या असून या परंपरेतील पाठ एकनाथांना मान्य नसावे असेही शक्य आहे. 'या परंपरेतील अनेक क्रांतिकारक पाठ मान्य नसल्यामुळे एकनाथांनी हिच्याविषयी नापसंती दर्शविली असेल व त्यामुळे ही मागे पडली असेल. मागे पडल्यामुळे हिच्या नकला फारशा झाल्या नाहीत, त्यामुळे शब्दरूपे जुनी होती तशीच बहुतांशी कायम राहिली. शब्दांचे बदल पुष्कळ होऊनही या परंपरेत शब्दरूपे मात्र खूप जुनी राहिली याचे कारण हे असावे. *१२ तंजावरी अत्रे* प्रत ( **सा** ).—*रा* प्रतीच्या परंपरेत बसणारी पण पुष्कळ वेळा तिच्याहून निराळे मूल्यवान पाठ देणारी ही पोथी तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात आहे. तेथून तिची प्रत करवून आणली. *१३ गोपाळाश्रम* प्रत (**गो**)— पाठसंशोधित आवृत्तीच्या प्रस्तावनेत हिचे विस्ताराने वर्णन केले आहे. पंढरपूरच्या गोपाळाश्रम स्वामींनी ज्ञानदेवीच्या अनेक प्रती मिळवून पाठसंशोधन करून सर्वत्र पूर्वीचे पाठ घालून एक प्रत तयार केली. तिजवरून कृष्णानुचर केशव या दुसऱ्या स्वामींनी शके १६७४ साली एक प्रत तयार केली, ती पाटांगण देवस्थानात होती. तेथून ती अनेकांच्या हाती जाऊन प्रस्तुत पाठसंशोधन कार्यालयात आली आहे. गोपाळाश्रम स्वामींनी पाठसंशोधन फार विचारपूर्वक आणि त्या काळात दुर्मिळ असलेली ऐतिहासिक दृष्टी वापरून केले. राजवाडे प्रतीच्या परंपरेतील पोथी त्यांच्या समोर होती; तिचा त्यांनी भरपूर उपयोग करून घेतला. पण त्या प्रतीच्या जुनेपणाच्या रूपवेषाने ते भुलले नाहीत. योग्य तेथे एकनाथी परंपरेचा किंवा अन्य ठिकाणचा पाठ स्वीकारण्याचा विचक्षणपणा त्यांनी दाखविला आहे. आताच्या पाठसंशोधनकार्यात या पोथीचे महत्त्व अतुलनीय आहे. *१४ न.र. फाटक* प्रत— राजवाडे प्रतीशी अतिशय साम्य असलेली एक प्रत माडगावकरांना पाटांगण देवस्थानातच मिळाली होती, तिजवरून केलेली ही नक्कल. काही महत्त्वाच्या स्थळी ही प्रत आणि राजवाडे प्रत यांच्यात फरक आढळतो. हिच्यातले पाठ अधिक जुने व विश्वसनीय आहेत. खेदाची गोष्ट ही की प्रा. न. र. फाटक यांच्याजवळ असलेली ही नक्कल पार फाटून गेलेली आहे. एकही पान धड नाही आता जाड कागदावर चिकटविलेली फाटकांच्या जवळ सुरक्षित आहे. सुमारे निम्म्या ओव्यांचे पाठ हिच्यात मिळू शकले. ( **न** )

कोणत्याही परंपरेच्या निदर्शक नसलेल्या पण महत्त्वाच्या अशा दोन पोथ्या पाठनोंदणीकरिता घेण्यात आल्या. *५ भांडारकर १* प्रत ( **भ** ). शके १६०८ मध्ये लिहिली गेलेली ही प्रत पाठभेदांच्या दृष्टीने स्वतंत्र व मूल्यवान आहे. पोथीच्या शेवटी कोणीतरी गुरुभक्तीच्या ओव्या रचून घातल्या आहेत. त्यात 'श्रीगुरु तुकया' असा उल्लेख आहे, त्यावरून या पोथीचा परंपरेने तुकोबारायांशी संबंध असावा असा संभव वाटतो. यात पाठमिश्रण बरेच आहे. तरी पण अनेक ठिकाणचे पाठ अत्यंत जुने व विश्वसनीय असावेत असे इतर आधारांवरून दिसून येते. कोणत्याही परंपरेच्या दर्शक ओव्या हिच्या शेवटी नाहीत. *१६ जालिंदरे* प्रत ( **जा** )— अतिशय व्यवस्थित शुद्ध लिहिलेल्या या पोथीचा लेखनकाल शके १६१५ आहे. कोणत्याही परंपरेच्या दर्शक ओव्या हिच्या शेवटी नाहीत. हिच्यातील पुष्कळसे पाठ एकनाथी परंपरेशी जुळतात; तथापि कित्येक ठिकाणी ही स्वतंत्र किंवा पाटांगण किंवा सिद्धनाथ परंपरेशी जुळणारे पाठ देते. उपोद्वलक पुरावा किंवा तिऱ्हाईत साक्षीदार म्हणून हिचा उपयोग होतो.

( ३ )

### पाठभेदांची चर्चा : पाठनिर्णय

आतापर्यंत वर्णिलेल्या गोष्टींखेरीज इतर गोष्टी प्रत्यक्ष पाठचर्चेत स्पष्ट होतील. तेव्हा तिलाच आता आरंभ करू.

पाठचर्चेची पद्धत अशी : प्रथम प्रतिशुद्ध संहितेतील ओवी क्रमांकासह देऊ. नंतर त्यातील प्रस्तुत लेखात चर्चा-वयाचे पाठभेद नमूद करू. त्यातील पाठांतरांच्या गुणाव-गुणांची प्रतीच्या उल्लेखासह चर्चा त्यानंतर करू आणि विशिष्ट पाठ का निवडला याची कारणे स्पष्ट करू.

*जय जय शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।*
*अनवरत आनंदे । वर्षतिये ॥ १ ॥*

(अ) शुद्धे – सिद्धे

(आ) अनवरत – अनव्रत, अनावृत, अनावरत, अनावतरत, आनंदव्रत.

(इ) वर्षतिये – वरिषतिये, वर्त्ततिये.

पहिल्याच ओवीत तीन महत्त्वाच्या पाठभेदांची विकट समस्या पुढे उभी राहते. (अ) शुद्धे ऐवजी सिद्धे फक्त पाटांगण परंपरेच्या प्रतींमध्ये आहे. बाकीच्या तीन्ही परंपरांच्या सर्व पोथ्यांमध्ये शुद्धे आहे. फक्त *ज्ञा* प्रतीमध्ये मुळात शु लिहायची तयारी केली असून समासामध्ये त्याऐवजी सि लिहिले आहे. पाटांगण परंपरेची एखादी पोथी *ज्ञा* प्रतलेखकाच्या समोर असेल, त्यातून त्याने सिद्धे हा पाठ घेतला असावा. महत्त्वाची गोष्ट ही की पूर्वीचा पाठ कोणता याची साधार चिकित्सा करून पाठनिश्चिती करणाऱ्या गोपाळधर्मांच्या *गो* प्रतीत शुद्धे हा पाठ आहे. तसेच स्वतंत्र मूलगामी पाठ देणाऱ्या *भ* प्रतीत शुधे असाच पाठ आहे. सिद्धे आणि प्रसिद्धे या शब्दांचा अर्थ निराळा, पण दोन्हींमध्ये त्याच धातूचे तेच रूप आहे. सिद्धे शब्द घातल्यानंतर लगेच दुसऱ्या चरणाच्या अंती पुनरुक्तप्राय प्रसिद्धे हा शब्द घालण्यास ज्ञानदेवांचे चोखंदळ कविमन प्रवृत्त होईल असे वाटत नाही. उलट दुसऱ्या चरणातील अक्षरांमुळे नजर चळून पहिल्या चरणात सिद्धे हा शब्द कोणातरी लेखकाने लिहिला असेल व तो योग्य वाटल्यामुळे पुढे त्या पाठाची परंपरा चालू झाली असेल असा संभव अधिक. पुन्हा ४ थ्या ओवीत 'सोहंसिद्धिचे लळे' यात सिद्धि शब्द आला आहे. पोथ्यांच्या पुराव्यास वरील वस्तु-स्थितीचे पाठबळ मिळाले म्हणजे शुद्धे या पाठाची बाजू दृढ होते.

अर्थाच्या दृष्टीने पाहिल्यास दोन्ही पाठांत सरसनिरस ठरविणे कठीण आहे. ज्ञानदेवीतील पाठभेदांचे विकटपण नेहमी यातच असते की दोन्ही पाठ अर्थाच्या दृष्टीने तुल्यबल असतात. म्हणून हस्तलिखितांचा पुरावा निर्णयाच्या दृष्टीने महत्त्वाचा. आतापर्यंत झालेली चर्चा बहुतांशी छापील प्रतींवरून अर्थाच्या योग्यायोग्यतेच्या आधारे झाली, किंवा विशिष्ट प्रतीचे प्रमाणत्व गृहीत धरून झाली. त्यामुळे निर्णयाच्या दृष्टीने प्रगती होऊ शकली नाही.

(आ) इथे पाठांतरांचा गलबला आहे. *मा* व कुंटे या छापील प्रतींमध्ये अनवरत असे आहे. माडगावकरांना मिळालेल्या एकनाथांच्या पैठण मठातील अती जुन्या पोथीत व *स* प्रतीत अनव्रत आहे. त्यावरून हा एकनाथी परंपरेचा मूळ पाठ असावा असे दिसते. पण अर्थाच्या दृष्टीने अनव्रत हे रूप नीट नाही. एका बाजूने तो अनवरत हा शब्द असू शकेल किंवा दुसऱ्या बाजूने अनावृत असाही असू शकेल. अनावृत हा पाठ पाटांगण परं-परेच्या *सा* प्रतीमध्ये आहे. त्याच्याशी जवळ येणार अनाव्रत हा पाठ *ज्ञा का* प्रतींमध्ये आहे. अनावृत याचा लपून न राहिलेला, उघड, वर दिसणारा, हा अर्थही चांगला आहे. पण वर्षतिये या क्रियेशी तो तितकासा जुळत नाही. अनवरत म्हणजे एकसारखा, निरंतर हा अर्थ वर्षाव करणे या क्रियेला जुळणारा. तेव्हा अनव्रत म्ह॰ अनवरत असेच ज्ञानदेवांचे उद्दिष्ट असणे अधिक संभव-नीय. खुद्द 'अनवरत' हा पाठ बरवा परंपरेत सर्रास आणि *जा* प्रतीमध्ये आहे. म्हणजे त्याला तीनशे वर्षांची परंपरा आहे, शिवाय पाठसंशोधित *गो* प्रतीत तोच आहे. त्याचा उच्चार ज्ञानदेव नव्हेत, पण नंतरच्या काळात अजाणपणाने अनव्रत असा कित्येक लोक करीत असतील. दोन्ही उच्चारांमध्ये अंतर फार थोडे, लक्षात न येण्याजोगे. अनवरथ याचे अनव्रत हे रूप ज्ञानदेवीत इतरही येते. उ. १८·१७७५.

(इ) वर्त्ततिये हा पाठ फक्त *रा* व *न* (आधार मंगरूळकर–केळकर आवृत्ती) प्रतीत आहे. पाटांगण परंपरेची *सा* प्रत देखील हा पाठ देत नाही. अर्थात इतरत्र कुठेही नाही. अर्थाची दृष्टी प्रधान नव्हे; पण गौण म्हणून विचार केला तरी अर्थाच्या दृष्टीने वर्षतिये हा पाठ सरस होय. वर्षतिये याला कर्म पाहिजे, आनंदे हे तृतीयान्त पद कर्म होऊ शकत नाही, असा या पाठावर आक्षेप काढला जातो. पण आनंद हे वर्षावाचे श्रेष्ठ (उपादान) साधन आहे. 'साधकतमं करणम्' या पाणिन्युक्त व्याख्येनुसार ते करण असून त्याची तृतीया होऊ शकते, हे लक्षात घेतल्यास हा आक्षेप राहात नाही.

*विषयव्यालें मिठी । दीन्हलियां नुठी ताठि ।*
*ते तुझिये कृपादृष्टि । निर्विष होये ॥ २ ॥*

(अ) नुठी ताठि–उठणें नाहिं ताठि
(आ) ते तुझिये–तूझेनि वो
(इ) कृपादृष्टि–गुरुदृष्टी, गुरुकृपादृष्टी
(ई) निर्विष होये-होए माए.

(अ) उठणे नाहि ताठि हा पाठ फक्त *रा न* प्रतीत आहे. इतर कुठे नाहीच, पण पाटांगण परंपरेच्या *सा* प्रतीतही नाही. अर्थ तोच असून शब्दगौरव मात्र आहे. ज्ञानदेव शब्दलाघवाने अर्थगौरव साधणारे कवी आहेत. तस्मात् *रा* प्रतीतील पाठ स्वीकार्य ठरत नाही. नुठणे–नूठणे हे क्रियापद ज्ञानदेवीत पुष्कळ वेळा येते. नकारी क्रियापदे ही ज्ञानदेवांची विशिष्ट लकब आहे.

(आ) तूझेनि हा फक्त पाटांगण परंपरेत आणि वो फक्त *रा* प्रतीत (कदाचित तिच्या जावळ्या *न* प्रतीत) आढळतो. हे अर्थदृष्ट्या जरी उजवे असले तरी अर्थाचा मुद्दा गौण असल्यामुळे ते स्वीकारण्याचा प्रश्न पडतो. पहिल्या ओवीतील विशेषणांना गुरुमाउली असे विशेष्य अध्याहृत घेतले म्हणजे अर्थ सुसंबद्ध होतो. तुझिये याचा संबंध गुरुमाउलीकडे लागेल.

(इ) तुझिये हे सर्वनाम गुरुमाउलीला उद्देशून आहे असे मानिले म्हणजे कृपादृष्टि हाच पाठ सुसंगत ठरतो. 'गुरुकृपा दृष्टि' असा पाठ *दा स शा ब भ जा* इतक्या प्रतींमध्ये आढळतो. 'कृपादृष्टि' हा पाठ *मा अ सा वि का* या प्रतींमध्ये आढळतो. म्हणजे दोन्ही साधारण तुल्यबल आहेत. गुरुदृष्टि हा पाठ *रा गो* (कदाचित *न*) या प्रतीत आहे. तूझेनि वो हा पाठ म्हणजे *रा* (*न*) प्रतीने केलेली सुधारणा असावी; असे वाटण्याचे कारण *गो* प्रतीत तो नसून तुझिये हाच आहे. हा पाठ जर मुळापासून आला असता तर त्यामुळे अर्थ सुसंगत लागत असताही तो नाकारण्याचे एकनाथ किंवा गोपाळाश्रम या पाठसंशोधकांना काही कारण नव्हते. ते इतके निर्बुद्ध किंवा आडमुठे असतील असे का मानावे? गोपाळाश्रमांनी तरी पाटांगण परंपरेच्या पोथ्यांचा उपयोग केल्याचे सिद्ध आहे. कवी कित्येक वेळा काही कल्पना अध्याहृत घेतो. पहिल्या दोनतीन ओव्या रचताना ज्ञानदेवांच्या मनात गुरु आणि गुरुकृपा या दोन्ही कल्पना एकरूप वावरत असाव्या. गुरुकृपा हीच माउली हे रेखीव रूपक तिसऱ्या ओवीपासून दृढ झाले.

(ई) 'निर्विष होए' या ऐवजी 'होये माए' हा पाठ फक्त *रा* (कदाचित *न*) प्रतीत आहे. पाटांगण परंपरेतही सर्वत्र नाही.

*तरि ताप कवणातें पोळी । कैसेनि शोक जाळी ।*
*जरि प्रसादरसकल्लोळीं । पूरें येसि तुं ॥ ३ ॥*

शोक-सोसु

दोन्ही पाठ अर्थाच्या दृष्टीने समर्पक आहेत. तेव्हा नेहमीची विकट समस्या इथे आहे. पण सोसु हा पाठ *रा* (कदाचित *न*) प्रतीखेरीज कुठेही नाही. *गो भ* यांतही नाही. सोस म्हणजे हव्यास, हावरेपणा, अति अभिलाष; जाळी या क्रियेबरोबर हा तितकासा जुळत नाही.

*आधारशक्तिचां अंकिं । वाढविसि कवतिकिं ।*
*हृदयकोशपालकिं । परियें देसि ॥ ५ ॥*

(अ) हृदयकोश–हृदयाकाश
(आ) परियें देसि–हालविसि पैं [निजें]

(अ) हृदयकोश की हृदयाकाश? हृदयाच्या संबंधाने दोन्ही कल्पना समर्पक होऊ शकतात. पण पालक म्हणजे पाळणा; निर्लेप आणि निराकार, सर्वत्र भरलेले असे जे आकाश त्याच्यावर पाळण्याची कल्पना करणे तितकेसे उचित नव्हे. कोश म्हणजे पुष्पाचा अंतर्भाग. अर्धोन्मीलित कमळाप्रमाणे असलेला हृदयाचा अंतर्भाग हाच कोणी पाळणा. साधकाचे हृदयकमल सोहंबोधाने उमलत आहे, तो आत्म्याचा दोलायमान आनंदाचा प्रत्यय आहे; हा सूक्ष्म संवेदनेचा ध्वनी इथे आहे. हृदयाकाश पाठाचे योगसाधनेच्या अनुभवाला अनुसरून विशदीकरण श्री.मोरेश्वर उर्फ बाबा महाराज माचणूरकर यांनी आपल्या 'दिव्यामृतधारे'त (३९५–९७) केले आहे. एकनाथी परंपरेत हाच पाठ सार्वत्रिक दिसतो. पण *गो* प्रतीत हृदयकोश आहे आणि *ब* प्रतीत हृदयकोश आहे. यावरून सिद्धनाथ परंपरेत प्रथम 'हृदयकोश' असून एकनाथी परंपरेच्या प्रभावाने 'हृदयाकाश' झाले असावे की काय अशी शंका येते.

(आ) परियं देसि निजें असा पाठ *स मा* मध्ये आहे. तोच खरा एकनाथी परंपरेचा पाठ. त्याऐवजी हालविसी पैं हा पाटांगण (*रा* प्रत) व सिद्धनाथ या परंपरांमध्ये रूढ झाला असावा. हे सुलभीकरण किंवा सुधारणावाद होय. परियं हा काव्यात्म शब्द ज्ञानदेव-

काली चांगला प्रचलित होता, तत्कालीन महानुभावीय काव्यांमध्ये तो आढळतो.

डोळस आंगें वेल्हाल। गोपी परीयं दताति ॥ ६४॥
एकि गात श्रीकृष्णचरित्रातें। परियं दती वालकांतें ॥३१२॥
दामोदर, वछाहरण (कोलते आवृत्ति)

नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवरामध्येही (९) हा शब्द आला आहे. हा शब्द नपुंसकलिंगी दिसतो. झोका हा त्याचा अर्थ आहे; वत्सलतेचा भाव त्यातून प्रतीत होतो. पुढे भाषेतून हा शब्द लुप्त होऊ लागला व कळेनासा झाला. तेव्हा ज्ञानदेवीत परियें देसि ऐवजी हालविसी असा पर्यायी वदल करण्यात आला. हा शब्द कळेनासा झाला याला प्रमाण हे की पुढे वछाहरणावर जो टीप ग्रंथ तयार झाला त्यात परियं याचा अर्थ चुम्वने असा दिला आहे. एकनाथी भागवतात हा शब्द येतो; त्यांनी जुन्या काव्यांच्या दृढ संस्कारामुळे तो वापरला असावा. अशा मंडळीमध्ये त्या काळी तो थोडासा परिचित असेल. ही गोष्ट स्पष्ट आहे की ज्ञानदेवांचा मूळ पाठ जर 'हालविसि' असता तर त्याऐवजी मागाहून 'परियें देसि' असा वदल कोणीही करणे अशक्य आहे. एकनाथांनी हा वदल केला असेल असे मानणे म्हणजे त्यांच्यावर भलताच आरोप करणे होईल. जुन्या काव्याच्या व भाषेच्या संस्कारामुळे योग्य ती दृष्टी आली असल्यामुळे त्यांनी 'परियें देसि' हा जुना पाठ कायम ठेवला हीच खरी गोष्ट असली पाहिजे. एकनाथी परंपरेखेरीज हा पाठ भ जा या स्वतंत्र प्रतीत आढळतो आणि विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे गोपाळाश्रमांनी हाच स्वीकारला आहे. पूर्वीचा पाठ कोणता याचा वारकाईने विचार त्यांनी केला होता.

राजवाडे प्रत ही सर्वत्र प्राचीनतम पाठ देणारी नसून तिच्यात कित्येक नवे परिवर्तित पाठ आढळतात, हे ज्यांच्यावरून निःसंशय सिद्ध होते अशा पाठांमध्ये हा महत्त्वाचा पाठ होय. प्रचारातून जात चाललेल्या शब्दावद्दल हा आलेला असल्यामुळे त्याचा प्रसार पुष्कळ झाला. पाटांगण परंपरेप्रमाणे सिद्धनाथ व वरवा परंपरांमध्ये तो रूढ झाला. एकनाथी परंपरेच्या पुढे पुढे झालेल्या प्रतींमध्ये तो शिरला.

*प्रत्यग्ज्योतिची वोवाळणी। करिसि मनपवनाचिं खेळणी।*
*रिद्धिसिद्धिचें बाळलेणीं। लेवविसि ॥ ६*

**रिद्धिसिद्धिचिं–आत्मसुखाचीं**

आत्मसुखाचीं हा पाठ पाटांगण परंपरेखेरीज सर्वत्र आहे. पाटांगण परंपरेत मात्र ऋ [रि]द्धिसिद्धिचिं हा पाठ निरपवाद आहे व गोपाळाश्रमांनी तो स्वीकारला आहे. याच्यावाहेर या पाठाची पोथी अद्याप एकही आढळली नाही. हा पाठ मूळचा का असावा आणि त्याच्या जागी आत्मसुखाचीं हा का आला असावा या दोहोंची कारणे तर्किता येतात. वाळलेणी ह्या वाह्य शोभेच्या वस्तू; काही काळ घालून त्या काढून ठेवायच्या. त्यात धोकाही असतो. रिद्धिसिद्धींची गोष्ट तशीच आहे. साधकाला योगमार्गात त्या प्राप्त होतात; अलंकारांप्रमाणे त्या वाह्य शोभेच्या वस्तू होत. त्यात गुंतून पडल्यास धोका असतो. याच्या उलट आत्मसुख हे सर्वश्रेष्ठ साध्य! वाळलेण्यांचे रूपक त्याच्यावर करणे तात्त्विक दृष्ट्या अप्रशस्त. योगसाधनेच्या शेवटी प्राप्त होणारे आत्मसुख त्या मार्गाच्या मधल्या टप्प्यात घालून देणे हेही औचित्यास धरून नाही. तेव्हा आत्मसुखाचीं हा पाठ ज्ञानदेवांचा नसून रिद्धिसिद्धिचिं हाच त्यांचा खरा. मग आत्मसुखाचीं हा पाठ आला कसा? भक्तिमार्गी लोकांची सर्वसाधारण समजूत अशी की रिद्धिसिद्धि या सर्वस्वी त्याज्य. योग्याच्या मार्गात त्या आडव्या येतात असे वर्णन याच अध्यायात पुढे (६१) आले आहे. तेव्हा त्यांच्याविषयी गुरुकृपेने प्राप्त झालेल्या शोभादायक वस्तू म्हणून अनुकूल भाव या ठिकाणी ज्ञानदेव कसा दाखवितील, असे वाटून त्यांच्याऐवजी आत्मसुखाचीं हा काही तरी पाठ केव्हा तरी घुसविण्यात आला. रिद्धिसिद्धींच्या मोहात गुंतल्यास त्या घातक खऱ्या, पण गुरूच्या कृपाछत्राखाली साधना करणाऱ्यास त्यांचाही उपयोग प्रगतीसाठी करून घेता येतो.

हा तारतम्य विचार अवघड आहे. मुळात जर आत्मसुखाचीं असे ज्ञानदेवांनी लिहिले असते तर इतका विचार करून त्याऐवजी रिद्धिसिद्धिचिं असा शब्द घालण्याचे धारिष्ट कोणी केले नसते. आत्मसुख आणि वाळलेणीं यामधील वचनभेदही या पाठाच्या विरुद्ध जातो. इथे पाटांगण परंपरेने मूळ पाठ रक्षिला असे आपणास दिसते.

*साहित्यसोनेयाचिया खाणी*
*उघडावे देशियेचिया अक्षोणी ॥*
*विवेकवल्लीची लावणी। हों देई सेंध ॥ १२*

(अ) देशियेचिया – निदेलीयेचिया

(आ) अक्षोणी – आक्षोणी, क्षोणीं, क्षोणी, अक्षो [क्षौ] हिणी

(अ) 'निदेलीयेचिया' हा पाठ अकोल्याचे प्रा. म. रा. जोशी यांना मिळालेल्या एकनाथी परंपरेच्या जुन्या पोथीत आहे. या पोथीची पुरती निरीक्षा अद्याप व्हावयाची आहे. पण हा पाठ विलक्षण व कुतूहल-जनक म्हणून इथे निवेदिला आहे.

(आ) हा चांगलाच कूटात्मक पाठभेद आहे. इथे मूळ शब्द क्षोणी आहे असे मानून त्याचा पृथ्वी असा अर्थ अनुवादकारांनी व टीकाकारांनी केला आहे. अक्षोणी यातील 'अ' हा आदिस्वरागम मानून अजागलस्तनाप्रमाणे त्याची वासलात लावण्यात आली. संपादकाच्या या विचाराला पुष्टी देणारा प्रत्यक्ष क्षोणी (=पृथ्वी) हा पाठ काही पोथ्यांमध्ये आहेच. वरवा परंपरेमध्ये तो आहे. *मा* प्रतीत आहे.

पण वरवा परंपरा सर्वांत अलीकडची आहे. आणि *मा* प्रतीत स्वीकृत संहितेत जरी क्षोणी असले, तरी पैठण-मठीय एकनाथी पोथीचा (क) त्यांनी टीपेत दिलेला पाठ अक्षोणी आहे. तिच्या खालोखाल अधिमान्य पोथी *ग* हिच्यात अक्षौहिणी आहे. माडगावकरांनी जमविलेल्या १२ पोथ्यांपैकी ९ पोथ्यांमध्ये अक्षोणी, अक्षौहिणी इ. अकारादि पाठ आहेत. हा अकार केवळ स्वरागम आहे हे म्हणणे बरोबर नाही. उच्चारसौकर्यार्थ आरंभीच्या जोडाक्षराच्या अगोदर स्वर लावण्याची हिंदीत जशी पद्धत आहे (इस्त्री, अस्तुति) तशी मराठीत नाही. क्षोणी असा शब्द *रा* प्रतीत इतरत्र (१३·४२५; ११-२३) आलेला आहे आणि क्षेम, क्षोभ असे कितीतरी क्षादि शब्द ज्ञानदेवीत आले आहेत त्यांना 'अ' चिकटविण्याची जरुरी भासलेली नाही.

पैठणमठीय प्रतीप्रमाणे *स* प्रतीत अक्षोणीं (बिंदु निरर्थक) असा पाठ असल्यामुळे एकनाथी परंपरेचा अक्षोणी हा पाठ ठरतो. पाटांगण आणि सिद्धनाथ परंपरांमध्येही तोच पाठ आहे. तेव्हा खरा पाठ अक्षोणी हाच. त्यात स्वरागम वगैरे काही नाही. अक्षोणी म्हणजे काय? अक्षोणी हे अक्षौहिणी याचे संक्षिप्त रूप त्या काळच्या भाषेत प्रचलित होते असे दिसते. शके १२१४ मध्ये रचलेल्या नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवर नामक काव्यामध्ये हा शब्द आलेला आहे.

नवल रागरंगाची विनी :
आणीचि रंगीं रसाची जिनीं :
वेगळीचि रसीं माधौर्याची अक्षोणीं : अनुपम्य हे ३४७
—कोलते आवृत्ती.

(वस्तूंचा) खूप मोठा समुदाय, दाटी, खेचाखेच, अशा अर्थी हा शब्द येतो. डॉ. कोलते यांनी समूह असा अर्थ वरील स्थली दिलेला आहे. किंबहुना वर निर्दिष्ट केलेल्या ज्ञानदेवीतील १३·४२५ या स्थली *रा* प्रतीत क्षोणी आहे, तो देखील रूपबदलाने हाच शब्द याच अर्थाने आहे; ११·२३ या स्थली त्याचा साक्षात अक्षौहिणी (सैन्यसमूह) असा अर्थ आहे व सांप्रदायिक प्रतीत या ठिकाणी प्रत्यक्ष अक्षौहिणी असा पाठ आहे. तेव्हा ज्ञानदेवीच्या प्रस्तुत ओवीमध्ये अक्षोणी म्हणजे क्षोणी म्हणजे पृथ्वी अशी जी लापनिका अनुवादकांनी व संपादकांनी केली आहे ती निर्मूल. अक्षोणी म्हणजे मोठा समुदाय, विपुलता 'देशियेचिया अक्षोणी (सप्तमी) साहित्यसोनेयाचिया खाणी उघडवी' असा जो पहिल्या दोन चरणांचा अन्वय आजवर केला गेला आहे तसा तो नसून 'साहित्य-सोनेयाचिया खाणि (सप्तमी) देशियेचिया अक्षोणी (कर्मार्थी द्वितीया) उघडवि' असा खरा आहे. साहित्य म्हणजे काय? मनात स्फुरणारे भाव किंवा संस्काररूपी साधनसामग्री. बाबा महाराज माचणूरकर यांनी 'साहित्य म्हणजे जीवनोद्यानात, मनाच्या भूमीवर उगवणारी, उमलणारी, फुलणारी अनंत संस्कारकुसुमे होत' असे साहित्य शब्दाचे सुंदर विवरण केले आहे. (दिव्यामृत-धारा, पान ४९२.) देशी म्हणजे 'मऱ्हाटे बोल', म्हणजे मराठी भाषारूपाने प्रकट झालेले वाङ्मय असा फलितार्थ. 'मनातील भाव किंवा संस्कार हेच कोणी सोने. त्यांच्या खाणीमध्ये देशीचे म्हणजे देशी भाषेत रचलेल्या वाङ्मयाचे वैपुल्य प्रकट कर.'—असा या दोन चरणांचा अर्थ होतो.

या ठिकाणी गोपाळाश्रम स्वामींनी जे केले ते अनेक दृष्टींनी उद्बोधक आहे. आधुनिक संपादकांप्रमाणे त्यांनाही क्षोणी=पृथ्वी असाच अर्थबोध झाला. त्यांनी तोच पाठ स्वीकारला आणि तो सप्तम्यन्त म्हणजे क्षोणीं (सानुस्वार) असा घेतला. मागील षष्ठ्यन्त विशेषणाचे रूप या विशेष्याला जुळेल असे स्वीकारले. अशा रीतीने व्याकरणाच्या दृष्टीने काटेकोर छाननी करणाऱ्या संपादकांकडून प्रथम श्रेणीचे गुण मिळवील असा 'देशिचियें क्षोणीं' असा

पाठ त्यांनी तयार केला. पण हे मुळापासून फार दूर गेले. आज आपल्यापाशी जी सामग्री व दृष्टी आहे ती गोपाळाश्रमांपाशी नव्हती. ते चतुर होते, विद्वान होते, सूक्ष्मदर्शी होते. पण महानुभावीय ग्रंथ त्यांना उपलब्ध नव्हते आणि त्यांचे व्युत्पत्तिशास्त्र आजच्याइतके प्रगत नव्हते. तेव्हा अशा एखाद्या ठिकाणी त्यांचा प्रयत्न अव्हांटा जाण्याचा संभव असतो. ' मानवाचे ज्ञान दिवसें-दिवस प्रगत होत आहे. तुलनात्मक आणि ऐतिहासिक दृष्टींमुळे पुष्कळ अज्ञात गोष्टींवर प्रकाश पडू शकतो ' असे पाठसंशोधित आवृत्तीची आवश्यकता प्रतिपादन करताना प्रस्तुत लेखकाने म्हटले, त्याचा अशा ठिकाणी प्रत्यय येतो.

*श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करि सरतें ।*
*राणिवे बैसावें श्रोते । श्रवणाचिये ॥ १५*

गुणीं — चरणिं; सरतें — वसतें.

चरणिं, वसतें हे दोन्ही पाठ फक्त रा व न प्रतीत आहेत. न प्रतीचा पुरावा स्वतंत्र म्हणून ग्राह्य धरण्याजोगा नाही. म्हणजे खरोखर एकाच प्रतीचा आधार या पाठांना आहे. अर्थाच्या दृष्टीने पाहिले तर प्रत्यक्ष श्रीकृष्णमूर्तीचे इथे सान्निध्य नसल्यामुळे चरणिं असे म्हणण्यात स्वारस्य राहात नाही. शिवाय सर्वत्र या शब्दाला काही अर्थ राहात नाही. श्रीकृष्णचरणिं असे म्हटल्यानंतर आणखी सर्वत्र म्हणजे कुठे ? सर्वत्र या शब्दावरून चरणिं हा पाठ खरा नसला पाहिजे असे सबळ अनुमान होते. चरणिं हा पाठ गेला की त्याच्या-बरोबर वसतें हा पाठही गेलाच. सरतें या पाठाच्या अर्थासंबंधी चर्चा झाली आहे. मान्य, योग्य, समर्थ, अशा प्रकारचे याचे अर्थ होतात, आणि त्याच्या संबंधात सप्तमी विभक्ती येते असे दिसते. श्रीकृष्णाच्या गुणांच्या संबंधात, म्हणजे श्रीकृष्ण गुणांचे ग्रहण करण्यास मला योग्य, समर्थ कर, असा अर्थ.

अर्थाचा मुद्दा अनुषंगाने आला. वास्तविक प्रतींच्या आधारावर एखादा पाठ स्वीकरणीय ठरत असला तर अर्थाच्या मुद्द्यावरून तो सहसा अव्हेरता येणार नाही.

बाराव्या अध्यायाचा प्रास्ताविक भाग, म्हणजे गुरु-कृपादृष्टीला उद्देशून केलेले मंगलाचरण, १९ ओव्यांचे आहे. या भागातील महत्त्वाच्या पाठभेदांची चर्चा एथवर केली. शब्दांची रूपे किंवा संबोधनाची अव्यये यांच्या संबंधाने आढळणारी पाठांतरे चर्चेसाठी घेतली नाहीत. यच्चयावत पाठांतरांची चर्चा करावयाची म्हटल्यास एकेका ओवीवर एकेक निबंध होऊ शकेल. जुन्या महत्त्वाच्या प्रतींमधून आढळणारी विविध शब्दरूपे, ऱ्हस्वदीर्घ अनुस्वार यांचे फरक, इत्यादिकांचे संकलन करून त्यांचा भाषाशास्त्राच्या दृष्टीने विचार व्हावयास पाहिजे. तो एक निराळा, विस्तीर्ण अभ्यासविषय आहे. सध्या चर्चेला घेतलेले शब्दबदलाचे पाठभेद यांच्या बाबतीत आपण प्रास्ताविकाच्या अखेरपर्यंत आलो आहो. पुढच्या भागात पाठभेदांची इतकी दाटी नसली तरी महत्त्वाचे पाठभेद अनेक आहेत. त्यांचा परामर्श पुढच्या खेपेस घेऊ.

( अपूर्ण )

•••

अनुक्रमणिका

# युगान्त ( ग्रंथसमीक्षा )*

● वा. रं. सुंठणकर ●

भारतीय जीवनात महाभारत या ग्रंथाला अनन्य-साधारण महत्त्व आहे. इतिहास, पुराणकथा आणि महाकाव्य यांचे ते भांडार आहे. त्यात धर्माधर्म, नीती अनीती, नित्यनैमित्तिक आचारविचार यांचे विवेचन प्रसंगानुरोधाने आले आहे. त्यामुळेच महाभारतकार असा दावा करतात की, ' यदिहास्ति तदन्यत्र, यन्नेहास्ति न कुत्रचित् ' महाभारताला. ' पाचवा वेद ' असेही म्हणण्याची प्रथा आहे.

या वैशिष्ट्यामुळे महाभारत चिरकालीन अभ्यासाचा आणि विवेचनाचा विषय झाला आहे. इतिहासकालात या ग्रंथापासून राजे-महाराजे, संत-महंत आणि सामान्य जन यांना सारखीच स्फूर्ती मिळत आली आहे. त्यातील गीताधर्माने हिंदू समाजाला पडत्या काळात सावरून धरण्याचे कार्य केले आहे. या ग्रंथावर टीकावाङ्मय ही खूपच निर्माण झाले आहे. इंग्रजी अमदानीतही ही परंपरा चालू राहिली आणि निरनिराळ्या दृष्टिकोणांतून त्याचे अध्ययन सुरू झाले. प्रारंभी या अध्ययनाचे स्वरूप आपल्या प्राचीनत्वाचा शोध घेणे, पाश्चात्यांच्या तुलनेने आपला भूतकाल कोणत्याही दृष्टीने कमी नसून तो उज्ज्वल व श्रेष्ठ आहे, भारतीयांची परंपरा आणि प्रतिमा स्वतंत्र आहेत हे सिद्ध करण्याचे होते. त्यामुळे आपल्या अस्मितेची आणि प्राचीनत्वाची जाणीव भारतीयांना झाली. गेल्या पिढीत भारताचार्य चिं. वि. वैद्य, राजाराम-शास्त्री भागवत, डॉ. भांडारकर, महादेव मोरेश्वर कुंटे, पं. सातवळेकर, ' भारतीय युद्धा 'चे लेखक लिमये, ' भारतीय उपकथा 'कार श्री. द्रवीड, ज्ञानकोशकार आणि विविधज्ञान विस्तारासारखी मासिके यांनी महाभारताचे विवेचन विविध अंगांनी केले. या विद्वान मंडळीच्या समीक्षणाच्या पार्श्वभूमीवर गेल्या ७८ वर्षांत नव्या दृष्टि-कोणातून महाभारताची समीक्षा सुरू झाली आहे. जुनी भाविक दृष्टी जाऊन चिकित्सक दृष्टीतून महाभारताचे नव्याने मूल्यमापन होत आहे. याचे प्रत्यंतर श्रीमती दुर्गाबाई भागवत यांचे ' व्यासपर्व ' श्री शं. के. पेंडसेकृत ' महाभारताचे व्यक्तिदर्शन ' श्री आनंद साधले यांचे ' हा जय नावाचा इतिहास आहे, ' प्रेमाबाई कंटक यांचे ' महाभारत–एक मुक्त चिंतन ' आणि डॉ. इरावतीबाई कर्वे यांचे ' युगान्त ' या पुस्तकांवरून येते. या सर्वांमध्ये ' युगान्त 'चे स्थान वेगळे आणि वैशिष्ट्यपूर्ण आहे.

डॉ. इरावतीबाई कर्वे यांनी महाभारतावर वेळोवेळी जे लेख प्रसिद्ध केले, ते संकलित करून ' युगान्त ' रूपाने सर्वांपुढे पुनः ठेवले आहेत. त्यामुळे त्यांच्या विवेचनाचा साकल्याने विचार करणे सोईचे झाले आहे. या पुस्तकात एकंदर १० प्रकरणे असून त्यातील ८ प्रकरणे व्यक्ति-चित्रणे आहेत. पैकी तीन स्त्रियांवरची आहेत. नववे प्रकरण खांडववन दहन आणि मयसभा या घटनांवरचे आहे. १० व्या प्रकरणात इरावतीबाईंच्या भारत समीक्षणाचे निष्कर्ष आले आहेत. ही प्रकरणे १९६२ ते १९६७ च्या दरम्यान वेळोवेळी लिहिली असली, तरी त्यातून महाभारतकथा आणि तत्कालीन समाजस्थिती सुसंगतपणे आपल्यासमोर उभी राहतात. भारतीय युद्ध म्हणजे इतिहासातील एका युगाचा अंत आहे ही दृष्टी समोर ठेवून इरावतीबाईंनी महाभारताचे विवेचन केले आहे. हे विवेचन त्यांनी आत्मविश्वासाने केले आहे. त्या म्हणतात, " बाईचे विवेचन चुकले ' असे म्हणता येणार नाही. ' पटत नाही ' असे जरूर म्हणता येईल. " भारतीय युद्धाचा काल त्यांनी इ. स. पूर्व १०००—१२०० असा मानला आहे. तो बरोबर आहे असे धरून चालण्यास हरकत नाही. त्यांच्या मते दाशराज्ञ युद्धाचा शेवट ते भारतीय युद्धाचा शेवट असे एक युग झाले असून त्याचा ' युगान्त ' त्यांनी वर्णिला आहे. ' महाभारत म्हणजे त्या काळातले एका विशिष्ट वर्गातील लोक कसे राहात असत याची जंत्रीवजा माहीती नसून एक विशिष्ट कुटुंब घेऊन त्याच्या अनुषंगाने त्या काळचे जीवन व विचार यांचे खोल व व्यापक चित्रण ज्यात आहे अशी एक दीर्घ कथा आहे; अशी त्यांची धारणा आहे. हे व्यापक

* ले. डॉ. इरावती कर्वे-प्रकाशक : रा. ज. देशमुख, देशमुख, आणि कं. पुणे, पृ. २८८, किं. रु. १२

चित्रण टिपून घेण्याचा त्यांचा प्रयत्न यशस्वी झाला आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही. त्यांच्या या प्रयत्नांची पार्श्वभूमी त्यांच्याच शब्दात सांगावयाची झाल्यास ' हा फक्त वाङ्मयीन शोध नव्हे. आपल्या सांकृतिक मुळांचा हा शोध आहे, या पार्श्वभूमीवर त्यांनी महाभारतकालीन स्थितीचे चित्र रेखाटले आहे.

इरावतीबाईंनी महाभारताचे विवेचन करताना, 'भांडारकर आवृती'च आधाराला घेण्याची दक्षता बाळगली आहे. मूळच्या महाभारतात प्रक्षिप्त भाग कोणते असावेत याचे त्यांनी अवधान बाळगल्यामुळे त्यांचे विवेचन अधिक वास्तव झाले असून त्यात कल्पनारंजनाला फारसा वाव राहिला नाही. महाभारतकालीन समाजस्थितीचे चित्र जसेच्या तसे त्या पाहू शकल्या आहेत. वाचकासमोर उभे करू शकल्या आहेत. त्यांच्या या वास्तववादामुळे आणि चिकित्सक दृष्टीमुळे त्यांची व्यक्तिचित्रणे आणि स्वभाव-विश्लेपणे जशी उठावदार वठली आहेत, तसेच त्यांचे युगान्ताचे समीक्षणही मनोज्ञ झाले आहे.

भारतीय युद्धाच्या मूळ ऐतिहासिक घटनेवर ' जय ' नावाचा इतिहास व्यासांनी २४००० श्लोकांत महाकाव्याच्या रूपात लिहिला. त्यावर पुढच्या काळात वेळोवेळी संस्करणे होऊन तो ग्रंथ एक लाखाच्या घरात गेला. ही संस्करणे करणाऱ्या कवींनी इतिहासाचे अनुसंधान न बाळगता आपल्या काळाचे पूर्वग्रह, आचारविचार, आख्यायिका व दंतकथा त्यात घुसडून दिल्या. त्यामुळे त्यांच्या काळाची प्रतिबिंबे त्यात मधूनमधून उमटली आहेत. पुढच्या कवींची प्रतिभा व्यासांच्या मानाने फारच तोकडी पडत असल्यामुळे त्यात चव्हाटवजा भागाचीही खिचडी झाली आहे. त्यामुळे मूळ कथा कोणती आणि प्रक्षिप्त भाग कोणते हे समजणे कठीण झाले आहे. महाभारताचे ऐतिहासिक मूल्यमापन करणे हे विकट काम आहे. म्हणून या महान ग्रंथाचा अंतर्भेद घेण्याला, त्यातील व्यक्ती, प्रसंग, घटना यांचे समीक्षण आणि विश्लेषण ही वेगवेगळ्या प्रकारांनी करण्याला वाव राहिला आहे. इरावतीबाईंचे समीक्षण हे आगळे असून त्यात त्यांची चिकित्सक दृष्टी आणि सहानुभावी वृत्ती यांचा पुरेपूर प्रत्यय येतो.

महाभारत ही एका विशिष्ट कालखंडाची कथा असली, तरी त्यात चितारलेला जीवनपट हा भव्य आणि विशाल आहे. मानवी जीवनाचे खोल अंतर्दर्शन त्यात घडते. विविध वृत्तीच्या आणि भिन्नभिन्न स्वभावधर्मांच्या व्यक्ती त्यात आल्या असून त्या ' उत्कट आणि खळवळीचे जीवन ' जगताना दाखविण्यात आल्या आहेत. मानवी स्वभावाच्या नाना छटा, अनुभवांची समृद्धता आणि नियतीने ग्रासल्या जाणाऱ्या मानवी जीवनाचे चित्रण यामुळे महाभारताची कथा मनाची पकड घेते. त्यामुळेच महाभारताची शोकात्मिकाही अत्यंत प्रभावी झाली आहे. महाभारताची कथा वाचल्यानंतर तीव्रतेने जाणवते ते जीविताचे वैफल्य होय. जणू काही नियती या वैफल्याकडे सगळ्यांना खेचून नेत असते असेच वाटते. म्हणून युगान्तकार म्हणतात त्याप्रमाणे " प्रत्येक व्यक्ती एका विशिष्ट परिपाकाकडे अटळपणे जात असते......हे महाभारत वाचताना इतक्या तीव्रतेने जाणवते की, त्या व्यक्तीची व्यथा आपली स्वतःची व्यथा होते. त्या व्यक्तीच्या द्वारे सर्वच मानवतेचे दुःख आपल्याला खुपत राहते. " ( पान २६ ) याच भूमिकेवरून त्यांनी काही प्रमुख व्यक्ती घेऊन त्यांच्या स्वभावांचे विश्लेपण केले आहे.

व्यक्ति-चित्रणासाठी त्यांनी गांधारी, कुंती आणि द्रौपदी या स्त्रिया आणि भीष्म, विदुर, द्रोण-अश्वत्थामा, कर्ण आणि कृष्ण हे पुरुष निवडले आहेत. यातील स्त्री-चित्रणे अधिक सरस, अधिक उठावदार वठली आहेत. ती अधिक समरसतेनेही लिहिली गेली आहेत. त्यांच्या सर्वच व्यक्तिरेखा कथेच्या संदर्भात त्या व्यक्तींच्या स्वभावाचे आणि त्यांच्या हातून घडलेल्या कृतींचे विश्लेपण आणि स्पष्टीकरण आहेत. त्या व्यक्तींवरची ती सुंदर भाष्येच आहेत. त्या व्यक्तींच्या स्वभावाचे विविध पदर त्यांनी उलगडून दाखविल्यामुळे त्यांची ही विश्लषणे खोल, अर्थगर्भ आणि मनाचा ठाव घेणारी झाली आहेत.

या ग्रंथाचे प्रमुख वैशिष्ट्य हे की, महाभारतात जे अप्रकट, प्रच्छन्न आहे ते उघड करण्याचा प्रयत्न युगान्तकारांनी केला आहे. त्यामुळे रूढ कल्पनांना त्या धक्का देतात. अव्यक्त व्यक्त करण्याचे त्यांचे बुद्धिकौशल्य प्रशंसनीय आहे. हे करताना कधी त्या कल्पनाविलासाचा, कधी तर्काचा, तर कधी ग्रंथाधार घेतात. गांधारीने ओढवून घेतलेले अंधत्व, ' द्रौपदी ' या प्रकरणातील शेवटची ' नरोटी ' आणि विदुर आणि धर्म यांच्यातील पितापुत्र संबंध ही यांची ठळक उदाहरणे आहेत. आंधळ्या पतीशी जन्माची गाठ पडल्यामुळे स्वतःच्या

डोळ्यावर गांधारीने पट्टी बांधून घेतल्याची करुण घटना त्यांनी टिपली आणि तीवर तिच्या साऱ्या जीवनाची शोकात्मिका लालित्यपूर्णरीतीने उभी केली. यातील कल्पनाविलास हृदयंगम आहे. अशा कल्पनाविलासाशिवाय त्यांना गांधारीच्या जीवनावर इतके सुंदर भाष्य करता आले नसते. प्रारंभीचे रम्य प्रवास, सासरी झालेले तिचे स्वागत आणि तेथले वैभव यांच्या पार्श्वभूमीवर गांधारीच्या जीवनाची शोकात्मिका उठून दिसते. गांधारीने पत्करलेले आंधळेपण म्हणजे आयुष्याबरोबर चाललेला तिचा झगडा, जीवनावर तिने उगवलेला सूड असा त्यांनी लाविलेला अर्थ सयुक्तिकच आहे असे म्हणावे लागते. आयुष्याच्या अखेरीस गतायुष्याचा आढावा घेतल्यावर उपरती होऊन धृतराष्ट्र जी करुणा भाकतो ती हृदय पिळवटणारी आहे. तीत पश्चात्ताप आहे, अन्यायाचे परिमार्जन करण्याची अखेरची दुबळी धडपड आहे. कुरुकुलातील 'सुखदुःखांच्या या भोक्त्या'च्या जीवनातील वंचना, वैफल्य येथे बोलकी झाली आहेत. गांधारीचे हे सारेच प्रकरण लालित्याचा उत्कृष्ट नमुना आहे.

कुंती आणि द्रौपदी यांचा विचार करताना एखादी घटना वा प्रसंग न घेता त्यांच्या साऱ्या जीवन-पटाचाच उलगडा करण्याचा प्रयत्न इरावतीबाईंनी केला आहे. मूळ कथेच्या आधारे त्यांच्या जीवनाचा अन्वयार्थ त्यांनी लावला आहे. गांधारीचा आयुष्याशी झगडा अकरणात्मक होता. तर या दोघींचा झगडा करणात्मक होता. कुंतीचे व्यक्ति-चित्रण अधिक समर्थ वठले आहे. कुंतीचे भविष्य जन्माआधीच ठरून गेले होते. दुःख आणि दुर्दैव सतत तिच्या मागे हात धुवून लागली होती. ज्यांच्याशी तिचा संबंध आला त्या सर्वांनी तिला आपल्या परीनी दुःखच दिले. कुंवारपणी झालेल्या मुलाचे दुःख जन्मभर तिला पोटात वाळगावे लागले. द्रव्य चोरापोरी यावे तसे तिला देऊन टाकले. पंढ पतीशी गाठ पडल्याने दुःखाची परंपराच तिच्या मागे लागली. नियोगाने पुत्रप्राप्ती करून घ्यावी लागली. वैधव्य आल्यानंतर जीवनाशी झगडण्याची तिच्यावर पाळी आली. मुलांच्या हितासाठी जिवापाड झटून त्यांचे रक्षण करावे लागले. मुलांनी मूर्खपणाने राज्य घालवल्याने तिच्या आपत्तीत भरच पडली. द्रौपदीच्या रूपाने पाचाचा न फुटणारा सांधा तिने साधला. ती रडली, कढली, पण स्वतःला हीन दीन समजली नाही. तिने उघड्या डोळ्यांनी, ताठ मानेने, वऱ्याचशा कृतकृत्यतेने आयुष्य घालविले. स्वतःच्या स्थानाबद्दल, हक्काबद्दल ती अत्यंत जागरूक, क्षत्रियत्वाचा जाज्वल्य अभिमान असलेली बाई होती. तिच्या मते जीवन ही लढाई होती. लढाईच्या वेळी ती विचलित होत नसे. आपली मुले कच खातात हे पाहाताच 'चाबकाने घोड्याला फटकारावे, तसे तिने मुलाला लढावयाला उद्युक्त केले !' कुंती फार कठीण, 'वज्रायसा'च्या हृदयाची बाई होती. पण तिच्याजवळ न्यायबुद्धी होती. माद्रीच्या मुलांना तिने न्यायाने व प्रेमाने वागविले. मरतानाही ती ताठ मानेने मेली. इरावतीबाईंनी कुंतीचे रंगविलेले हे चित्र मूळ कथेला धरून असल्यामुळे वास्तव झाले आहे. तिच्या जीवनाची संगती त्यांनी यथार्थतेने दाखवून दिली आहे. कुंती कर्तृत्ववान होती यात शंका नाही. पण पान ६० वर 'कुरूंच्या कुटुंबातील सुखदुःखाचे भोक्ते धृतराष्ट्र व गांधारी होते. कुंती आणि विदुर हे साक्षी होते. हे विधान या चित्रणाशी विसंगत वाटते. कुंती केवळ साक्षीच नव्हती, तर सुख-दुःखांची भोक्तीच नव्हे तर कर्तीही पण होती.

कुंतीसंबंधी विचार करताना 'माझ्या सुखाच्या कल्पनेने मी तिचे सुखदुःख का जोखावे?' (पृ. ६४) असे त्या विचारतात. पण तसे जोखण्याचा मोह त्यांना आवरलेला दिसत नाही. विशेषतः महाभारतातील स्त्रियांच्या दुःखाची कहाणी सांगताना स्वतःच्या सुखदुःखाच्या कल्पनेने त्या हेलावतात आणि त्याच मापाने जोखतात असे वाटल्यावाचून राहात नाही. भीष्माने कुलस्त्रियांची विटंबना केली म्हणून त्याला त्या दोष देतात. तसेच कुरुकुलाने वायकांची भयंकर विटंबना केली म्हणून ते कुल नाशालाच योग्य झाले होते असे त्या म्हणतात. त्यावेळीही हेच प्रत्ययास येते. कुंती, गांधारी आणि द्रौपदी यांच्या व्यक्तिचित्रणातही ते ठळकपणे दिसून येते. एकंदरीत महाभारतीय स्त्रियांविषयी विवेचन करताना त्या आधुनिक काळाचा चष्मा वापरतात आणि आधुनिक मूल्यांचा निकष लावतात असे वाटल्यावाचून राहात नाही. कुंतीच्या सवतीमत्सराबद्दल, लाक्षागृहात निषादी आणि तिची मुले जाळल्याबद्दल, कर्णावर तिने केलेल्या अन्यायाबद्दल त्या तिला दोष देतात. पण शेवटी म्हणतात. की, 'कुंतीबद्दल तिरस्कार वाटावा असे तिने काही करावे, पण लगेच ती कुंती वेगळ्या स्वरूपात आपल्या पुढे यावी, असे होते' (पा. ८१). कुंतीवर त्या संताप-

तात, पण लगेच क्षमाशीलही होतात. पण कर्णावर झालेल्या अन्यायाबद्दल त्या क्षमा करू शकत नाहीत; असेच एकंदरीत वाटते.

द्रौपदीचे व्यक्तिचित्रणही त्यांनी मूळ कथासूत्राच्या आधारेच केले आहे. द्रौपदी आणि सीता या महाकाव्यांच्या दोन नायिकांतील साम्यभेद त्यांनी चांगल्याप्रकारे विशद केला आहे. त्याच्या अनुषंगाने या दोन महाकाव्यातील जीवनाच्या पातळीतील फरकही त्यांनी दाखवून दिला आहे. रामायणाची पातळी असामान्यत्वाची आणि आदर्श जीवनाची, तर महाभारताची पातळी सामान्यत्वाची आणि मानवी. सीता आदर्श स्त्री म्हणून चित्रित केली आहे; तर द्रौपदी अगदी मानवी आहे. द्रौपदीचे चित्र अधिक भरीव व अनेकांगी आहे; असे त्यांनी दाखविले आहे. त्या म्हणतात, 'ती असामान्य होती. पण ही असामान्यता सामान्यांच्या मूल्यातून जन्माला आली होती. त्यांनी रंगविलेले द्रौपदीचे चित्र बाणेदार, तडफदार स्त्रीचे आहे. " द्रौपदी उभी होती, तोपर्यंत पांडव उभे होते. द्रौपदी खाली पडली, तेव्हा धर्माखेरीज इतरही पडले " ( पृ. १०९ ) या शब्दात द्रौपदीच्या सर्व कर्तृत्वाचे सार त्यांनी आणले आहे. " युगान्ताची प्रत्येक यातना तिने भोगली. " पण त्या यातनांशी ती झगडत राहिली आणि शेवटपर्यंत टिकून राहिली-यातच तिचे असामान्यत्व होते.

त्यांच्या मते द्रौपदीचे सगळ्यात कोठे चुकले असेल, तर द्रौपदीला पणाला लावून धर्म हरल्यानंतर ती आव्हानपूर्वक विचारते की, 'माझा पण लावायच्या आधी धर्मराज स्वतः पण लावून दास झाले होते का? हा तिचा प्रश्न वेडगळच नव्हे, तर भयानक म्हणून त्यांनी ठरविला आहे. या त्यांच्या मताशी सहमत होणे कठीण आहे. उलट असेही म्हणता येईल की तशा परिस्थितीत स्वतंत्र, बाणेदार वृत्तीच्या तडफदार विचक्षण स्त्रीने असा प्रश्न विचारणे स्वाभाविक नव्हते का? वास्तविक हा तिचा प्रश्न बिनतोड होता म्हणून राजसभेतील वडील मंडळींना त्या प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देता आले नाही. असेही म्हणता येईल की, त्या वेळच्या सामाजिक परिस्थितीत त्या प्रश्नाला उत्तर नव्हते. द्रौपदीच्या प्रश्नाचा रोख असा होता की, धर्मराज दास झाल्यानंतर द्रौपदीला दास करण्याचा त्याला अधिकार राहात नाही. एका अर्थी तत्कालीन साऱ्या स्त्रीसमाजाच्या वतीने तिने हा सवाल टाकला होता. तिने उपस्थित केलेला प्रश्न स्त्रीच्या, पत्नीच्या स्वातंत्र्याचा होता. आणि त्या वेळच्या समाजस्थितीत त्याला समर्पक उत्तर नव्हते. कारण महाभारतकालीन विवाहसंस्था सैल, ढिली आणि विस्कळीत होती. अनौरस संतती, मातापितराचा पत्ता नसलेली संतती, कुवारपणी झालेली अपत्ये यांची कितीतरी उदाहरणे महाभारतात आहेत. नियोग तर सर्रास रूढ होता. इरावतीबाईंनी म्हटल्याप्रमाणे 'थोरल्याच्या बायकोवर खालच्या भावांचा अधिकार असे.' ( पा. १०६ ) त्याकाळी गंगेसारख्या स्वैरिणी स्त्रिया होत्या. यावरून त्याकाळी विवाह-संस्थेला स्थिर आणि पक्के स्वरूप आले नव्हते, हे स्पष्ट दिसून येते. पतिपत्नींचे संबंध काटेकोर असणे अशा परिस्थितीत शक्य नव्हते, आणि तसे ते नव्हते हे महाभारतावरून दिसून येते. स्त्री-पुरुष संबंधातील अशा सैलपणामुळेच द्रौपदीची 'लालूच' कर्णाला दाखविण्यात आली होती. त्यामुळेच नात्यांनाही निश्चित स्वरूप प्राप्त झाले नव्हते. म्हणून इरावतीबाई म्हणतात की, 'नातेवाचक शब्द फारच कमी आहेत.' (पा.२४८) तसेच 'पतिव्रता ह्या शब्दाचा अर्थ काही दृष्टींनी पुढच्या काळापेक्षा निराळा होता.' ( पा. २०९ ) 'दत्तक घेण्यापेक्षा नियोग चांगला समजत.' ( पा. ३४९ ) जातींनाही निश्चित स्वरूप आले नव्हते, ते यामुळेच असावे. विवाहसंस्थेला नियमबद्ध पक्के स्वरूप पुढच्या काळात आले असावे. म्हणूनच श्वेतकेतू हा विवाहसंस्थेचा जनक समजला जाऊ लागला. एक गोष्ट मात्र स्पष्ट दिसते की प्रजोत्पादनाला त्या काळी फार महत्त्व देण्यात येत होते. आर्य हे विजिगीषु होते. त्यांना वंशवृद्धी साधावयाची होती.

विवाहसंस्थेच्या या स्वरूपाचा उलगडा युगान्तमध्ये होत नाही. तसेच द्रौपदीच्या बहुपतित्वाचेही समाधानकारक स्पष्टीकरण सापडत नाही. बहुपतित्वाचा हा प्रश्न गोंधळात टाकणारा आहे. इरावतीबाईंच्या विवेचनावरून पांडवांची करून दिलेली सोय असा समज त्यांनी करून घेतलेला दिसतो. कर्णाला लालूच दाखविण्यातही हीच सोय प्रकट होते. तिच्यामुळे पांडवांची एकी अभेद्य राहिली हे स्पष्टीकरण समाधानकारक वाटत नाही. बहुपतित्व हा आपला कुलाचार आहे, पूर्वापार चालत आलेला धर्म आहे असे धर्मच स्वतः सांगतो. काही

विद्वानांच्या मते बहुपतित्वाची चाल हिमालयाच्या पायथ्याच्या प्रदेशात रूढ असल्यामुळे पांडवांचे कुल हे तेथून खाली उतरून गंगायमुनेच्या प्रदेशात स्थाईक झाले असावे. किंवा विवाहसंस्थेचे स्वरूप विस्कळित असल्यामुळे एक स्त्री अनेकांची पत्नी होऊ शकत होती असेही कदाचित असू शकेल. मानवशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ या नात्याने इरावतीबाईंनी या प्रकारावर प्रकाश टाकावा अशी अपेक्षा केली तर चुकीची ठरणार नाही.

द्रौपदीच्या प्रकरणाच्या शेवटी त्यांनी जी ' नरोटी ' जोडली आहे, ती नरोटी नसून सुवर्णपात्र आहे असे म्हटले पाहिजे. गांधारीच्या जीवनातील शल्य जसे त्यांनी उघड केले, तसेच धर्मराजाच्या अंतर्मनात सलणाऱ्या शल्यावर नेमके बोट ठेवून त्यांनी ते उघड करून दाखवले आहे. अव्यक्त व्यक्त करण्याची त्यांची शोधक-बुद्धी येथेही प्रत्ययास येते.

स्त्री-चित्रणात दिसून येणारी आत्मीयता पुरुषांच्या व्यक्तिचित्रणात प्रत्ययास येत नाही. त्यातही भीष्माची व्यक्तिरेखा ही अधिक कठोर वाटते. वासुदेव कृष्णाने मात्र त्यांना भारून टाकलेले दिसते. कारण त्यांची एरवीची चिकित्सकबुद्धी त्याच्या पुढे हतप्रभ झालेली दिसते. भीष्माच्या जीवनाचे त्यांनी केलेले विवरण बरेचसे यथार्थ आहे. जन्मकालच्या घटनेमुळे तो जगात अडकून पडला आणि खेचत गेला. जे तो करीत गेला त्यातच तो गुंतून पडला. गुंता वाढत गेला. त्यातून त्याची सुटका झाली नाही. जन्मभर ज्या कुरुकुलाचे रक्षण करण्याला तो धडपला त्याचा नाश झाल्याचे पाहाणे त्याच्या नशिबी आले. या संगतीमध्ये त्याच्या जीवनाचे सार त्यांनी आणले आहे. भीष्माला कुरुकुलाचा Grand Patriarch म्हटले पाहिजे. जीवात जीव असेपर्यंत कुरुकुटुंब सांभाळणे आणि रक्षिणे ही त्याच्या आयुष्यातील इतिकर्तव्यता होती. युगान्तकारानी ही त्याची भूमिका चांगली वठवूनही भीष्मावर अन्याय केला आहे असेच म्हणावे लागते. भीष्माला त्यांनी फार काटेकोरपणे जोखले आहे. मूल्ये, नीती अनीती, न्यायान्याय यांच्या तलवारीच्या धारेवर त्यानी भीष्माला धरले आहे. कर्णाला बाजूला सारून त्याने सेनापतिपद स्वीकारले; पण तो युद्ध निकराने लढला नाही, 'असा दोषारोप त्यांनी केला आहे. पहिले दहा दिवस युद्ध झालेच नाही असे त्या म्हणतात; पण पहिल्या दहा दिवसांचा जो वृत्तांत त्यांनी दिला आहे, त्यात या त्यांच्या म्हणण्याला पुष्टी मिळत नाही. युद्ध थांबावे, कुलनाश होऊ नये अशी त्यांची इच्छा असणे स्वाभाविक होते. पण तो मनापासून लढलाच नाही; असे म्हणणे योग्य होणार नाही. एवढ्या मोठ्या स्वरूपाचे युद्ध प्रारंभी निकराचे होणे संभवनीय नसते. शिवाय महाभारतातील युद्धाची वर्णने वाचली तर ती जणू खेळीमेळीची आणि क्रीडास्पर्धेच्या स्वरूपाची होती असे वाटते. रात्री एकमेकांच्या शिबिरात जाऊन परस्परांच्या गाठीभेटी होत असत. युद्धाचा दिवस संपला की जणू काही युद्ध आणि वैर विसरत असत असेच वाटावे. मात्र कुस्तीतील मल्ल किंवा क्रीडापटू ज्या चुरशीने खेळतात तशाच निकराने त्याकाळी युद्धे लढली जात होती. या खिलाडूपणालाच धर्मयुद्ध हे नाव पडले असावे. हे तत्कालीन युद्धाचे स्वरूप पाहिले म्हणजे भीष्माला दोष देता येणार नाही. कर्णाचा अधिकार त्याने डावलला हे म्हणणेही चुकीचे आहे. कारण कर्णाला सेनापतिपद मिळाले ते अखेरीस. भीष्मानंतर द्रोणाचा अधिकार होता. आणि ते क्रमप्राप्त होते. भीष्म ज्येष्ठ आणि श्रेष्ठ असल्यामुळे त्याचा तो पदसिद्ध अधिकार होता. शिवाय कर्ण सूतपुत्र म्हणून ओळखला जात असल्याने क्षत्रिय राजांनी त्याच्या सेनापतिपदाला आक्षेप घेतला असता हेही विसरता येणार नाही. भीष्म शूर योद्धा होता, याविषयीही इरावतीबाईंनी शंका व्यक्त केली आहे. महाभारतात कृष्णाचे शौर्य कोठेही फारसे प्रकट झाले नसता त्यांनी त्याचे शूरत्व गृहीत धरले आहे. पण भीष्माला शूर योद्धा मानायला त्या तयार नाहीत. अशा दोषाविष्करणामुळे भीष्माच्या चांगल्या व्यक्तिचित्रणाला गौणत्व आले आहे. भीष्माच्या चित्रणाच्या शेवटी त्या प्रश्न उपस्थित करतात की, भीष्माच्या प्रतिज्ञापालनाने काय साधले ? भारतात कथेच्या दृष्टीने हा प्रश्न गैरवाजवी नाही का ? कारण भीष्मप्रतिज्ञा हा साऱ्या महाभारतीय कथेचा turning point आहे. भीष्म त्या प्रतिज्ञेला जागला नसता तर पुढील साऱ्या कथेला निराळेच वळण लागले असते. त्या बिंदुमुळेच पुढच्या कथेला कलाटणी मिळाली आहे. हा प्रश्न केवळ भीष्मापुरताच मर्यादित राहात नाही; तर साऱ्या कुरुकुलाला तो व्यापून टाकतो. म्हणून भीष्माच्या प्रतिपालनाने काय साधले हा प्रश्न निरर्थक ठरतो. त्या प्रतिपालनाने देवव्रताचा भीष्म झाला, इतकेच नव्हे तर भीष्माचा ' देवव्रत ' झाला.

विदुराचे व्यक्तिचित्रण हा इरावतीबाईंच्या बुद्धिकौशल्याचा एक आगळा नमुना आहे. महाभारतात दडलेले एक गुपित त्यांनी उघड करून दाखविले आहे. विदुराच्या जीवनाचे यथार्थ विश्लेषण करून तो आत खोलवर कोठेतरी गोवला गेला होता अशी शंका उपस्थित करून त्यांनी विदुर आणि धर्म यांच्यात पितापुत्राचे नाते असावे हे साधार दाखवून दिले आहे. विदुर आणि धर्म यांच्यातील परस्पर जिव्हाळा, त्यांच्यातील स्वभावसाधर्म्य, योगबलाने पुत्राच्या शरीरात शिरण्याची उपनिषत्प्रणीत क्रिया आणि प्रत्यक्ष व्यासाच्याच तोंडून फुटलेले गुपित, या समर्पक पुराव्याच्या आधाराने सिद्ध केलेल्या त्यांच्यातील पितापुत्र नात्यासंबंधी वाचकाच्या मनात शंका राहात नाही.

' महाभारतामध्ये व्यक्ती म्हणून विदुराचे एक विशेष असे स्थान व कार्य आहे; असे सांगून त्यानी ते विशद केले आहे. त्याच्या अनुषंगाने सूतवर्गाचे महाभारतकालीन स्थानही त्यानी दिग्दर्शित केले आहे. विदुर हा शहाणा, ज्ञानी, न्यायी, धर्माधर्मविवेक सांभाळणारा असा महाभारतातील एक नंदादीप आहे. सूतकुलात जन्मल्यामुळे सत्तेपासून त्याला वंचित व्हावे लागले. सूतवर्गाविषयीच्या त्याच्या विवेचनावरून त्या वर्गाची तत्कालीन भूमिका समजते. त्यांचे स्थान विश आणि शूद्र यांच्यावरचे होते. व्यास आणि विदुर हे एकाच परिस्थितीत म्हणजे माता शूद्र आणि पिता ब्राह्मण अशा परिस्थितीत जन्मले असता, व्यास श्रेष्ठ ब्राह्मण ठरतो आणि विदुर हीन कुलाचा ठरतो, असे का ? हा प्रश्न शिल्लक राहातोच.

द्रोण आणि अश्वत्थामा यांच्या चरित्राचे परीक्षण त्यांनी ' परधर्मो भयावहः ' या दृष्टिकोणातून केले आहे. ते पटण्यासारखे नाही. या दोघांनी ब्राह्मणत्व झुगारून दिले असे त्या म्हणतात. पण जे ब्राह्मणत्व त्यांना अपेक्षित आहे ते त्याकाळी अस्तित्वात होते काय हाच प्रश्न आहे. महाभारतकाळी ब्राह्मणांचे श्रेष्ठत्व मागे पडून क्षत्रियांचे श्रेष्ठत्व प्रस्थापित झाले होते. ते युग क्षात्रधर्माचे होते, ब्राह्मधर्माचे नव्हते. मंत्र आणि विद्या सोडून ब्राह्मण इतरही क्षेत्रांत पडले होते. कृपद्रोणादी केवळ निपुण योद्धेच होते असे नव्हे, तर शस्त्रास्त्रविद्येचे गुरुही होते. त्यांनीही क्षात्रधर्म पत्करला होता. इरावतीबाईंना अपेक्षित असलेले ब्राह्मणत्व हे नंतरच्या काळातले आहे. महाभारतीय युद्धाच्या भयानक संहारानंतर विस्कटलेल्या समाजाच्या घडीत पुनः ब्राह्मणांनी आपले वर्चस्व प्रस्थापित केलेले दिसते. यज्ञाचे महत्त्वही पुनः वाढलेले दिसते. ' गीतेमध्ये ब्राह्मणांची क्षमा, शांती वगैरे जी लक्षणे दिली आहेत ' ती या पुढच्या काळात त्यांना चिकटलेली आहेत. अहिंसाव्रताचा अंगिकारही ब्राह्मणांनी नंतरच्या काळात जैन धर्माची प्रतिक्रिया म्हणून केलेला दिसतो. अहिंसेचे स्तोम माजले ते महावीर आणि बुद्ध यांच्या काळानंतरच. म्हणून ब्राह्मणत्वाची विस्मृती झाल्याबद्दल द्रोण-अश्वत्थामा यांना दोष देणे हे चुकीचे वाटते. अश्वत्थाम्याचा अधःपात आत्मविस्मृतीमुळे झाला ही कल्पना रम्य असली तरी ग्राह्य वाटत नाही.

कर्णाच्या आयुष्याचे विश्लेषण एका निराळ्याच दृष्टीकोणातून करण्यात आले आहे. " मी कोण ' हे प्रश्नचिन्ह त्याला आयुष्यभर सतावीत होते. आणि ' मी कोण ? ' या प्रश्नाचा स्वतःशी उलगडा न करताच कर्ण गेला " जन्मतःच तो आपले हक्काचे सामाजिक स्थान गमावून बसला. कर्णाचा जन्म हे जसे कुंतीने जन्मभर पोटात बाळगलेले दुःख होते, तसेच ' मी कोण ' ही कर्णाच्या अंतःकरणात बोचणारी निरंतर व्यथा होती. यातच दोघाही जीवांचा दैवदुर्विलास होता. कर्ण जन्माने क्षत्रिय, शूर, राजपदाचा हक्कदार, कवच-कुंडलांमुळे अजिंक्य होता. पण मातेच्या एका प्रमादामुळे या सर्वांपासून त्याला वंचित व्हावे लागले हीच त्याच्या आयुष्याची शोकात्मिका आहे. त्याच्या हक्काचे स्थान मिळण्याची संधी त्याला इतक्या उशीरा देऊ करण्यात आली की, ती लाथाडण्याखेरीज त्याला गत्यंतर नव्हते. कवच-कुंडले देण्याची त्याची दानशूरता ' मी कोण ' या त्याच्या व्यथेतून निर्माण झाली होती हे सूचनही यथोचित वाटते. कर्णाच्या जीवनाची शोकात्मिका 'मी कोण' या दोन शब्दांत फार सुंदर आणि परिणामकारक रीतीने व्यक्त झाली आहे.

कृष्णाच्या जीवनचरित्राचे विश्लेषण विस्ताराने करण्यात आले आहे. मूळ महाभारतातील मानवी कृष्णाचे ते चित्रण आहे. हरिवंश किंवा भागवतातील कृष्ण तो नाही. त्याच्यात गोपीवल्लभत्वाचा मागमूसही नाही. तो मुरलीधर बालकृष्णही नव्हे. तो शहाणा होता, दूरदर्शी

होता; पण त्रिकालज्ञ आणि सर्वशक्तिमान नव्हता. असा कृष्ण त्यांनी चितारला आहे. हे त्यांचे चित्रण वास्तवतेला धरून आहे. पण त्यांची चिकित्सक आणि विचक्षण दृष्टी कृष्णापुढे हार खाते असाच भास होतो. कृष्णावरच्या प्रकरणाचा बराच भाग त्याच्या कपटनीतीचे आणि त्याच्या दुष्कृत्यांचे समर्थन करण्यात आणि कृष्णाची वकीली करण्यात खर्ची पडला आहे.

कृष्णाच्या आयुष्यात पुष्कळच कार्ये आणि धोरणे होती असे सांगून त्यांचा उलगडा करण्याचा प्रयत्न लेखिकेने केला आहे. स्वतःबद्दल, कुलाबद्दल, समाजाबद्दल त्याच्या काही आकांक्षा व ध्येये होती. ती पार पाडण्यासाठी त्याने नाना युक्त्या–प्रयुक्त्या केल्या. त्याच्या या धडपडीचे स्पष्टीकरणही त्यांनी केले आहे. पण हे सर्व करताना कृष्णाच्या व्यक्तिमत्वाची छाननी करण्यावरच इरावतीबाईंचा भर दिसतो. तत्कालीन राजकीय आणि सामाजिक परिस्थितीच्या संदर्भात कृष्णाची भूमिका काय होती यावर त्यांनी अधिक प्रकाश टाकला नाही. कदाचित या संदर्भातच त्याचे जीवितकार्य अधिक स्पष्टपणे आणि सार्थतेने समजून येऊ शकेल. कृष्ण हा राजकारणपटू आणि हुशार मुत्सद्दी होता. तत्कालीन राजकीय परिस्थितीचे त्याचे ज्ञान सखोल होते हे त्याने राजसूय यज्ञाच्यावेळी धर्माला सर्व राजकीय परिस्थिती समजावून दिली त्यावरून आणि पुढे त्याने जे पवित्रे टाकले त्यावरून सिद्ध होते. त्याचे यादवकुल हे संपन्न आणि भांडकुदळ होते. पण तत्कालीन राजघराणी त्याला प्रतिष्ठित मानत नव्हती असे दिसते. त्या कुळातील लोक असंस्कृत पशुपाल होते असे वर्णन महाभारतात ठिकठिकाणी आले आहे. कृष्णाचे प्रतिस्पर्धी वीर त्याचा शूद्र गवळी म्हणून धिक्कार करून अवहेलना करीत असत असे उल्लेख महाभारतात आहेत. म्हणूनच शिशुपालाने त्याची अग्रपूजा करण्याला कसून विरोध केलेला दिसतो. स्वतःच्या कुलाला प्रतिष्ठा प्राप्त करून घेणे, हाही कृष्णाच्या अनेक उद्देशांपैकी एक असावा. त्याकाळी जरासंध हा एक मोठा बलदंड आणि बलापहारी राजा होता. अनेक राज्ये अंकित करून सम्राट होण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती. तत्कालीन राजनीतीच्या हे विरुद्ध होते. कंस आणि शिशुपाल हे जरासंधाचे हस्तक होते. यादवकुलाचे त्यांचे पूर्वापार वैर असावे. कंसाने यादवांना मथुरेतून हुसकून लावले म्हणून त्यांना दूर जाऊन द्वारकेची नवीन वसाहत करणे भाग पडले. या त्रिकुटाचा निःपात करणे हे कृष्णाचे जीवितकार्य बनले. कंसाचा निकाल त्याने आधीच लावला होता. जरासंधाचे बंड मोडून काढण्यासाठी बलशाली मित्र जोडणे अवश्य होते. म्हणून त्याने शूर पांडवांना हाताशी धरले. "पाडवांच्या संबंधांत कृष्णाचे बरेच मोठे धोरण होते," हे बाईंचे म्हणणे खरे आहे. म्हणून पांडवांना मोठे करून त्यांना राज्य मिळवून देण्याचा उद्योग त्याने केला. द्रौपदीच्या स्वयंवराच्या निमित्ताने त्याने पांडव व द्रुपद यांना आपलेसे करून घेतले, द्रौपदीच्या लग्नात पांडवांना त्याने फार मोठा आहेर दिला. यात पांडवाबरोबर स्वतःचीही प्रतिष्ठा वाढण्याचा हेतू असावा. "द्रुपदांच्या व यादवांच्या बलशाली युतीने पांडवांना अर्धे राज्य देणे धृतराष्ट्राला भाग पडले." खांडववन दहनात अर्जुनाला मदत करून नवीन वसाहतीत इंद्रप्रस्थाची राजधानी पांडवाकरवी त्याने उभी करविली. त्यांच्या जोडीला विराटही येऊन मिळाले कृष्णाने मोठ्या प्रयुक्तीने सुभद्रा आणि अर्जुन यांचे लग्न लावून दिले. या वेळी त्याने यादवांना 'पांडवांचा व आपला संबंध जमणे ही कशी फायद्याची गोष्ट आहे हे पटवून दिले.' (पा. १९३). अशाप्रकारे पांडव, यादव, द्रुपद आणि विराट यांची एक फळी निर्माण झाली. भारतीय युद्धात ही फळी कौरवांच्या विरुद्ध उभी राहिली. इंद्रप्रस्थाचे राज्य हाती आल्यानंतर कृष्णाने राजसूय यज्ञ करण्याला पांडवांना प्रोत्साहन दिले. साऱ्या परिस्थितीचा अचूक अंदाज घेऊन डोईजड झालेल्या जरासंधाचा काटा त्याने भीमाकरवी काढला. पुढे अग्रपूजेच्या वेळी शिशुपालाचा वध करून आपला मार्ग निर्वेध केला. अग्रपूजेमुळे त्याला हवी होती ती सामाजिक प्रतिष्ठाही लाभली. भारतीय युद्धाच्या आधी शिष्टाईसाठी तो गेला. पण त्याला हवी होती त्याप्रमाणे ती मोडून तो परत आला असे त्यावेळच्या त्याच्या एकंदर कारवाईवरून म्हणता येते. भारतीय युद्धात नाना युक्त्याप्रयुक्त्या आणि कपटनाटके करून त्याने पांडवांना जय मिळवून दिला, येथे त्याची इतिकर्तव्यता संपली असे म्हणता येते.

कृष्णाची वासुदेव होण्याची इच्छा होती, यासाठी इरावतीबाईंनी केलेला प्रपंच पटण्यासारखा नाही. वासुदेव या कल्पनेचा स्पष्ट उलगडा त्यांनाही करता आला नाही. वासुदेव होण्याची कृष्णाची महत्त्वाकांक्षा होती हे दाखविण्यासाठी त्यांनी जे आधार घेतले आहेत त्यात त्यांनी काळाचा भान ठेवलेला दिसत नाही. गीतेतील

'वृष्णीनाम् वासुदेवोऽस्मि या श्लोकाचा त्यांनी आधार घेतला आहे. हा श्लोक गीतेच्या १० व्या अध्यायात आला आहे. आणि बाईच म्हणतात की भारतीय युद्धाच्या वेळी गीतेचे जेमतेम तीन अध्याय सांगितले असावेत. तसेच

> वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः ।
> मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥

हा श्लोक वाचला म्हणजे तो पुढच्या काळात केव्हातरी गीतेत घातला गेला असला पाहिजे हे स्पष्ट दिसून येण्यासारखे आहे. वासुदेवकल्पनेच्या पुष्ट्यर्थ दिलेले जैन आणि बौद्ध वाङ्मयांतील उल्लेख हे तर कित्येक शतके मागाहूनचे आहेत. ख्रिस्ती धर्माचा आधार तर त्याहीनंतरचा आहे. वासुदेवकल्पनेच्या बाबतीत इरावतीबाईंनी केलेली ओढाताण त्यांच्या नेहमीच्या पद्धतीशी विसंगत वाटते.

कृष्णाबद्दलचा बाईंचा पक्षपात तर स्पष्टपणे दिसून येतो. कृष्णाच्या कपटनीतीचे समर्थन करून तीवर पांघरूण घालण्याचा प्रयत्न त्यांनी केला आहे. भीष्माच्या सरळ आणि निःस्वार्थी कृत्याबद्दल धारदार काव्याने त्याला तोलणाऱ्या या विदुषी कृष्णापुढे इतक्या मवाळ कशा झाल्या याचे आश्चर्य वाटते. कृष्णाच्या दुष्कृत्यांचे समर्थन त्या वेळच्या नीतीला धरून तो उघड्या डोळ्यांनी करीत होता.' असे केले आहे. पण हाच न्याय त्यांनी इतरांना लागू केलेला दिसत नाही. शिशुपालवधाच्या बाबतीत बराच आटापीटा करून आणि लांबलचक युक्तिवाद करून कृष्णाला दोषमुक्त करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. 'तो वधाला योग्यच होता,' 'कृष्णाने योग्यच केले.' 'शिशुपालाचा वध ही घटना अटळ होती' अशा शब्दांत त्यांनी कृष्णाची तरफदारी केली आहे. त्याच्याही पुढे जाऊन त्यांनी कृष्णाच्या या कृत्याचे तात्त्विक समर्थनही केले आहे. नियती, स्वातंत्र्य आणि निवड यांचा प्रश्न उपस्थित केला आहे. नियतीपुढे माणूस अगतिक होतो; त्याच्या स्वातंत्र्याचा संकोच होतो. निवड करण्याची संधी त्याला क्वचितच मिळते. आयुष्य हे बऱ्यावाइटाचे मिश्रण असते. स्वतःच्या कृत्यांच्या आणि ध्येयांच्या भोवऱ्यात सापडलेल्या कृष्णाला मिश्र अशा मध्यम प्रकारच्या कृत्यांमधील निवड करणे भाग पडले. कृष्णाची अशी वकिली करीत असतानाच त्यांनी शिशुपालालाही दोष दिला आहे. तसेच 'भीष्माचा पराभव आणि द्रोणाचा वध या दोन्ही वेळी त्याचे कृत्य असेच समर्थनीय होते.' (पान २२०). असे सांगून त्यांनी त्या आजोबाला आणि गुरूला प्रथम 'आगळीक' केल्याबद्दल दोषी धरले आहे. कृष्णाने 'रुक्मिणीला पळवून नेले, हेही सर्वस्वी त्यावेळच्या राजनीतीला धरून होते.' असे त्या म्हणतात. कृष्णाची केलेली ही तरफदारी पाहिली म्हणजे 'महाभारताच्या प्रकाशाचा झोत मला सहन झाला नाही.' हे त्यांचे विधान कृष्णाच्या बाबतीत तंतोतंत लागू पडते. असे म्हटले पाहिजे. महाभारतातील कृष्ण त्यांच्या हाती लागत नाही. शेवटी त्या म्हणतात की 'त्याच्या विलक्षण अलिप्ततेमुळे त्याला साकार करता येत नाही. त्याने गीता नुसती सांगितली नाही. तो गीता जगला.'

मयसभेच्या निमित्ताने खांडववनदहनाच्या पौराणिक घटनेवर 'युगान्त'कारांनी नवीन ऐतिहासिक प्रकाश टाकला आहे. महाभारतकालीन नागवंशासंबंधी त्यांनी ऐतिहासिक उपपत्ती मांडून इतिहासात एका नव्या सिद्धांताची भर घातली आहे असे म्हणावयास हरकत नाही. खांडववनात झालेला नागांचा नाश आणि जनमेजयाचे सर्पसत्र या मिथ्याकथातून त्यांनी ऐतिहासिक सत्याचा शोध घेतला आहे. त्यांच्या उपपत्तीचे थोडक्यात स्वरूप असे :– खांडववनदहनाच्या मागे वने जाळून नव्या वसाहती स्थापन करण्याची प्रक्रिया आहे, तसेच त्यात नागांचा निःपात करण्याचाही हेतू आहे. आर्यांच्या आगमनापूर्वी पंचनद्यांच्या प्रदेशात लहान लहान राज्यांत नदीकाठच्या अरण्यांत नागकुलांच्या वसाहती विखुरलेल्या होत्या. आर्य आल्यानंतर त्यांनी आपल्या वसाहती उघड्या माळावर केल्या. आर्य आणि नाग यांचे मिश्रण होत गेले. क्षत्रिय त्यांना आपल्या समान मानीत असत. कुरुवंशात नागांचे बीज निःसंशय होते. यादवांचे आणि नागांचे वैर होते. कृष्णाने कालिया नागाचे मर्दन करून यमुनेच्या प्रदेशातून नागांना हुसकून लावले. यमुनेच्या प्रदेशातून नागांची हकालपट्टी करणे हा कृष्णाच्या अनेक उद्देशांपैकी एक होता. नागांना निर्वंश करण्याचा कृष्णाचा प्रयत्न खांडववनदाहात दिसून येतो. पण तो सफल झाला नाही. या दहनामुळे पांडव व नाग यांचे वैर जडले आणि ते तीन पिढ्या टिकले. तक्षकाच्या मुलाने अर्जुनाला मारण्याचा प्रयत्न केला. तो फसला तरी तक्षकाने अर्जुनाचा नातू परीक्षित याला मारून सूड उगविलाच. त्याचा बदला जनमेजयाने नागांची भयानक हत्या करून घेतला. बाईंची ही ऐतिहासिक संगती ग्राह्य होण्यास

अनुक्रमणिका

कोणताही प्रत्यवाय नसावा. मयसभेच्या बांधकामात काचेचा थर बसविलेल्या निरनिराळ्या रंगांच्या विटा बसवून जमीन आणि पाण्याचा भास निर्माण केला असावा हा तर्क असंभवनीय वाटत नाही. कारण त्या प्रदेशात तशा प्रकारचे आरसपानी दगड उपलब्ध होतात. पुण्याच्या राजा केळकर वस्तुसंग्रहालयात इतिहास-कालातील एक पारदर्शक दगडाचा नमुना पाहावयास मिळतो. त्यावरून बाईंच्या तर्काला बळकटीच येते.

शेवटचे ' युगान्त ' हे प्रकरण सर्वात महत्त्वाचे आहे. त्यात त्यांनी महाभारतकालीन समाजस्थितीचे सुसंगत दर्शन घडविले आहे. भारतीय युद्धाच्या काळाबरोबर एका युगाचा अंत होतो ही कल्पना फार जुनी असली तरी तिची फोड करून इतक्या संगतवारपणे कोणी मांडली नव्हती हेच या पुस्तकाचे अनन्यसाधारण वैशिष्ट्य आहे. त्यांनी रेखाटलेले भारतीय युद्धकालीन समाजस्थितीचे चित्र थोडक्यात असे आहे :--

दाशराज्ञ युद्धाचा शेवट ते भारतीय युद्धाचा शेवट या युगाचा अन्त महाभारताबरोबर होतो. त्या वेळचे सामाजिक चित्र, राजन्य, ब्राह्मण व सर्वसाधारण प्रजा म्हणजे विश व दास असे होते. भारतीय युद्धात भाग घेणारा समाज प्रामुख्याने त्रैवर्णिक होता. क्षत्रिय व ब्राह्मण हे प्रमुख वर्ग असून एकमेकांचे प्रतिस्पर्धी, एकमेकांचे पूरक व आधारस्तंभ म्हणून ते राहात होते. कृषी, गोरक्ष्य आणि वाणिज्य ही कर्मे वैश्यांची आणि परिचर्यात्मक . कामे शूद्रांची होती. शूद्रांची संख्या कमी असून त्यांना कोणतेही हक्क नव्हते. चातुर्वर्ण्यात्मक समाजव्यवस्थेची नुकतीच सुरवात होत होती. वर्ण होते तरी जाती स्पष्ट स्वरूपात नसून जातीसमूह होते. सूतांचा वेगळा समूह असून त्यांचे स्थान विश व शूद्र यांच्यावरचे होते. त्या वेळची क्षत्रिय घराणी जुनी असून ती आपल्या क्षत्रियत्वाला, परंपरागत .राज्याला आणि समाजाच्या विशिष्ट बांधणीला फार जपत व आपापल्या प्रदेशांना चिकटून राहात. ब्राह्मण मात्र निरनिराळ्या राज्यांत जात येत असत. क्षत्रियांपेक्षा ब्राह्मणांत संकर अधिक होत असे. वर्ण व जाती असलेल्या समाजाचे महाभारतातील चित्र उठावदार नाही. या उलट कौटुंबिक चित्र उठावदार, बायकाव्यांनी भरलेले, पितृप्रधान कुटुंबाचे प्रातिनिधिक असे आहे. जन्मदाते कुटुंब आणि सोयरीकीचे कुटुंब अशा दोन विश्वांत आयुष्य सामावले होते. त्या वेळचे जग आकुंचित संबंधित गटांनी व्यापलेले असे पितृप्रधान कुटुंब त्या वेळच्या समाजाचा आधारस्तंभ होते. धर्माला सार्वजनिक स्वरूप नव्हते. धर्माचा बांधीवपणा समाजाच्या एकसंधपणामुळे होता. राज्ये लहान लहान व वंशपरंपरा चालणारी असून रानांनी वेढलेली होती. साम्राज्य स्थापण्याची प्रथा नव्हती. महाभारतातील दैवतकल्पना जास्त प्रमाणात वेद ब्राह्मण-कालीन आहेत. महाभारतातील धर्म यज्ञप्रधान असला, तरी यज्ञक्रिया पुढच्या काळाइतकी महत्त्वाला चढली नव्हती. महाभारतीय समाजजीवनाच्या मागे आचारविचारांची घट्ट चौकट होती. गोरक्षण व कृषी हा जीवनाचा पाया होता. सर्व क्षत्रिय गाईंचे मोठाले कळप पाळीत. धर्म, तत्त्वज्ञान व सामाजिक मूल्ये यात खूप पुढे गेलेले हे लोक ऐहिक गोष्टीत फार पुढारलेले नव्हते. इतर पुढारलेल्या संस्कृतींच्या मानाने ते मागासलेले होते.

अशा प्रकारे संगतवार व ठळक चित्र त्यांनी ' युगान्ता'त उभे केले आहे. त्यावरून तत्कालीन समाजस्थितीची साकल्येकरून कल्पना यायला मदत होते. त्यांच्या विवेचनातील काही गोष्टी खटकल्याशिवाय राहात नाहीत. महाभारतकाळी लिपी आणि लेखन नसावे हे त्यांचे अनुमान पटणारे नाही. केवळ शाई, पत्र आणि लेखणी यांचा उल्लेख येत नाही म्हणून लेखनकला त्या काळी अवगत नव्हती असे अनुमान काढणे योग्य होणार नाही. तसेच त्या काळच्या लोकांना घोड्यावर बसण्याचे माहीत नव्हते हे विधान मान्य होण्यासारखे नाही. ' अश्वसादी ' हा शब्द ऋग्वेदाच्या ८ व्या मंडळात आला आहे. त्यावरून वेदकाळीही घोड्यावर बसणे माहीत होते असे दिसते. भारतीय युद्धातील संशप्तक ' अश्वसादी ' होते असा उल्लेख आहे.

युगान्तकारांनी महाभारत आणि तत्कालीन समाज आणि इलियड आणि त्या वेळचा ग्रीक समाज यांची तुलना करून या दोहोंतील साम्यभेद दर्शविले आहेत. ग्रीसमध्ये स्त्रीला भारतातल्यापेक्षा जास्ती महत्त्व होते हे त्यांचे विधान विवाद्य आहे. त्यांनी दिलेली स्त्रियांची उदाहरणे अविस्मरणीय असतील, पण तेवढ्यावरून ग्रीसमध्ये स्त्रियांना अधिक महत्त्व होते असे म्हणता येणार नाही. ग्रीसच्या नगरराज्यांच्या लोकशाहीत गुलामांप्रमाणेच स्त्रियांनाही वगळण्यात येत असे, ग्रीक तत्त्ववेत्त्यांची मतेही स्त्रियांबद्दल चांगली होती असे दिसत

नाही. डिमॉक्रिटस स्त्रियांना दुष्ट ( evil ) समजत असे. रिपब्लिकमध्ये स्त्रियांना समान लेखणारा प्लेटो स्त्रीला हीनच लेखतो. ॲरिस्टॉटलही स्त्रियांना फारसे महत्त्व देत नाही. मातृप्रधान संस्कृती वगळल्या तर सर्व प्राचीन संस्कृतींत स्त्रियांचा दर्जा सारखाच हीन होता. ग्रीसची सारी समाजव्यवस्था गुलामीपद्धतीवर आधारलेली होती. भारतातील दासवर्ग हा ग्रीक दासासारखा गुलामी-पद्धतीला जखडलेला नव्हता. ग्रीसमध्ये देवदैवतांचे स्तोम फार होते. महाभारतकाळी तसे असल्याचे दिसत नाही.

भारतीय युद्ध हे भावाभावांतील युद्ध होते असे त्या युद्धाचे सुगमीकरण ( simplification ) युगान्तकारांनी केलेले दिसते. पण त्या संहारक युद्धाच्या स्वरूपाचा किंवा पार्श्वभूमीचा शोध त्यांनी घेतलेला दिसून येत नाही. त्या वेळेचा सारा ज्ञात भारत त्या युद्धात खेचला गेला होता. युद्ध अगदी निर्णायक स्वरूपाचे झाले. या युद्धात गंगायमुनेच्या पश्चिमेकडचे राजे आणि पूर्वेकडचे राजे असे विरोधी तट पडलेले दिसतात. एका बाजूला कौरव, मद्र, गांधार, वाल्हिक, नाग आदींचा संघ आणि दुसऱ्या बाजूला कृष्ण व त्याचे पाठीराखे यादव, पांडव, पांचाल, विराट आदींचा संघ, यांच्यातील तो संग्राम होता. यावरून हे युद्ध केवळ मालमत्तेच्या वाटणीकरता भावा-भावात झालेले भांडण नव्हते किंवा विदुर जरी धर्माचा पिता ठरला, तरी ' तिन्ही भावांच्या मुलांतील युद्ध ' ही नव्हते. त्याचे स्वरूप फार व्यापक असले पाहिजे. त्या-मागची अर्थवत्ताही फार मोठी असली पाहिजे. त्यावर प्रकाश पडेल, तर त्या प्राचीन इतिहासाचा चांगला उलगडा होईल. इतिहासात या दृष्टीने अंधारात चाच-पडण्याचा आज प्रसंग आहे. भारतीय युद्धाने जुन्या युगाचा अंत झाला इतकेच नव्हे तर त्या विध्वंसक युद्धाने भारतीय समाज जो मोडकळीस आला त्यातून खऱ्या अर्थाने त्याची घडी पुढच्या काळात कधी व्यवस्थितपणे बसलीच नाही. त्या मोडकळीत बुद्धकांतीही विरून गेली. भारतीय युद्धानंतरचा या देशाचा पुढचा इतिहास म्हणजे समाज सावरण्याच्या धडपडीचा इतिहास होय.

' युगान्ता'ने मराठी वाङ्मयात एक अमोल भर टाकली यात शंकाच नाही. या पुस्तकाच्या वाचनाने महाभारता-विषयी नवी दृष्टी प्राप्त होते. काही रूढ कल्पनांना ते धक्का देत असले—आणि त्यावद्दल शोक करण्याचे काही कारण नाही—तरी त्यांचे विवेचन बहुंशी ग्राह्य होण्यासारखे आहे. त्यांची विचिकित्सक आणि संशोधक दृष्टी निश्चितपणे पुढील समीक्षकांना मार्गदर्शक होईल. महाभारताच्या समीक्षणाचा नवा पायंडा इरावतीबाईंनी पाडल्यावद्दल त्यांना धन्यवाद दिले पाहिजेत. त्यांनी म्हटल्याप्रमाणे त्यांचे एकंदर विवरण स्पष्ट आणि सुबोध झाले आहे. त्यांची लेखनशैली मोहक आहे. ती सुंदर, सुटसुटीत, अर्थगर्भ आणि परिणामकारक आहे. त्यांच्या विवेचनपद्धतीत वाहता ओघ असून वाचक भारावून तीवरोवर वाहात जातो. ग्रंथ वाचून संपल्या-नंतर नवा ठेवा सापडल्याचा आनंद वाटतो आणि वैचारिक समाधान लाभते. अशाच चतुरस्र लेखनाचा लाभ ग्रंथकर्तीकडून वाचकांना यापुढेही होत जावा ही इच्छा.

• • •

## साभार–स्वीकार

**ओंकार** ( ऐति-कादं. ) भीमराव कुलकर्णी, दत्त प्रकाशन, पुणे ९; १२ रु.

**मिला** ( कादं. ) इंद्रायणी सावकार, सोमैय्या पब्लि. प्रा. लि. मुंबई १४, ७॥ रु.

**सती** ( कादं. ) इंद्रायणी सावकार, सोमैय्या पब्लि. प्रा. लि. मुंबई १४; ८ रु

**मनवा** ( गोष्टी ) पु. शि. रेगे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४ रु.

**ऑर्फियस** ( कथा व लेख ) दिलीप पु. चित्रे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ६ रु.

**ठोकळ गोष्टी** ( भाग ५ ) ग. ल. ठोकळ, ठोकळ प्रकाशन, पुणे २; ६ रु.

**मजेदार लोककथा** ( भाग २ ) मं. भा. नाडकर्णी, अभिनव प्रकाशन, मुंबई १२; १॥ रु.

**आकाशवेडी** ( कविता ) पद्मा, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४॥ रु.

अनुक्रमणिका

# पहिला मराठी कोरीव लेख कोणता ?

● वा. वि. मिराशी ●

मराठी भाषेचा उद्गम केव्हा झाला आणि ती लेखनात केव्हा आली याविषयी आपणांस कुतूहल असते. मराठी भाषेत अगदी पहिले समजले जाणारे महानुभावीय ग्रंथ तेराव्या शतकातील आहेत. त्यामध्ये मराठी भाषा चांगली परिणतावस्थेत आलेली दिसते. त्याच्यापूर्वी कित्येक शतके तिचा उद्गम झाला असावा. मराठीतील आरंभीचे ताडपत्रे, कागद वगैरेवरचे लेख कित्येक शतकांच्या दीर्घ कालानंतर आतापर्यंत अस्तित्वात असणे शक्य नसल्यामुळे मराठीतील कोरीव लेखांच्या प्रमाणाला विशेष महत्त्व येते.

## गोम्मटाच्या मूर्तीवरील लेख

वि. का. राजवाडे आणि आबा चांदोरकर यांनी शालिवाहन शके ४१० चे म्हणून चार ताम्रपट प्रसिद्ध केले, पण ते आता बनावट ठरले आहेत. तीच कथा राजवाडे यांनी संपादिलेल्या शके ६५८ च्या चिकुर्डे ताम्रपटाची आहे. त्यामुळे श्रवण बेळगोळ येथील गोम्मटाच्या मूर्तीवरील 'श्रीचावुण्डराजे करवियले' हा कोरीव लेख मराठीतील पहिला लेख मानण्यात येत असे. त्या लेखात कालाचा उल्लेख नाही पण चामुण्डराय हा पश्चिम गंग नृपती राजमल्ल याचा मंत्री होता. या राजमल्लाचा शासनकाल इ. स. ९७४ ते ९८४ असा आहे. तेव्हा त्या कालातच श्रवण बेळगोळचा हा मराठी लेख कोरला गेला असावा असे म्हणता येते. याच्याही पुढे जाऊन तो लेख इ. स. ९७८ च्या पूर्वी कोरला गेला नसावा असे अनुमान करता येते. कारण चामुण्डरायाने आपल्या 'चामुण्डरायपुराणा'त आपल्या इतर महत्कार्यांचा उल्लेख केला आहे. पण त्यात गोम्मटाच्या मूर्तीच्या स्थापनेचा उल्लेख नाही. तेव्हा त्या मूर्तीची स्थापना आणि अर्थातच तिच्यावरील पूर्वोक्त लेख ही इ. स. ९७८ नंतरची सुमारे इ. स. ९८३ ची असावी असे अनुमान होते. तेव्हा मराठीतील हा पहिला कोरीव लेख इ. स. च्या दहाव्या शतकाच्या शेवटच्या पादातील होय असे मानण्यात येत असे.

पण गोम्मटाच्या मूर्तीवरील पूर्वोक्त लेख एपिग्राफिया इंडिका (पु. ७, पृ. १०८) मध्ये संपादन करणाऱ्या डॉ. हुल्त्शच्या मते तो लेख त्यानंतरचा असावा. त्या मूर्तीवर 'श्रीगंगराजे सुत्ताले करवियले' (श्रीगंगराजाने सभोवारचा तट बांधविला) असा दुसरा लेख आहे. हा गंगराज होयसळनृपती विष्णुवर्धन (इ. स. ११०६–११५२) याचा सेनापती होता. या दुसऱ्या लेखाचा काल सुमारे इ. स. १११७ हा आहे. चामुण्डरायाचा लेख इ. स. ९८३ चा मानल्यास गोम्मटाच्या मूर्तीवरील या दोन लेखांतील अंतर १३४ वर्षांचे येते. पण या दोन्ही लेखांची अक्षरवटिका अगदी एकसारखी आहे. १३४ वर्षांच्या दीर्घ कालावधीत अक्षरवटिकेत बिलकुल फरक पडला नसेल हे असंभवनीय आहे. तेव्हा हे दोन्ही लेख इ. स. १११७ च्या सुमारास म्हणजे बाराव्या शतकाच्या प्रथम पादात कोरले असावे. श्रवण बेळगोळ हे ठिकाण कानडी मुलखात असले तरी महाराष्ट्रातूनही अनेक भाविक जैन गोम्मटाच्या दर्शनाकरिता तेथे जात असत. त्यांना तो पुतळा कोणी करविला व त्याच्या भोवतालचा तट कोणी बांधविला हे माहीत व्हावे म्हणून हे दोन्ही लेख सेनापती गंगराज याच्या काळी म्हणजे सन १११७ च्या सुमारास एकदमच कोरविले असावे असे हुल्त्शचे मत होते. दोन्ही लेखांतील अक्षरवटिकेचे सादृश्य लक्षात घेता ते मत सयुक्तिक वाटते.[1]

चामुण्डरायाच्या लेखाचा काल इ. स. १११७ हा मानल्यास तो लेख मराठीतील पहिला कोरीव लेख होणे शक्य नाही. कारण त्याच्या अगोदरचे काही मराठी कोरीव लेख सापडले आहेत. अलीकडे डॉ. मो. गं. दीक्षित यांनी शके ९८२ (इ. स. १०६०) चा दिवे आगर (रत्नागिरी जिल्हा) ताम्रपट प्रकाशित केला आहे.[2] तो मराठीतील पहिला कोरीव लेख असे त्यांचे

१ प्राचीन मराठी कोरीव लेख (प्रा. म. को. ले.), प्रतिमा, पृ. ४.

२ एपिग्राफिया इंडिका (ए. इं.), पु. २८, पृ-१२१.

म्हणणे आहे. याच्या उलट डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी आपण प्रसिद्ध केलेला शिलाहार नृपती प्रथम केशिदेव याचा शके ९३४ चा अक्षी शिलालेख हा मराठीतील पहिला कोरीव लेख असे आग्रहाने प्रतिपादिले आहे.[3] तेव्हा सत्यनिर्णयार्थ या दोन्ही लेखांचा बारकाईने विचार केला पाहिजे.

### अक्षी येथील शिलालेख

प्रथम अक्षी-शिलालेख घेऊ. हा लेख कुलाबा जिल्ह्यातील अलिबाग गावापासून दक्षिणेस तीन मैलांवरच्या अक्षी गावास लागून असलेल्या रस्त्याच्या बाजूस जमिनीत पुरलेल्या शिलेवर आहे. हा लेख कित्येक वर्षांपासून माहीत आहे; पण त्याचे ठसे घेऊन व वाचन करून तो प्रथम प्रसिद्ध करण्याचे श्रेय डॉ.शं.गो. तुळपुळे यांना आहे.[4] त्यांनी हा लेख मराठी संशोधन पत्रिका, वर्ष ६, पृ. ११–१५ वर 'पहिला कालोल्लिखित मराठी लेख' या शीर्षकाखाली छापासह प्रसिद्ध केला. या लेखाची शिला आज अनेक वर्षे उन्हापावसात उघड्यावर असल्यामुळे हा लेख अतिशय खराब झाला आहे. डॉ. तुळपुळे यांनी त्याचे वाचन मोठ्या परिश्रमाने करून त्याची चर्चा केली असली तरी त्यांच्या पहिल्या वाचनात अनेक चुका झाल्या होत्या. त्यामुळे त्यांची चर्चाही चुकली होती. त्यांनी आपल्या लेखाच्या सुट्या प्रती काही विद्वानांकडे अभिप्रायार्थ पाठविल्या होत्या. त्यांपैकी डॉ. मो. ग. दीक्षित यांनी एक महत्त्वाची दुरुस्ती सुचविली. ती डॉ. तुळपुळे यांनी मराठी संशोधन पत्रिका, वर्ष ६, पृ. ११६–१७ वर स्वीकारली. डॉ. दीक्षित यांनी स्वतः हा लेख छापासह मराठी संशोधन पत्रिका वर्ष ९, पृ, १९–२० वर प्रसिद्ध केला आहे. त्यापूर्वी त्यांनी हा लेख नागपूरच्या 'सुषमा' मासिकात (वर्ष ११ मे १९५९, पृ. २९–३१) छापाशिवाय प्रसिद्ध करून त्याची सविस्तर चर्चा केली होती. त्यांनी हा लेख शके ११३२, प्रभव संवत्सराचा आणि उत्तर कोकणात राज्य करणाऱ्या द्वितीय केशिदेव याच्या काळचा असून त्यात त्या राजाचा प्रधान भइर्जु याने महालक्ष्मीच्या यज्ञानिमित्त एक पुष्करिणी खोदविली असा उल्लेख असल्याचे दाखविले होते. डॉ. तुळपुळे यांनी नंतर हा लेख सन १९६३ मध्ये प्रकाशित झालेल्या आपल्या 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या बृहद्ग्रंथात पृ. १–७ वर छापासह पुनः प्रकाशित केला आहे. त्यांच्या मते हा लेख शके ९३४ प्रधावी (परिधावी) संवत्सराचा व शिलाहार नृपती प्रथम केशिदेव याचा काळाचा असून त्यात त्याच्या भइर्जु नामक प्रधानाने अधिक (ज्येष्ठ) मास, द्वितीय पक्ष, शुक्रवार (अष्टमी) या दिवशी देवीच्या बोडणासाठी नऊ कवली धान्य नेमून दिले असा उल्लेख आहे. हा मराठीतील पहिला कालोल्लिखित लेख होय असा त्यांचा दावा आहे.

डॉ. तुळपुळे यांच्या विनंतीवरून त्यांच्या पूर्वोक्त ग्रंथाला पुरस्कार लिहिण्यापूर्वी तो चाळत असता त्यातील या पहिल्याच कोरीव लेखाच्या कालाविषयी या दोन विद्वानांतील हा मोठा मतभेद माझ्या ध्यानात आला आणि त्याचा उल्लेख मी आपल्या पुरस्कारांत केला आहे. तथापि त्या वेळी या लेखाचा बारकाईने अभ्यास करणे शक्य नव्हते. त्यानंतर अलीकडे काही निमित्ताने शिलाहारांच्या कोरीव लेखांचा सूक्ष्म अभ्यास करण्याचा योग आल्यामुळे येथे या लेखाची सविस्तर चर्चा करण्याचे योजिले आहे.

### शिलाहार नृपतींची वंशावळ

प्रस्तुत लेख एका शिलाहार नृपतीचा असल्यामुळे पुढील विवेचन समजण्यासाठी उत्तर कोकणच्या शिलाहारांची वंशावळ प्रथम देतो. (राजवटींचे कंसातील काल अदमासाने दिले आहेत)




३ प्रा. म. को. ले, पृ. ५–६.

४ पूर्वोक्त, पृ. १.

५




### अक्षीलेखाच्या कालाविषयी भिन्न मते

शिलाहार वंशाच्या तीन शाखा होत्या. एक शाखा दक्षिण कोकणात ( रत्नागिरी जिल्हा व गोव्याचा काही भाग यात ) प्रथम चन्द्रपुर ( गोव्यातील चांदोर ) आणि नंतर वलीपत्तन ( रत्नागिरी जिल्ह्यातील खारेपाटण ) येथून राज्य करीत होती. दुसरी शाखा दक्षिण महाराष्ट्रात कोल्हापूर, सातारा व बेळगाव जिल्ह्यांवर कोल्हापूर येथून आणि तिसरी उत्तर कोकणात ( ठाणे व कुलाबा जिल्ह्यांवर ) स्थानक ( ठाणे ) येथून राज्य करीत होती. या तिन्ही शाखांचा संक्षिप्त इतिहास 'संशोधनमुक्तावलि', सर ५ ( पृष्ठे १७९ ते २२६ ) मध्ये दिला आहे. उत्तर कोकणातील शाखेची स्थापना राष्ट्रकूट नृपती तृतीय गोविंद याने प्रथम कपर्दी याला त्या प्रांताची गादी देऊन केली. यादव नृपती महादेव याने तेराव्या शतकात सोमेश्वराचा पराभव करून तिचा शेवट केला. अक्षीचा लेख डॉ. तुळपुळे यांच्या मते अकराव्या शतकाच्या प्रथम पादातील प्रथम केशिदेव याच्या काळचा आहे तर डॉ. दीक्षित यांच्या मते तो तेराव्या शतकाच्या प्रथमार्धातील द्वितीय केशिदेव याच्या काळातील आहे. या दोन काळातील अंतर सुमारे दोनशे वर्षांचे आहे. यांपैकी कोणते मत बरोबर आहे याची सप्रमाण चर्चा करावयाची आहे.

### डॉ. तुळपुळे यांचे अक्षीलेखाचे वाचन

प्रथम डॉ. तुळपुळे यांचे या लेखाचे वाचन देऊ.[५]

१. गी सुष संतु । स्वस्ति ओं । पसीमस–
२. मुद्राधीपती । स्री कोंकणाचक्री–
३. वर्ती । स्री केसीदेवराय । महाप्रधा –
४. न भइर्जु सेणुई तसीमीनी काले
५. प्रव्रतमाने । सकु संवतु : ९३४ प्रधा –
६. वी संवसरे अधीकु दीवे सुक्रे वौ–
७. लु । भइर्जुवें तथा वोडणा तथा नऊ
८. कुवंली अर्धोर्गु प्रधानु । महलपु—
९. मीची वआण । लुनया कचली ज–

या लेखाचा ते असा अर्थ करतात "स्वस्ति ओम्. पश्चिमसमुद्राधिपति श्री केशिदेवराय ( राज्य करीत असताना ) त्याचा महाप्रधान भइर्जु सेणुई ( म्हणजे सेनापती ? ) असताना त्या काळी शक संवत ९३४, परिधावी संवत्सर, अधिक ( ज्येष्ठ ) मास, द्वितीय पक्ष, शुक्रवार ( अष्टमी ? ) या दिवशी भइर्जुवाने ( देवीच्या ) वोडणासाठी नउ कवली ( धान्य ) नेमून दिले. त्यास ( म्हणजे त्या दानास ) अध्वर्यु म्हणजे अध्यक्ष प्रधान होय. ( हे दान मोडील त्यास ) महालक्ष्मीची आण.

५ प्रा. म. को. ले., पृ. ९. यात प्रस्तुत लेखाच्या शेवटी अपूर्ण असलेले वाक्य आरंभी पूर्ण केले आहे. 'जगी सुष संतु' असे विवक्षित आहे असे डॉ. तुळपुळे आणि डॉ. दीक्षित दोघेही म्हणतात. लेखाच्या आरंभी इतकी जागा कोरीव ठेवली होती व तीत मागाहून अपूर्ण वाक्य पूर्ण करण्यात आले हे चमत्कारिक दिसते.

लुनया कचली म्हणजे कोरक्या (हा हे शिलालिखित कोरणारा होय.) जगात सुख असो."

या लेखातील कालनिर्देश पिल्लेजंत्रीप्रमाणे बरोबर आहे असे दाखविण्याचा प्रयत्न डॉ. तुळपुळे यांनी केला आहे. दक्षिण पद्धतीप्रमाणे शके ९३४ ला परिधावी संवत्सर येतो. त्या वर्षी एक अधिक मासही होता. (त्याचे नाव ज्येष्ठ हे लेखात दिले नाही.) त्यातील बौलु (बहुल) म्हणजे कृष्णपक्षातील शुक्रवारी हे दान दिले. तिथीचाही निर्देश लेखात नाही. पण ती महालक्ष्मीची तिथी अष्टमी असावी. इंग्रजी कालगणनेप्रमाणे या लेखाचा काल शुक्रवार ता. १६ मे इ. स. १०१२ असा ठरेल. केशिदेवाचा ताम्रपट शके ९३९ (सन १०१७) चा सापडला आहे. तेव्हा हा लेख त्याच्या कारकीर्दीत पडतो. 'सारांश, लेखातील कालोल्लेखाचा पिल्ले जंत्रीच्या आधारे दिसून येणारा मेळ, राजवटीचा जुळता निर्देश आणि एकंदर लेखाचे स्वरूप यावरून तो शके ९३४ (इ. स. १०१२) चा आहे याबद्दल शंका उरत नाही' असे डॉ. तुळपुळे यांनी म्हटले आहे.

## डॉ. तुळपुळे यांच्या मताचे परीक्षण

डॉ. तुळपुळे यांच्या वाचनातील या लेखाचा कालनिर्देश मला सकृद्दर्शनीच विलक्षण वाटला व त्याविषयी त्यांच्या ग्रंथाच्या पुरस्कारात मी खालीलप्रमाणे लिहिले–[६] 'शक संवत् ९३४ ला प्रधावी (परिधावी) संवत्सर येतो खरा, आणि त्यात एक महिना (ज्येष्ठ) अधिक होता हेही खरे; पण त्या महिन्याचा उल्लेख 'अधीकु' बरोबर यावयास नको का? छापावरून दोने असा पाठ असावा असे दिसते, 'बौलु' हे वाचन सकृद्दर्शनीच असंभवनीय वाटते. छापावरून त्या शब्दाचे पहिले अक्षर 'बै' असे दिसते. डॉ. तुळपुळे 'बौलु' हा शब्द 'बहुल' पासून व्युत्पादितात. पण 'बहुल' शब्दाचा प्रयोग नंतरच्या संस्कृत लेखातही क्वचितच आढळतो. शिवाय बहुल किंवा कृष्णपक्ष विवक्षित असता तर त्याचा उल्लेख तिथीपूर्वी यावयास पाहिजे होता; पण प्रस्तुत लेखात तिथीचा पत्ताच नाही. हा लेख महालक्ष्मीच्या प्रीत्यर्थ असल्याने ती तिथी अष्टमी असावी असा डॉ. तुळपुळे यांचा तर्क आहे. पण ती कृष्णपक्षातील का? असा प्रश्न उपस्थित होतो. तेव्हा डॉ. तुळपुळे यांचे या लेखाच्या मितीचे वाचन निर्विवाद वाटत नाही[७]'

६ प्रा. म. को. ले., पृ. ३.

७ प्रा. म. को. ले. पुरस्कार, पृ. १५.

## अक्षीलेख शके ९३४ इतका प्राचीन नाही.

संवत्सराचे ९३४ हे वाचनही बरोबर वाटत नाही त्यासंबंधी चर्चा पुढे करू पण लेखाच्या अक्षरवटिकेवरून व इतरही काही प्रमाणांवरून प्रस्तुत लेख शके ९३४ इतका प्राचीन वाटत नाही. त्यांचा विचार प्रथम करू.

## अक्षीलेखाची अक्षरवटिका

प्रथम अक्षरवटिकेच्या प्रमाणाचा विचार करू. डॉ. तुळपुळे यांनी 'इ' या अक्षराचा त्या बाबतीत आवर्जून उल्लेख केला आहे. ते म्हणतात — 'विशेषतः दोन पोकळ शून्ये व त्याखाली उकारचिन्ह (॰॰ु) यांनी सिद्ध होणारी इ (उदाहरणार्थ भइजु, ओ. ४; सेणुई, ओ. ४; भइजुवे, ओ. ७) हे या लेखाच्या प्राचीनत्वाचे निर्णायक गमक होय.' असा इकार प्राचीन होय हे खरे, पण त्याचे हे चिह्न अकराव्या शतकानंतर प्रचारातून गेले असे नाही. उदाहरणार्थ, शेवटचा शिलाहारनृपति सोमेश्वर याच्या रानवड शिलालेखातही (ओ. ४) ते आले आहे. (प्रा. म. को. ले., प्रतिमा पृ. ३४ पाहा.) तो लेख शके ११८१ (सन १२५९) चा आहे. त्यापूर्वीच्या शिलाहारनृपति मल्लिकार्जुनाच्या शके १०७८ चिपळूण लेखातही (ओ. ११) ते आढळते. (पूर्वोक्त प्रतिमा पृ. १० पाहा). हे दोन्ही लेख प्रथम केशिदेवानंतर अनेक वर्षांनी कोरले गेले. यांपैकी पहिला लेख तर द्वितीय केशिदेवाच्याही नंतरचा आहे. तेव्हा इकाराच्या आकृतीवरून अक्षीचा शिलालेख शके ९३४ इतका प्राचीन आहे असे सिद्ध होत नाही.[८]

दुसरे महत्त्वाचे अक्षर 'ध' होय. याचा आकार प्राचीन काळी 'व' सारखा असे. 'व' ला नागरीत डोक्यावर आडवी रेघ असे, पण ती 'ध' ला नसे, एवढाच फरक. 'धा' आणि 'वा' मध्ये फरक असावा म्हणून 'धा' च्या उभ्या दंडांना मध्यभागी आडव्या रेषेने जोडीत असत. असा 'ध' शके ९८२ च्या दिवे आगर ताम्रपटात ('मधुवै', ओ ८) आला आहे. (प्रा. म. को. ले., प्रतिमा, पृ. २ पाहा.) पुढे 'ध' ला डाव्या बाजूला शिंग उत्पन्न झाले. शके १०६६ च्या उदयादित्याच्या आंबे शिलालेखात 'ध'चे हे दोन्ही प्रकार आढळतात.[९] 'चरणाराधन' (ओ. ३) आणि '–व्रंमुधा'

८. प्रा. म. को. ले., प्रस्तावना, पृ. ५० वरील संदर्भ पाहा.

९ प्रा म. को ले. प्रतिमा, पृ. ५.

(ओ. १०) पाहा. मल्लिकार्जुनाच्या शके १०७८ च्या चिपळूण शिलालेखातही असेच 'ध' चे दोन्ही प्रकार दिसतात. त्यापूर्वीच्या शके ९७१ च्या मुम्मुणिराजाच्या ताम्रपटात[10] तसेच प्रथम अपरादित्याच्या शके १०४९ च्या वडवली ताम्रपटात[11] सर्वत्र प्राचीन शृंगरहित 'ध' आढळतो. तेव्हा 'ध' ला हे शिंग शके १०५० नंतर फुटलेले दिसते. अक्षी लेखात सर्वत्र 'ध' शृंगयुक्त दिसतो. 'समुद्राधीपती' (ओ. २) 'महाप्रधान' (ओ. ३-४), 'प्रधानु' (ओ. ८) पाहा. तेव्हा तो लेख शके ९३४ इतका प्राचीन असणे शक्य नाही.

तिसरे महत्त्वाचे अक्षर 'भ' होय. याच्या प्राचीन रूपात डाव्या बाजूचा भाग हात न उचलता लिहिलेला (Cursive) असतो. त्याला उघड्या तोंडाचा 'भ' म्हणतात. कालान्तराने डाव्या बाजूला उभी रेघ होऊन ती त्या अक्षराच्या उजव्या बाजूच्या दंडाला जोडली जाऊ लागली. शके ९८२ दिवे आगर ताम्रपटात[12] तसेच त्यापूर्वीच्या शके ९७१च्या मुम्मुणिराजाच्या ताम्रपटात[13] हा उघड्या तोंडाचा 'भ' आढळतो तर शके १०४९ च्या च्या अपरादित्याच्या वडवली ताम्रपटात[14] नंतरचा 'भ' दिसतो. तेव्हा 'भ' या अक्षरातील हा फरक शके १००० च्या सुमारास झाला असावा. अक्षी लेखातील 'भ' उघड्या तोंडाचा नसून नंतरच्या प्रकारचा आहे. (भइर्जु', ओ. ३ व ७ पाहा.) म्हणून तो लेख शके ९३४ इतका प्राचीन असणे शक्य नाही.

अक्षरवटिकेच्या पुराव्यावरून अक्षीचा लेख शके ९३० इतका प्राचीन असणे शक्य नाही. हे आपण पाहिले. या तऱ्हेचा अक्षरवटिकेचा पुरावा अगदी निर्विवाद असतो असे नाही. म्हणून यापेक्षा प्रस्तुत प्रकरणी बलवत्तर पुरावा मिळतो काय पाहू.

### अक्षीलेखात उल्लेखिलेला केशिदेव

अक्षीलेख केशिदेवाच्या काळचा हे डॉ. दीक्षित व डॉ. तुळपुळे या दोघांनाही मान्य आहे. पण डॉ. दीक्षित तो दुसऱ्या केशिदेवाचा, तर डॉ. तुळपुळे तो पहिल्या केशिदेवाचा असे मानतात. अक्षीलेखात 'पसीमसमुद्राधीपती' (पश्चिम समुद्राचा अधिपती) व श्रीकोंकणचक्रीवर्ती (श्रीकोंकणचक्रवर्ती) अशी दोन विरुदे केशिदेवाला लावण्यात आल्यामुळे तो उत्तर कोंकणच्या शिलाहारवंशातील होय यात संशय नाही. या वंशात दोन केशिदेव होऊन गेले असे आतापर्यंत सर्व विद्वानांनी मानले आहे. पण त्यांपैकी पहिल्याचे अस्तित्व संशयास्पद आहे हे प्रथम दाखवितो.

### अरिकेसरीला 'केशिदेव' असे दुसरे नाव नव्हते

शिलाहारवंशी अपराजिताला दोन पुत्र होते—(१) द्वितीय वज्जड, आणि (२) अरिकेसरी. या अरिकेसरीलाच 'केशिदेव' असे दुसरे नाव होते असे मानले जाते. याला प्रमाण छित्तराजाच्या भांडुप ताम्रपटातील पुढील श्लोकार्ध (क्र. १०) हा होय.[15] तस्मादभूद्वज्जडदेवनामा ततोग्रजः श्रीकेसिदेवश्च। त्या ताम्रपटात हा श्लोक पूर्ण केला नाही. अर्धाच सोडून दिला आहे. त्याचे वृत्तही ठीक नाही. त्या श्लोकार्धाचा अर्थ अपराजितानंतर वज्जड गादीवर आला आणि नंतर त्याचा वडीलभाऊ श्रीकेशिदेव राज्य करू लागला असा होतो. **पण शिलाहारांच्या इतर कोणत्याही ताम्रपटात या केशिराजाचे नाव येत नाही.** वज्जडाचा धाकटा भाऊ आणि उत्तराधिकारी म्हणून अरिकेसरीचेच नाव येते. स्वतः अरिकेसरीचा ताम्रपट (शके ९३९ चा) ठाणा येथे सन १७८८ मध्ये सापडला होता. तो अद्यापि प्रकाशित झाला नाही. तथापि त्याचे इंग्रजी भाषांतर एशियाटिक रीसर्चेस (पु. १, पृ. ३५७ इ.) मध्ये दिले आहे. त्यातही त्याचे नाव 'अरिकेसरी' असेच तीन ठिकाणी आले आहे. 'केशिदेव' नावाचा कोठेही उल्लेख नाही. अरिकेसरीनंतर वज्जडाचे पुत्र छित्तराज व मुम्मुणिराज, त्याचा नातू (नागार्जुन नामक पुत्राचा पुत्र) अनन्त-

---

१० ए. इं., पु. २५, पृ. ५६ समोरील छापाच्या नवव्या ओळीतील 'दुग्धाम्बुधि' शब्द पाहा.

११ जर्नल ऑफ दि बॉंबे ब्रँच ऑफ रॉयल एशिटिक सोसायटी (पुरातन माला), पु. २१ नवव्या ओळीतील वरील शब्द पाहा.

१२. प्रा. म. को. ले. प्रतिमा, पृ २, ओ. ३ मधील 'भट्ट' शब्द पाहा.

१३. ए. इं., पु. २५, पृ. ५६ समोरील छापातील ओ. ९ मधील '—प्यभवत्' शब्द पाहा.

१४. ज. बॉं. ब्रँ रॉ. ए. सो. (पुरातन माला), पु. २१ यातील या लेखाच्या पहिल्या ओळीतील 'लभते' शब्द पाहा.

१५ इं. अँ., पु. ५ पृ. २७७ इत्यादि.

देव आणि पणतू अपरादित्य यांचे अनेक ताम्रपट सापडले आहेत.[१६] त्यांमध्ये शिलाहारांची वंशावळ अगदी पहिला राजा प्रथम कपर्दी यापासून दिली आहे. त्या सर्व ताम्रपटांत अरिकेसरीचेच नाव येते. केशिदेवाचे नाव कोठेही येत नाही. त्यानंतरच्या शिलाहारांच्या कोरीव लेखात वंशावळ येत नसल्यामुळे अरिकेसरी आणि केशिदेव यांपैकी कोणतेही नाव येत नाही हे सांगणे नकोच. शिवाय तिन्ही शाखांतील कोणत्याही शिलाहार नृपतीने एकापेक्षा अधिक नावे धारण केल्याचे इतिहासात नमूद नाही.

तर मग भांडुप ताम्रपटातील पूर्वोक्त श्लोकार्धात तरी केशिदेवाचे नाव कसे येते असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचे उत्तर ' लेखकाच्या निष्काळजीपणामुळे ' हे होय. या निष्काळजीपणामुळे त्याने त्या श्लोकाचा अर्धा भाग गाळून टाकला हे आपण मागे पाहिले आहे. लिहिलेल्या अर्ध्या भागातही त्याने चूक केली असावी.

' तस्मादभूद्वज्जडदेवनामा ततोऽनुजोऽरिकेसरिदेवश्च'
असे लिहिण्याऐवजी त्याने

' तस्माद्भूद्वज्जडदेवनामा ततोऽग्रजः श्रीकेसिदेवश्च।'
असे लिहिले. या लिहिण्यात त्याने दोन चुका केल्या. त्यांपैकी एक चूक अगदी ढोबळ आहे. वज्जडानंतर गादीवर आलेला त्याचा भाऊ अग्रज ( थोरला ) नसून अनुज ( धाकटा ) होता.[१७] शिलाहारांच्या कोणत्याही उत्तरकालीन ताम्रपटात अरिकेसरीला वज्जडाचा वडील भाऊ म्हटले नाही. सर्वत्र त्याला त्याचा धाकटा भाऊच म्हटले आहे. वज्जडाच्यानंतर तो गादीवर आला याचे कारण वज्जडाच्या निधनाच्या वेळी त्याचा पुत्र छित्तराज लहान होता हे होय. पुढे छित्तराज गादीवर बसला तेव्हाही तो लहानच होता असे त्याच्या भांडुप ताम्रपटात म्हटले आहे. तेव्हा वज्जडाच्या निधनाच्या वेळी तो अगदीच लहान असावा. म्हणून त्याचा चुलता अरिकेसरी गादीवर बसला असे दिसते. तेव्हा त्याला वज्जडाचा अग्रज म्हणण्यात त्या ताम्रपटाच्या ऐवजी त्याने ' ततोऽग्रजः श्रीकेसिदेवश्च ' असे चुकीने लिहिले असावे. सामान्यतः शिलाहारांच्या पूर्वीच्या दानपत्रांतील श्लोक त्यांच्या पुढील दानपत्रात घेतले जातात. पण हा श्लोक पुढील कोणत्याही दानपत्रात न आल्यामुळे ही चूक आतापर्यंत दुरुस्त झाली नाही.

लेखकाने चूक केली हे स्पष्ट आहे. तशीच दुसरीही चूक त्याने केली असावी. ' ततोऽनुजोऽरिकेसरिदेवश्च '

तेव्हा ( पहिला ) केशिदेव असा राजा शके ९३४ च्या सुमारास झालाच नव्हता. तेव्हा त्याचे नाव त्या संवत्सराच्या लेखात येणार कसे? 'अगा जे झालेचि नाही। तयाची वार्ता पुससी काई॥' अर्थातच ह. अक्षीलेख नंतरच्या इ. स. ११९५ ते १२४० या कालात होऊन गेलेल्या–केशिदेवाचा असला पाहिजे. त्या लेखातील शकवर्ष या अनुमानाला उपोद्बलक आहे हे पुढे दाखविले आहे.

वरील अक्षेप ' मूले कुठारः ' या प्रकारचा आहे तो न मानला आणि दोन केशिदेव होऊन गेले असे मानले तरी अक्षी लेख पहिल्या केशिदेवाच्या काळचा असणे शक्य नाही हे कसे दाखविता येते. कसे ते पाहू.

### अक्षीलेखातील राजविरुदे

अक्षी लेखातील केशिदेवाला ' पश्चिमसमुद्राधिपति ' आणि ' श्रीकोंकणचक्रवर्ती ' अशी दोन विरुदे लावली आहेत. सामान्यतः शिलाहार राजे आपल्या पूर्वजांच्या सारखी बिरुदे धारण करीत. क्वचित एखाद्याने नवे बिरुद धारण केले तर त्याचा उत्तराधिकारी ते पुढे चालवित असे. 'पश्चिमसमुद्राधिपति' हे बिरुद अपराजितदेवाच्या शक-संवत ९१५ च्या जंजिरा ताम्रपटात प्रथम आढळते.[१८] अक्षी लेखाचा काल शक संवत् ९३४ असल्यास त्यातील केशिदेवाने ते बिरुद धारण केले असल्यास आश्चर्य वाटणार नाही. पण ' कोंकणचक्रवर्ती' या दुसऱ्या बिरुदाची गोष्ट तशी नाही. ते बिरुद द्वितीय अपरादित्याच्या शक-संवत ११०८ च्या परळ शिलालेखात प्रथम दृष्टीस पडते.[१९] शक-संवत ९३४ च्या प्रथम केशिदेवाने ते धारण केले असणे संभवनीय वाटत

---

१६ छित्तराजाचे भांडुप व बर्लिन म्यूझियम ताम्रपट, मुम्मुणीचे ठाणा व प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझियम ताम्रपट आणि अपरादित्याचा वडवली ताम्रपट यांतील शिलाहारांची वंशावळ पाहा.

१७ या विषयी इंडियन कल्चर, पृ. २, पु. ४०६ वरील डॉ. अळतेकरांनी केलेली चर्चा पाहा.

१८ Important Inscriptions from the Baroda State, pp. 35 f.

१९ प्रा. म. को. ले., पृ. ८३.

नाही आणि अरिकेसरीचे केशिदेव असे दुसरे नाव असल्यास त्याच्या ९३९ च्या ताम्रपटात ते विरुद आढळत नाही ही गोष्टही वरील तर्काला उपोद्वलक आहे. द्वितीय केशिदेव द्वितीय अपरादित्यानंतर होऊन गेला असल्यामुळे त्याच्या अक्षी लेखात ते आढळले तर त्यात आश्चर्य नाही. त्याच्या नंतर गादीवर आलेल्या शेवटच्या शिलाहारनृपति सोमेश्वराने आपल्या शके- ११८१ च्या रानवड शिलालेखात[२०] आणि शके ११८२ च्या चांजे शिलालेखात[२१] 'कोंकणचक्रवर्ती' हे विरुद धारण केलेले दिसते. तेव्हा हे विरुद इ. स. च्या अकराव्या शतकानंतर शिलाहार नृपतीनी धारण केलेले दिसते. त्यापूर्वीच्या शिलाहारांच्या कोणत्याही लेखात ते आढळत नाही. तेव्हा हे विरुद धारण करणारा केशिदेव अकराव्या शतकानंतर होऊन गेला असावा. अर्थात् अक्षी-लेखात या विरुदाचा उल्लेख असल्यामुळे त्या लेखाचा काल शके ९३४ ( सन १०१२ ) असणे संभवनीय वाटत नाही.

## डॉ. दीक्षित यांचे अक्षीलेखाचे वाचन

मग अक्षीलेखाचा खरा काळ कोणता असा प्रश्न उपस्थित होतो. त्याची चर्चा करण्यापूर्वी डॉ. दीक्षितांनी केलेले त्याचे वाचन व त्याचा अर्थ देऊ.[२२]

### वाचन

१. गी सुप संतु । स्वस्ति ओं पसीमस–
२. मुद्राधीपती । श्री कोकणचक्री–
३. वर्ती । श्रीकेपीदेवर ( रा ) य । महाप्रधा–
४. न भइजु सेणुई तसीमीनीक ( का ) ले
५. प्रव्रतम ( मा ) ने सकु संवतु ११३२ प्रभ–
६. वा संवसरे : अक्षि ( ? ) कडी [ ल*] धर्मुका वौ–
७. लु । भईर्जु—तळा—त व्हान उ–
८. करली अघोर्गु ( ? ) प्रधानु । मह ( हा ) लपु–
९. मीची यज्ञा कतु ( रु ) न पोकरली । ज–

### अर्थ

स्वस्ति । पश्चिमसमुद्राधिपति श्रीकोंकणचक्रवर्ती श्रीके-शिदेव व त्याचा प्रधान शेणवी भइजु यांच्या राज्यात शकसंवत् ११३२ प्रभव संवत्सरात अक्षीकडील धर्मकृत्याविषयी सांगितले जात आहे. भइर्जु याच्या ......हान म्हणजे पुष्करिणी उकरली गेली तिचा कर्ता प्रधान ( म्हणजे भइर्जु ) होता. महालक्ष्मीच्या यज्ञानिमित्त ती पोखरली- ( म्हणजे खणली ) गेली. सर्व जगात सुख होवो.

डॉ. दीक्षित यांनी प्रस्तुत लेखाचा काळ शके ११३२ प्रभव संवत्सर असा वाचला आहे. व हा लेख द्वितीय-केशिदेवाच्या काळचा मानला आहे. यावर डॉ. तुळपुळे यांनी पुढील टीका केली आहे[२३]:–'पिल्ले जंत्रीप्रमाणे किंवा अन्य कोणत्याही कोष्टकाने शक ११३२ ( गत-किंवा चालू ) या वर्षी प्रभव संवत्सर नाही. गत शक ११३२ त प्रमोद व चालू शक ११३२ त शुक्ल संवत्सर आहे.......तात्पर्य, शक ११३२ वाचून शकसंवत्सराचा मेळ बसतो हे डॉ. दीक्षितांचे मत बरोबर नाही.'

## अक्षीलेखाचा खरा काळ

डॉ. तुळपुळ्यांची टीका बरोबर आहे. पण त्यांनी दाखविलेली अडचण दुर्लंघ्य नाही. अक्षीलेखातील संवत्सराचे वाचन ११३२ नसून ११३१ आहे. संवत्सर-संख्येतील शेवटचा आकडा २ नसून १ आहे. तो २ असता तर त्याला गाठ असती. दिवे आगर ताम्रपटाच्या ९८२ संवत्सरातील शेवटच्या आकडयाची आकृती पाहा. तेव्हा हा लेख शके ११३१ चा आहे. सामान्यतः शक-संवत्सराची संख्या गतवर्षाची द्योतक असते. पण क्वचित तिने वर्तमान ( चालू ) शकही दाखविला जातो. याची अनेक उदाहरणे मी माझ्या कलचुरी व गंग संवतांच्या कालगणनेच्या परीक्षेत दाखविली आहेत.[२४] तेव्हा अक्षी लेखातील ११३१ वर्ष चालू मानल्यास सर्व अडचण दूर होते. तसेच संवत्सराचे नाव विभव आले आहे.[२५] चालू शक वर्ष ११३१ म्हणजे गत शक वर्ष ११३० ला षष्टि-संवत्सरचक्रातील विभव संवत्सर होते हे पिल्ले जंत्रीत दिले आहे.

शके ११३० म्हणजे इ. स. १२०८–९ हे वर्ष द्वितीय अपरादित्याचा पुत्र केशिदेव याच्या कारकीर्दीत पडते;

२० प्रा. म. को. ले., पृ. १५९.
२१ पूर्वोक्त, पृ. १६४.
२२. मराठी संशोधन पत्रिका, वर्ष ९, पृ. २०.
२३ प्रा. म. को. ले. पृ., ३, तळ टीप ५२.
२४ कॉर्पस इन्स्क्रिप्शनम् इंडिकॅरम्, पु. ४, प्रस्तावना, पृ. ११ इ.; स्टडीज् इन इंडॉलॉजी, पु. ४ पृ. १७८ इ.
२५ 'विभव' यातील 'व' त्याच ओळीतील 'संवतु' मधील 'व' सारखा आहे.

कारण त्याचे दोन कोरीव लेख शके ११२५[२६] व ११६२ चे[२७] सापडले आहेत. त्याचा पिता द्वितीय अपरादित्य याने 'कोंकणचक्रवर्ती' ही पदवी धारण केली होती हे त्याच्या शके ११०८ च्या परळ लेखावरून कळते.[२८] तीच पदवी केशिदेवाचा उत्तराधिकारी सोमेश्वर यानेही आपल्या शके ११८१ च्या रानवड[२९] आणि शके ११८२ च्या चांजे[३०] शिलालेखात उल्लेखिली आहे. या दोन राजांच्या मध्ये होऊन गेलेल्या केशिदेवाने ती पदवी आपल्या अक्षिलेखात उल्लेखावी हे साहजिक आहे. त्याच्या लोणद शिलालेखातही ती आढळते.[३१]

तेव्हा अक्षिलेख तथाकथित दुसऱ्या केशिदेवाच्या काळातील शके ११३१ चा आहे यात शंका नाही. त्यात महिना, पक्ष, तिथी व वार यांचा उल्लेख आढळत नाही. तो लेख अत्यंत खराब झाल्यामुळे त्याचा नक्की आशय काय हे सांगणे कठीण आहे. डॉ. तुळपुळे आणि डॉ. दीक्षित यांनी त्यासंबंधी भिन्न भिन्न तर्क केले आहेत. पण त्यांपैकी कोणाचेच वाचन निर्विवाद नाही. तथापि छापावरून आठव्या ओळीच्या शेवटी आणि नववीच्या आरंभी मह (हा) लपुमीची हा शब्द वाचता येतो. तसेच नवव्या ओळीच्या शेवटी डॉ. तुळपुळे यांच्या 'लुनया कचली' च्या ऐवजी पोकरली हे डॉ. दीक्षितांचे वाचन ग्राह्य वाटते. तेव्हा केशिदेवाचा प्रधान भइजु याने महालक्ष्मीच्या देवालयाजवळ विहीर किंवा पुष्करिणी खोदविली असा प्रस्तुत लेखाचा आशय दिसतो.

२६ प्रा. म. को. ले., पृ. ९८ इ.
२७ ॲनल्स ऑफ दि भांडारकर इन्स्टिट्यूट, पु. २३ पृ. ९८-१०२,
२८ प्रा. म. को. ले., पृ. ८३.
२९ पूर्वोक्त, पृ. १५९.
३० पूर्वोक्त, पृ. १६४
३१ ॲ. भां. ओ. री. इ., पु. २३, पृ. १०२

**पहिला मराठी कोरीव लेख कोणता?**

तेव्हा अक्षीच्या शिलालेखाला 'पहिला मराठी कोरीव लेख' म्हणता येणार नाही. डॉ. दीक्षितांनी प्रसिद्ध केलेल्या दिवे आगर ताम्रपटात तत्कालीन राजाचा उल्लेख नसला तरी त्याचा काळ शक-संवत ९८२, शार्वरी संवत्सर, मार्गशीर्ष पौर्णमासी, शु वार हा अगदी बरोबर आहे. त्याची इंग्रजी तारीख १० नोव्हेंबर सन १०६० अशी येते. त्या तारखेस शुक्रवार होता. सध्याच्या माहितीप्रमाणे हाच मराठीतील पहिला कोरीव लेख ठरतो.

वरील चर्चा केवळ सत्यान्वेषणाच्या हेतूने केली आहे. तीत डॉ. तुळपुळे यांचे अक्षी लेखाचा काळ व आशय याविषयी मत स्वीकारले तरी त्यांच्या 'प्राचीन मराठी कोरीव लेख' या बृहद् ग्रंथाचे महत्त्व मुळीच कमी होत नाही. कोरीव लेख खराब स्थितीत असला तर तो वाचणे अतिशय कठीण असते. त्यात मतभेदाला पुष्कळ अवकाश असतो. जुन्या लेखांची सूक्ष्म चिकित्सा केल्यावर पूर्वीचे ग्रह बदलावे लागतात. इतर लेखकांप्रमाणे मीही आतापर्यंत अरिकेसरीचे केशिदेव असे दुसरे नाव होते असे मानत असे[३२] पण या प्रश्नाचा जास्त सूक्ष्म अभ्यास केल्यावर मला माझे मत बदलावे लागले. ते या लेखात विद्वानांच्या परीक्षणार्थ पुढे मांडले आहे.

प्रस्तुत प्रश्नाच्या चर्चेकरिता डॉ. तुळपुळ्यांचा पूर्वोक्त ग्रंथ त्यात दिलेल्या कोरीव लेखांच्या उत्कृष्ट छापामुळे अत्यंत उपयोगी झाला हे नमूद करणे अवश्य आहे.[३३]

३२ संशोधनमुक्तावलि, सर ५, पृ. २०२.
३३ या लेखासोबतचा अक्षीलेखाचा छाप पुणे विद्यापीठाच्या अनुमतीने संदर्भाकरिता साभार छापला आहे.

● ● ●

## साभार-स्वीकार

**सोपानदेवी** (निवडक कविता) सोपानदेव चौधरी ठोकळ प्रकाशन, पुणे २; ८ रु.

**काव्यमय सावरकर दर्शन** श्रीराम आठवले, गौरव प्रकाशन, पुणे ९; १ रु.

**ज्ञानदेव वाङ्मयसूचि** संकलन म. प. पेठे, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई १४; २० रु.

**भवभूति** वा. वि. मिराशी, पॉप्युलर प्रकाशन मुंबई ३४; २० रु;

अनुक्रमणिका

# मराठी व्याकरणात संयुक्त क्रियापदे*

## एक ऐतिहासिक समालोचन

● कृ. श्री. अर्जुनवाडकर ●

### वादातले पक्ष

अनेक पदांचा समासतुल्य संनिकर्ष या स्वरूपाची संयुक्त क्रियापद ही कल्पना संस्कृत व्याकरणात मर्यादित स्थळी आहे; ज्याला ' आम् ' - प्रत्यययुक्त परोक्षभूतकाल म्हणतात, त्यात संयुक्त क्रियापद असते;- असे मोडक समजतात. [ मोड २२० ] जसे : ' क्षालयांचकार '. यात ' क्षालयाम् ' आणि ' चकार ' अशी दोन धातूंची दोन स्वतंत्र पदरूपे मिळून जे ' क्षालयांचकार ' असे संयुक्त पद झाले आहे, त्यातून होणारा कालात्मक-अर्थबोध आणि एकपदात्मक अभ्यास परोक्षभूताच्या रूपातून ( जसे : ' जगाम ' ) होणारा कालात्मक-अर्थबोध यांमध्ये फरक नाही. ' क्षालयाम् ' आणि ' चकार ' यांच्यामध्ये दुसरे एखादे पद येत नाही, हे प्रस्तुत क्रियापदाच्या संयुक्ततत्वाचे गमक होय. ' तं पातयां प्रथममास पपात पश्चात् ', ' प्रभ्रंशयां यो नहुषं चकार ' असा प्रयोग तुरळकच. तोही कालिदासासारख्या असामीचा, म्हणून त्याची चर्चा तरी करतात; पण शेवटी प्रामादिकच ठरवितात. [ बालमनोरमा, ' कृञ्चानुप्रयुज्यते लिटि ' या सूत्रावरील. ] याचप्रमाणे ज्यांना संस्कृतात ' च्वि-रूपे ' म्हणतात, त्या ' प्रमाणीकृ, पयोधरीभू ' इत्यादी धातूंपासून सिद्ध झालेल्या क्रियापदांनाही संयुक्त क्रियापदे म्हणण्यास अवसर आहे. [ आप/प्र १९ ] यांच्या घटकांमध्ये तर बाहेरचे पद आल्याचे तुरळकदेखील उदाहरण संस्कृत वाङ्मयात आढळत नाही.

पण मराठी व्याकरणात आले आहे, ते संयुक्त क्रियापद या संस्कृत संयुक्त क्रियापदाचा वारसा घेऊन आलेले नाही. ते इंग्रजी व्याकरणाच्या द्वारा लॅटिन व्याकरणातून आले आहे. अर्थात मराठीचे सर्व युरोपियन व्याकरणकार आणि इंग्रजीचा नमुना पुढे ठेवणारे बहुसंख्य महाराष्ट्रीय व्याकरणकार यांच्या ग्रंथांत ही कल्पना निर्विवाद गृहीत केलेली आढळते. मुळात ही कल्पना क्रियापदांचे अपूर्ण, पूर्ण, रीती, उद्देश – म्हणजे ' संयुक्त काळ ' (आणि ' संयुक्त अर्थ ') – निषेध/अकरण इत्यादी उपप्रकार सांगण्याच्या संदर्भात भेटते. या व्यतिरिक्त ती अघळपघळ स्वरूपात मांडली जाते, तेव्हा ' प्रीती करणे, युद्ध करणे. अंगात घालणे, तोंडी लावणे, अंग धुणे, गाशा गुंडाळणे, झोप घेणे, गप्पा मारणे ' इत्यादींचाही संयुक्त क्रियापदांत अंतर्भाव केला जातो. दादोबा, नवलकर, रा. भि. जोशी, खेर ही मंडळी या पक्षातली आहेत. अशा स्थळी संयुक्त क्रियापदे मानण्यातली उपपत्ती दादोबांनी अशी मांडली आहे की, ' कित्येक धातुसाधितांच्या योगाने अथवा इतर शब्दांच्या योगाने क्रियेचे अर्थच भिन्न होतात, अथवा ज्या क्रियेशी त्या धातुसाधितांचा अथवा शब्दांचा संबंध असतो, त्या पासून ती धातुसाधिते अथवा शब्द निराळे काढले तर अर्थच बसत नाही, अथवा कित्येक स्थळी अर्थात वैषम्यही येते.' [ दादो / ७ : २७१ ] म्हणून अशा स्थळी संबद्ध शब्दांचे संयुक्त क्रियापद मानावे. दादोबांनी पुढे म्हटले आहे : ' ह्या राजमार्ग उघडल्याने मला भरवसा आहे की पुष्कळ संशय आणि वादविवाद दूर होतील.'

दादोबांनी सरमिसळ रूपाने मांडलेल्या संयुक्त क्रियापदाचे म्हणजे Compound verbs - चे, Nominal compounds आणि Verbal compounds असे दोन गट नवलकरांनी केले आहेत. [ नव/२ : १४१ ] वर जी उदाहरणे उद्धृत केली, ती त्यांच्या पहिल्या Nominal या प्रकारात पडतात; यात पहिला शब्द नाम असतो, –विकृत ( 'अंगात घालणे' ) किंवा अविकृत ('मार खाणे' ). या प्रकारात दोन्ही शब्द मिळून एक

---

* मोरो केशव दामले जन्मशताब्दीनिमित्त महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने दि. २४-११-१९६८-ला आयोजित केलेल्या चर्चेसाठी लिहिलेला उपन्यास लेख

या लेखात योजिलेल्या संक्षेपांचे विवरण लेखाच्या शेवटी पाहा.

अनुक्रमणिका

साधी ( Simple idea) कल्पना व्यक्त करतात. जसे : 'प्रीती करणे ' म्हणजे ' to love '. या प्रकारात वापरले जातात, असे मुख्य १५ धातू नवलकरांनी दिले आहेत. दुसऱ्या Verbal या प्रकारात पहिला शब्द धातुसाधित असतो. जसे : ' खाऊन टाकणे '. यात ' खाऊन ' मधला धातू मुख्य ( Principal verb ); ' टाकणे '-मधला धातू गौण, सहायक ( Servile ) गौण धातू मुख्य धातूच्या अर्थाला विशेषित करतो. ' खाऊन टाकणे ' = खाण्याची क्रिया पूर्णतेपर्यंत करणे. या प्रकारात येणारे गौण धातू ठराविक आहेत. ते नवलकरांनी पुढील आठ गटांत विभागून दिले आहेत : ( नवलकरांच्या Compound Tenses - मध्ये येणारे ' असणे, होणे, नसणे, नाहीं ' तसेच ' पाहिजे ' आणि ' लागणे ' यांचे अकरणात्मक – Negative–' नको, नये, नलगे ' हे ' Auxiliary ' धातू पुढच्या ' Serviles '-च्या गटांत नाहीत. )

1. Potentials : शकणे, येणे, पावणे. ( करू शकतो.)
2. Passives : जाणे. ( मारिला जातो. )
3. Intensives : घेणे, चुकणे, जाणे, टाकणे, ठेवणे, देणे, वसणे, राहणे, सोडणे. ( आपण स्नान करून घ्यावे. )
4. Continuatives and Frequentatives : जाणे, वसणे, राहणे. ( औषध घेत जा. )
5. Desideratives : पाहणे. ( वोलू पाहतो. )
6. Inceptives : लागणे, होणे. ( चालू लागला, चालते व्हा. )
7. Permissives : देणे. ( मला जाऊ द्या. )
8. Obligationals : पडणे, पाहिजे, लागणे, असणे. ( खेपा घालायास पडतात. )

या आठ गटांना अनुक्रमे ' शक्यार्थवोधक/शक्त्यर्थक, कर्मकर्तरी, प्रकर्षदर्शक, सातत्यदर्शक - पौनरुक्ति (कृत्य ? ) - वाचक, इच्छादर्शक, उपक्रमदर्शक, आज्ञार्थक, कर्तव्य-वोधक ' अशी मराठी नावे खेरांनी दिली आहेत. [खेर/२: १९७ ] जोशांनी यात काळाचे पोटभेद अंतर्भूत करून आणखी प्रकारांची भर घातली आहे. [ जोशी/४:३८१ ] नवलकरांच्या पुस्तकात नाहीत, अशी ' वरे करणे, गोड लागणे, नीट वसणे, ठार करणे ' इत्यादी ' विशेषण + धातू ' या स्वरूपाचीही संयुक्त क्रियापदे जोशांनी सांगितली आहेत. [ जोशी/४ : ३७९ ]

६

हा संयुक्त क्रियापदाच्या विचारातला विस्तारवादी अथवा ' राजमार्ग '-वादी वैयाकरणांचा पक्ष सांगितला. दुसरा संक्षेपवादी पक्ष. त्याला Nominal Compounds मान्य नाहीत. त्याच्या मते ' धातूच्या काही नियमित रूपांशी काही नियमित क्रियापदांचा योग होऊन जी क्रियापदे वनतात ' [ रागोड ११९ ], तीच तेवढी ' संयुक्त क्रियापदे '. या पक्षात कृष्णशास्त्री चिपळूणकर, दोघे गोडवोले ( कृष्णशास्त्री, रावजीशास्त्री ), आगरकर, गुंजी-कर, दामले, मोने, मोडक, सवनीस हे वैयाकरण येतात. ( यांच्यामध्येही अंतर्गत मतभेद आहेत. ) रावजीशास्त्री गोडवोल्यांनी सहाय धातूंचे चार गट केले आहेत, त्यांत नवलकरांचे Compound Tenses आणि Verbal Compounds एकत्र केले आहेत :

१. कालांतरवोधक : अस.
२. प्रयोगांतरवोधक : जा, हो ( = वनणे ).
३. निषेधार्थक : नस, नको, नये.
४. विशेषार्थक : आण, इच्छ, काढ, घे,......

[ रागोड १२१ ]

नवलकरांचा ' Passive ' जा-धातू आणि ' वसता झाला ' अशा प्रयोगांतला हो-धातू मिळून गोडवोल्यांचा दुसरा गट झाला आहे. नवलकरांच्या Verbal Compounds-मधल्या गौण धातूंचे वाकीचे गट गोडवोल्यांच्या ' विशेषार्थकां ' मध्ये समाविष्ट आहेत.

नेमका हाच गट चिपळूणकर आणि गुंजीकर यांना प्रायः, आणि मोडकांना सर्वस्वी अमान्य आहे. यांना अतिसंक्षेपवादी म्हणता येईल. चिपळूणकरांनी ' संयुक्त-काळ ' ( आणि संयुक्त ' अर्थ ' ) यांची रूपे सांगितली आहेत [ चिप/३:१७६ ]; त्यांत विध्यर्थाच्या रूपांत मात्र ' लाग '-धातू आला आहे. [ चिप/३:१८४ ] गुंजी-करांनी ' सुवोध व्याकरणा 'त ' वहुतेक आख्यात रूपांपुढे असधातूची रूपे लागून संयुक्त क्रियापदे होतात, ' [ गुंजी ४०६ ] अशी माहिती दिली आहे; पण पुढे एका ठिकाणी ' चालू लागला ' अशा प्रयोगांना गौण पर्याय म्हणून ' संयुक्त क्रियापद ' म्हटले आहे. [ गुंजी ४११ ] मोडक मात्र ' रूप ( करण-, अकरण- ), अर्थ ( आज्ञा, विधी...) काळ, पुरुष, लिंग, वचन, प्रयोग ' हे जे क्रियापदाचे सप्तविध धर्म [ मोड २४३ ], त्यांचे प्रकटीकरण करणाऱ्या ' अस, नस, जा, नको, नये ' या पाचच

धातूंना सहाय धातू, आणि ' एतद्‌घटित शब्दयोगां 'ना संयुक्त क्रियापदे मानतात [ मोड २१८ ].

राजवाडे, आपटे, मंगरूळकर हे अभाववादी. राजवाडे म्हणतात: 'संयुक्त क्रियापदे ही बाब मराठी वयाकरणांनी...इंग्रजीतून आणिली ' आहे; ती ' अत्यन्त अशास्त्र आहे. ' [ राज/ति २६ ] असे ( राजवाड्यांना ' श्री ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण ' लिहिताना वाटत नव्हते. यात त्यांनी संयुक्त क्रियापदे चांगली नऊ पृष्ठे भरतील [ ११०–११९ ] इतकी दिली आहेत. ) संयुक्त क्रियापदामागची विचारसरणी पुढे चाल-विल्यास 'संपूर्ण वाक्य मिळून एक संयुक्त क्रियापदच बनेल.' [ आप / प्र २५ ]

या सर्व मतांचा आलेख असा :

| संयुक्त क्रियापद: क्षेत्र | पक्ष | | | |
|---|---|---|---|---|
| | विस्तार | संक्षेप | अतिसंक्षेप | अभाव |
| १. नामघटित | ✓ | × | × | × |
| २. विशेषणघटित | ✓ | × | × | × |
| ३. धातुसाधितघटित : | | ✓ | × | × |
| ( क ) विशेपार्थकघटित | ✓ | ✓ | ✓ | × |
| ( ख ) सामान्यार्थकघटित | ✓ | | | |
| | दादोबा | गोडबोले (दोघे) | चिपळूणकर | राजवाडे |
| | नवलकर | आगरकर | गुंजीकर | आपटे |
| वैयाकरण→ | जोशी, खेर | दामले, मोने | मोडक | मंगरूळकर |
| | | सवनीस | | |

सहाय धातूंचे वर्ग आणि त्यांच्या संज्ञा यांच्या बाबतीत दामले आणि सवनीस यांनी काही फरक केले आहेत. ते या ठिकाणी नमूद न करण्याने काही अनिष्ट होणार नाही, म्हणून उपेक्षिले आहेत.

### विविध पक्षांच्या उपपत्ती

संयुक्त क्रियापदाच्या बाबतीतले हे नुसते पक्ष झाले. या पक्षांची तात्त्विक भूमिका, हा पुढचा प्रश्न. दादोबांचे वक्तव्य आरंभी उद्‌धृत केले आहे. त्यावरून कळते की, संयुक्त क्रियापदाच्या घटकांच्या असंयुक्त अवस्थेत असणाऱ्या अर्थांची बेरीज केल्याने निष्पन्न होणारा अर्थ ( हा अनेकदा विसंगतही असतो ) वेगळा असतो, त्यांचा संयुक्त अवस्थेत एकत्र कळणारा अर्थ वेगळा असतो. हा नवा अर्थ पुष्कळदा ' लाक्षणिक ' असतो, असे सांगताना दादोबा म्हणतात : ' संस्कृतादी भाषांत उपसर्गाच्या योगाने धातूंचे अर्थ अनेक प्रकारे फिरतात,... तसे महाराष्ट्र भाषेत धातुसाधितां पुढे वर सांगितलेली सहाय व इतर क्रियापदे लाविली असता मूळचा अर्थ बदलून भिन्न भिन्न अर्थ, व पुष्कळ ठिकाणी लाक्षणिक अर्थ निष्पन्न होतात. ' [ दादो / पू ७० ] जोशांनी या अर्थाचे लाक्षणिकत्व स्पष्ट करताना म्हटले आहे : ' हरी गप्पा-मारितो,– या वाक्यात मारितो याचा मूळ अर्थ नाहीसा झाला असून, त्याच्या साह्याला गप्पा हा शब्द घेतल्यावाचून त्याला अर्थ येत नाही. ' [ जोशी/४:३७९–८० ]

हा अर्थांतराचा मुद्दा आधाराला घेत असूनही [ सव १३० ] सवनीस नामघटित ( आणि अर्थात विशेषण-घटित ) संयुक्त क्रियापदे अमान्य करण्याचे कारण असे देतात की, ' त्यांत ... सविभक्तिक शब्द येतात. अर्थात

तीं स्वतंत्र पदे आहेत.' [ सव १३१ ] सवनिसांच्या मते 'वसत-आहे' हे त्यांना मान्य असलेले संयुक्त क्रियापद एकच पद आहे; त्यातले 'वसत' हे कृदन्त आणि 'आहे' हे 'कालविकारदर्शक' 'साह्यक्रियापद' [ सव ९४ ] हे केवळ 'शब्द' ( = अर्थनिरपेक्ष आवाज [ सव ५७ ] ) आहेत. ( सवनिसांची सर्वच परिभाषा इतर वैयाकरणांच्यापेक्षा वेगळी आहे. ) दामल्यांच्या मते नामघटित ( आणि अर्थात विशेपणघटित ) संयुक्त क्रियापदे ही 'साहेब लोकांकरिता इंग्रजीत लिहिलेल्या मराठी व्याकरणामध्ये'च येतात; आणि ती केवळ 'साहेबांचे दृष्टीने... सोईची' असतात. या प्रयोजनाच्या अभावी ती मानण्याचे कारण नाही. इंग्रजीतही 'examine' या एकेरी स्वतंत्र धातूच्या अर्थाने येणाऱ्या 'to make an examination of' या शब्दसमुच्चयाला कोणी संयुक्त क्रियापद म्हणत नाही. [ दाम/१ : ७४७ ] ( पण 'कथा श्रवण केली' इत्यादी प्रयोगात दामलेही निरुपाय म्हणून संयुक्त क्रियापदच मानितात. [दाम/१:७५०] ) त्यांना जी संयुक्त क्रियापदे मान्य आहेत, त्यांचे समर्थन त्यांनी असे केले आहे की, त्यातला सहाय धातू दुसऱ्या धातूला गौण ठरतो. असे नसेल तेथे संयुक्त क्रियापद मानू नये. जसे : 'त्याने हे सबंध पुस्तक लिहून काढिले,' आणि 'त्याने हे आंबे झाडावर चढून काढिले.' यांपैकी पहिल्या वाक्यात 'लिह' धातू मुख्य; 'काढ' गौण. दुसऱ्यात 'चढ' गौण; 'काढ' मुख्य. 'चढून काढिले' हे संयुक्त क्रियापद नाही; कारण 'चढ' अकर्मक असल्यामुळे 'आंबे' हे त्याचे कर्मच होऊ शकणार नाही. [ दाम / १ : ७०१ ] आगरकरांचा युक्तिवाद असा आहे की, 'नामे, विशेषणे, क्रियाविशेषणे इत्यादिकांचे अर्थ ज्याप्रमाणे कधी कधी एकाच शब्दाने स्पष्ट होत नसल्यामुळे... नामार्थक, विशेषणार्थक, आणि क्रियाविशेषणार्थक वाक्यांश किंवा वाक्ये यांचा उपयोग करावा लागतो, त्याप्रमाणे मिश्र किंवा संयुक्त क्रियार्थ दाखविण्यासाठी एकाहून अधिक शब्द योजण्याची मोकळीक का नसावी? व अशाप्रकारे योजलेल्या शब्दसमूहांस संयुक्त क्रियापदे किंवा क्रियापदार्थक वाक्यांश म्हणण्यास प्रत्यवाय का असावा?' [ आग, १:२९–३० ]

अतिसंक्षेपवादी मोडकांचे स्वमतसमर्थन वर आले आहे. क्रियापदाचे ठराविक धर्म दाखवील, तेच सहाय क्रियापद; त्याने घटित असेल तेच संयुक्त क्रियापद. इंग्रजी व्याकरणातही 'Tense Auxiliary, Mood Auxiliary, Voice Auxiliary' असे तीनच सहाय धातूचे प्रकार मानितात; 'Sense Auxiliary' म्हणून प्रकार मानीत नाहीत. [ मोड २२१ ] परपक्षखंडन करताना त्यांनी असा मुद्दा मांडिला आहे की, 'लाक्षणिक अर्थाच्या प्रवेशाने शब्दाचे व्याकरणमूल्य बदलत नाही.' [ मोड २१५ ] 'लक्षणामूलक अर्थाची छाननी करणे हे अलंकारशास्त्राचे, तर रूपरचनादिकांचे परीक्षण करणे हे व्याकरणशास्त्राचे, क्षेत्र होय.'...... 'हा बेरड चारदा तुरुंगात जाऊन आला आहे, तो कारधिकारी नुकताच तुरुंगात जाऊन आला, या ठिकाणी व्यवहारदृष्टया बेरडाचे व काराधिकाऱ्याचे तुरुंगात जाणे या शब्दप्रयोगात अर्थभेद असला तरी, व्याकरणास तो भेद केवळ अज्ञातच होय.' [ मोड २१४–१५ [ 'दोन शब्दांनी एकच क्रिया दर्शित' होणे या कारणासाठी 'जावयाचे आहे' हे संयुक्त क्रियापद मानिल्यास 'हत्तींचा कळप, शाळेची इमारत......इत्यादी पदयोगही संयुक्त नामे मानावी लागतील.' [ मोड २४२ ]

अभाववादी राजवाडे म्हणतात : 'तो जात आहे, ती जाती आहे, ते जाते आहेत, ह्या वाक्यांतील जात, जाती, जाते, जात्या, जाती ह्या धातुरूपांची जर लिंगवचने स्पष्ट व्याकरता येतात, तर जाते आहेत, जाती आहे, जात आहे ह्यांना संयुक्त क्रियापद म्हणणे अत्यन्त अशास्त्र नव्हे काय? व्याकरण म्हणजे बोलून चालून फोड. या फोडीचे शास्त्र, फोड होणे शक्य नाही तेथपर्यंत न्यावयाचे असते. जेथे अन्वय लागत नाही, जेथे लिंगवचनविभक्ती कळत नाही, तेथे व्याकरणशास्त्र इतर शास्त्रांप्रमाणे थांबते. ज्यापलीकडे लिंगवचनविभक्ती कळत नाही, त्या रूपाला सवंदी रूप समजण्याची पद्धति आहे.' [ राज ति २७ ] राजवाड्यांच्या मते 'क्षालयांचकार' हे संस्कृतातले 'सवंद रूप' आहे. संस्कृत वैयाकरण 'क्षालयाम्' हे 'सुबन्त' [ पाहा : बालमनोरमा, 'आमः' या सूत्रावरील ], आणि 'प्रमाणी (+कृ), पयोधरी (+भु)' ही अव्यये मानितात. आपट्यांचा आक्षेप असा आहे की, 'मागली कृदन्ते व पुढील क्रियापदे मिळून जर संयुक्त क्रियापदे होतात, असे' संयुक्त क्रियापदवाद्यांना 'वाटते, तर ते ती क्रियापदे मागल्या कृदन्तांस जोडून का लिहीत नाहीत?,

[ आप / प्र २१ ] आपट्यांनी असे म्हणताच मोन्यांसारख्या संयुक्त-क्रियापदवाद्यांनी 'स्वतंत्र लेखनात' क्रियापदे कृदन्तांना ( समासवत ) लहानशा रेघेने जोडून लिहावयास, आणि तसे केले पाहिजे म्हणून सांगावयासही सुरवात केली. [ मोने / सं ६२ ] ( जसे : 'करून-घेता-येतो, लिहिला-पाहिजे, वाटत-नाही.' ) त्यामुळे, सामासिक शब्द मराठीत पृथकही लिहिण्याची रूढी असल्यामुळे ( जसे : 'विष्णुशास्त्री चिपळूणकर सभागृह, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणे विद्यापीठ, महाराष्ट्र शासन, मराठी साहित्य महामंडळ, संयुक्त महाराष्ट्र समिती' ), आणि खरे म्हणजे लेखनविचार व्याकरणात अप्रस्तुत असल्यामुळे आपट्यांच्या या आक्षेपातली ( असली तर ) हवा गेली. आपट्यांचा दुसरा आक्षेप मात्र अद्याप अनुत्तरित आहे : 'क्रियापद मागे येऊन जोड जेव्हा पुढे येतो तेव्हा, व तशा स्थितीत त्या दोहोंच्यामध्ये आणखी निराळी पदे येतात तेव्हा, संगती कशी लावावी हे कोणीच सांगितलेले नाही.' [ आप/प्र २५ ] याची उदाहरणे : 'खेळत राहिला, राहिला खेळत, राहिलाच खेळत, खेळतच राहिला, राहिला असाच रोज खेळत, राहिला असाच रोज चार तास खेळत.' [ आप/प्र २१ ] संयुक्त-क्रियापदवाले संयुक्त क्रियापदात गुंतलेल्या धातूंच्या बाबतीत गौणमुख्यविपर्यास करतात, असाही आपट्यांचा आक्षेप आहे. [ आप/प्र २२ ] राजवाडे, आपटे यांच्याप्रमाणे मंगरूळकरही अभाववादी आहेत [ मंग १५७ ]; त्यांचा मुद्दा वर मोडकांच्या वक्तव्यात येऊन गेला आहे.

## मूलभूत प्रश्न

येथपर्यंत दिग्दर्शन केले, त्या वादात व्याकरणातले काही मूलभूत प्रश्न गुंतले आहेत :

१. व्याकरणात लाक्षणिक अर्थाचा विचार प्रस्तुत आहे की नाही ? अर्थाभेद हे पदाभेदाचे प्रमाण आहे काय ?

२. पदांचे संयोग होतात काय ? पद म्हणजे काय, आणि संयोग म्हणजे काय ? 'संयुक्त क्रियापद' या संज्ञेचा अर्थ काय ?

३. संयुक्त क्रियापद मानावयाचे असल्यास त्याची घटना केवलपद, समास, वाक्यांश ( phrase ) आणि अंशवाक्य ( clause ) यांपैकी कोणासारखी मानणार ?

४. संयुक्त क्रियापद मानावयाचे नसल्यास अशा स्थळी येणाऱ्या पदांचा समन्वय कसा करावयाचा ? 'जावे लागते, जावयाचे आहे, चालू इच्छितो, जात असेल, केले जाते' इत्यादी स्थळी 'जावे, जावयाचे, चालू' ही नामे, 'जात, केले' ही विशेषणे, – अशा रीतीने सर्व प्रयोगांची उपपत्ती लागेल का ? 'कथा श्रवण केली' असे प्रयोग आणखी आहेतच. त्यांना कृष्णशास्त्री गोडबोल्यांप्रमाणे 'अशुद्ध' [ कृगोड / ३ : २४० ], किंवा गुंजीकरांप्रमाणे 'शिथिल' [गुंजी ४१४] म्हणून निकालात काढण्याचे दिवस आता राहिलेले नाहीत. 'श्रवण' हे विशेषण मानण्याचा पर्याय आहे; पण 'श्रवणा'चे विशेषणत्व असल्याच प्रयोगांपुरते मर्यादित राहिल्यास हे उत्तर पळवाट ठरण्याचा संभव राहतो.

## संयुक्त क्रियापद आणि 'प्रयोग'

संयुक्त क्रियापद मानणारे वैयाकरण 'संयुक्त काळ' मानावे की नाही, मानल्यास किती मानावे, त्यांना नावे काय द्यावी, 'संयुक्त काळ' संयुक्त क्रियापदांमध्ये गणावे की नाही [ केळ/४ : १५८ ], इत्यादी काही प्रश्नांची चर्चा करीत असतात. हे प्रश्न वर उपस्थित केलेल्या प्रश्नांच्या तुलनेने गौण, प्रायः तपशिलाच्या स्वरूपाचे, अंशतः गतार्थ आणि म्हणून प्रस्तुत चर्चेत उपेक्षणीय आहेत. मात्र संयुक्त-क्रियापदविचाराच्या अनुषंगाने येणारा दुसरा एक प्रश्न आहे, तो उपेक्षणीय नाही. संयुक्त क्रियापदाच्या विचाराचा एक पाय प्रयोगविचारात गुंतलेला आहे. 'त्याचे पत्र लिहून झाले'. यात संयुक्त क्रियापद मानले, तर कर्ता 'त्याचे', कर्म 'पत्र', मुख्य धातू 'लिह', प्रयोग 'समापनकर्मणी'. [ दाम/१ : ७७० ] संयुक्त क्रियापद न मानिल्यास कर्ता 'पत्र', क्रियापद 'झाले', प्रयोग अकर्मक कर्तरी' – असे होईल. 'तुम्ही काम केले पाहिजे' हा प्रयोग पहिल्या पक्षी कर्मणी, तर दुसऱ्या पक्षी अकर्मक कर्तरी. काहीजण तर यात 'केले' हाच कर्ता समजतात. [ फड/३ : १७१ –'भवत्कर्तृक काम संबंधि करणे पाहिजे.'] संयुक्त क्रियापद मानीत असूनही काही लोक 'उंदराकडून जाळे कुरतडले गेले' याला 'कर्तरिप्रयोग' म्हणणेच पसंत करितात. [ केळ ४:१६३ ] व्युत्पत्तिभक्त ( राजवाडे म्हणाले असते, 'वैयुत्पत्तिक' ) राजवाड्यांचा मार्ग आणखी वेगळा. त्यांच्या मते 'त्याचे पत्र लिहून झाले = त्याचे पत्र-लिहून झाले = तस्य पत्रलेखनं संवृत्तं';

अर्थात यात कर्ता 'लिहून', प्रयोग अकर्मक कर्तरीच. 'मला काम करता येते = मया कर्म क्रियमाणं ज्ञायते/ ईयते.' (प्रयोग कर्मणी.) [राज/ति २५]. 'त्याला वाचू दे' [दाम/१ : ७२२] यासारख्या 'दे'-घटित प्रयोगात 'दे'-चा वेगळा कर्ता वसता करण्या-न-करण्याचा नवाच प्रश्न उपस्थित होतो. अशी अनेक उदाहरणे उद्धृत करता येतील. प्रत्यक्ष उदाहरणाच्या विवेचनात काही वैयाकरण धरसोडही करितात. दादोबा 'तो बोलू लागला, चालायास लागेल' [दादो/७ : २५०], 'मला चालवायाचे होते' [दादो/७ : २१८] या उदाहरणांत संयुक्त क्रियापद (किंवा 'संयुक्त काळ') मानतात; तर 'मला जावे लागेल, मला जायाचे आहे' [दादो/७ : १९४–९५] यांत 'जावे, जायाचे' ही 'विधिवाचक धातुसाधित नामे मानून ती कर्तृपदे मानावी', प्रयोग 'भावकर्तरि' समजावा, असे सांगतात. असे होते, तेथे मूळ तत्त्वाच्या बाबतीतच वैयाकरणाच्या मनात गोंधळ असण्याचा संभव असतो; तो प्रत्यक्ष उदाहरणाच्या परामर्शात उघडकीला येतो. या दृष्टीने पुढे दिलेली नमुन्याची उदाहरणे विचारार्ह आहेत :

मला जावे लागेल. त्याला ते काम करावे लागले. मला जायाचे आहे. त्यास ते काम करायाचे आहे. माझे काम होणार नाही. माझे काम नाही होणार. मला तेथे जाता येते. मला ग्रंथ लिहिता येतो. माझ्याने काम करवत नाही. तुम्ही काम केले पाहिजे. त्याने मला जाऊ दिले. दिले त्याने मला जाऊ. मुलांनी विद्येकडे चित्त देत जावे. (त्याने पैसा संपादन केला. त्याने श्लोक पाठ म्हटले.) शिपायाकडून चोर धरिला जातो. (मी त्यास लिहावयास शिकविले. आई मुलांस जेवू घालते.) मला मळमळून आले आहे. अर्जुन बोलता झाला. मी जाऊ शकतो.

## संक्षेपांचे विवरण (वर्णानुक्रमाने)

संक्षेपांनंतर लेखात नमूद केलेले आकडे = पृष्ठांक.

आग/१ : गोपाळ गणेश आगरकर—
'वाक्यमीमांसा'
पहिली आवृत्ती (१८८८)

आप/प्र : नारायण विठ्ठल आपटे—
'व्याकरणप्रबोध'

कृगोड/३ : कृष्णशास्त्री गोडबोले—
'मराठी भाषेचे नवीन व्याकरण'
तिसरी आवृत्ती (१८९५)

केळ/४ : गणेश हरी केळकर—
'मराठी व्याकरणाची मूलतत्त्वे'
चौथी आवृत्ती (१९६६)

खेर/२ : अप्पाजी काशिनाथ खेर—
'A Higher Marathi Grammar'
दुसरी आवृत्ती (१८९९)

गुंजी : 'रामचंद्र भिकाजी गुंजीकर
यांचे संकलित लेख (प्रथम खंड)'

चिप/३ : कृष्णशास्त्री चिपळूणकर—
'मराठी व्याकरणावर निबंध'
तिसरी आवृत्ती (१९२३)

जोशी/४ : रामचंद्र भिकाजी जोशी—
'प्रौढबोध मराठी व्याकरण'
चौथी आवृत्ती (१९११)

दादो/७ : दादोबा पांडुरंग तर्खडकर—
'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण'
सातवी आवृत्ती (१८७९)

दादो/पु : दादोबा पांडुरंग तर्खडकर—
'मोठ्या महाराष्ट्र व्याकरणाच्या
सातव्या आवृत्तीची पुरवणी'

दाम/१ : मोरो केशव दामले—
'शास्त्रीय मराठी व्याकरण'
पहिली आवृत्ती (१९११)

नव/२ : गणपतराव र. नवलकर—
'The Student's Marathi Grammar'
दुसरी आवृत्ती (१८८०)

फड/३ : गंगाधरशास्त्री फडके—
'महाराष्ट्र भाषेचे व्याकरण'
तिसरी आवृत्ती (१८५१)

मंग : अरविंद मंगरूळकर—
'मराठीच्या व्याकरणाचा पुनर्विचार'

मोड : गोविंद कृष्ण मोडक—
'मराठीचे अंतरंगदर्शन'

मोने/सं : मोरेश्वर सखाराम मोने—
'मराठीतील संयुक्त क्रियापदे'
'मराठी भाषेचे व्याकरणकार ..' : पृ. ४९–६०)

रागोड : रावजीशास्त्री गोडबोले—
'मराठी भाषेचे मध्यम व्याकरण'

राज/ति : विश्वनाथ काशीनाथ राजवाडे—
'तिङन्तविचार'
(राजवाडे-लेखसंग्रह, भाग २)

सब : महादेव पांडुरंग सबनीस—
'आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण'

• • •



# इतिहासप्रसिद्ध हमुराबी हाच महाभारतातील नहुष

● अ. ज. करंदीकर ●

## महाभारताचा काळ

महाभारताच्या काळासंबंधी चर्चा करताना इतिहासाचार्य टॉयन्बी यांनी पुढील महत्त्वाचे विधान केले आहे.

'The frequent ' actes de presence ' that are made in the Sanskrit epic by Indra and other members of the Vedic Pantheon are sufficient proof that some part at least, of the heroic element of the Mahabharata is a genuine legacy from the Voelkerwanderung of the Aryas in the second millennium B. C. ; and we have corroborative evidence to the same effect in strata of Indic literature which are unquestionably of an early date. For Narashamsi songs ( Klea andron ) are mentioned in the Vedas, and there are allusions to heroic minstrelsy in the Shatapatha Brahman. These poets would appear to establish, beyond doubt, the original Aryan epos, which was inspired by the Aryan voelkerwanderung, and also of the survival of at least some reminiscence of this ancient epic tradition in the Sanskrit Epic as we have it.'

महाभारतातील आख्यानभागात इंद्रादी देवतांचा जो निकटचा संबंध आढळून येतो, त्यावरून असे निश्चितपणे कळून येते की, या वीरगाथेतील काही भागांत तरी आर्यांच्या वंशभ्रमणातील प्रामाणिक स्मृती ग्रथित केलेल्या आहेत. श्रुतीमधील नाराशंसी गाथांवरून आणि शतपथातील अश्वमेधवर्णनात येणाऱ्या परिप्लव प्रकरणावरून वरील अनुमानाला दुजोरा मिळतो. तेव्हा ख्रि. पू. दुसऱ्या सहस्रकातील आर्यांच्या वंशभ्रमणाने महाभारताच्या रचनेला प्रेरणा मिळाली आणि त्या रचनेचा काही भाग तरी प्रचलित प्रतीत अस्तित्वात आहे, याविषयी संशय नाही. असे यथातथ्य विवेचन केल्यानंतर त्यांनी विस्मयाने लिहिले आहे.

'Yet there is something extraordinary about this apparent persistence of a heroic literary tradition in an inchoate and fluid form, over a period of at least five hundred years, between the latest date that can be assigned to the historical events by which this poetry was inspired and the earliest date that can be assigned to the crystallization of the Sanskrit epic in its present shape.'

म्हणजे या काव्यातील घटना आणि त्यांना काव्यरूप मिळण्याचा काळ यात निदान पाचशे वर्षांचा तरी खंड पडलेला दिसतो. ही घटना इतिहासाच्या दृष्टीने अतिशय विस्मयजनक आहे. ही घटना इतकी विस्मयजनक असल्यानेच संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासकारांनी ठरविलेल्या महाभारतरचनेच्या काळावर विश्वास ठेवण्याचे काहीच कारण नाही. महाभारतातील नहुष राजाच्या आख्यानाची रचना तरी बाबिलोनचा प्राचीन सम्राट हमुराबी याच्या काळीच झाली असावी, असे ऐतिहासिक चिकित्सेने सिद्ध करता येते. मात्र ही रचना प्रथमपासून संस्कृतात झाली असेल, असे निश्चयाने सांगता येत नाही. भारतीय परंपरेप्रमाणे नहुष राजा हा अत्रिकुलीन असल्याने त्याचे आख्यान अत्रिकुलात प्रचलित असलेल्या सुशियानी भाषेतही प्रथम रचले असेल.

## इंद्राची पापे

कुरुकुळाच्या इतिहासात, त्या कुळातील एक पुरातन राजा नहुष हा इंद्र बनल्याची कथा आली आहे. वृत्रवधानंतर इंद्र मुळी लपूनच बसला. तो लपून बसल्यानंतर देवांनी आणि ऋषींनी नहुषाची इंद्रपदावर स्थापना केली. हा नहुष प्रथम न्यायाने वर्तन करीत असताना कालांतराने

अनुक्रमणिका

त्याला इंद्रपदाचा मद चढून तो इंद्रपत्नी शचीचा अभिलाष करू लागला. तेव्हा बृहस्पतीच्या सांगण्यावरून शचीने त्याला सुचविले की, सप्तर्षींना आपले शिविकावाहक बनवून तू मला भेटावयाला ये, म्हणजे मी तुझे स्वागत करीन, याप्रमाणे सप्तर्षींना शिविकावाहक बनवून येताना त्याला घाई झाल्यामुळे त्याने अगस्त्यांना ' सर्प, सर्प, ' म्हणजे लौकर चाल म्हणून लाथ मारली. तेव्हा अगस्त्यांच्या शापामुळे नहुषाचे सर्पात परिवर्तन झाले. नहुषाची इंद्रपदावर स्थापना होण्यापूर्वी इंद्राने वृत्रवधाचे एकच पाप केले नसून इतरही अनेक पापे केली होती. ' विश्वरूपं त्वाष्ट्रं अभ्यमंस्त, वृत्रं अस्तृत, यतीन् सालावृकेभ्यः प्रादात्, अरुर्मघान् अवधीत्, बृहस्पतेः प्रत्यवधीत्। ' ( ऐ. ब्रा. ७–५–२ ) या पापांपैकी ज्या अरुर्मघांच्या वधाचेही पाप इंद्राला लागले होते, ते अरुर्मघ कोण याचा येथे थोडा विचार केला पाहिजे.

## अरुर्मघ कोण ?

प्राचीन काळी स्वसमाजातील देवांचा गुणगौरव करताना त्यांनी शत्रुपक्षातील देवांचा अथवा त्यांच्या भक्तांचा वध केल्याचे वर्णन करण्याची वहिवाट होती. या दृष्टीने विचार केला असता अरुर्मघ हे बाबिलोनची जगन्माता जी अरुरु तिचे उपासक असावेत, असे वाटते. या देवतेचा पती मर्दूक देव मानला जातो. हा मर्दूक म्हणजे गुरुग्रहच असे बाबिलोनच्या इतिहासकारांनी सांगितले आहे. तेव्हा अरुर्मघांच्या वधासहच बृहस्पतीचा उपमर्द केल्याच्या पापाचाही इंद्र धनी होतो. ' अयं कनीनः ऋतुपाः अवेदि अमिमीत अररुं यः चतुष्पात् । ' ( १०–९९–१० ) या ऋग्वेदातील वचनात इंद्राने चतुष्पाद अररूचा काटा काढल्याचा उल्लेख आला आहे. तैत्तिरीय संहितेच्या आरंभीच्या पानातच ' अपहतो अररुः पृथिव्या अदेवयजनो ' असा अररूचा उल्लेख येतो. असो. याप्रमाणे बाबिलोन नगरीतील दैवताच्या भक्तांचा इंद्राने म्हणजेच इंद्रभक्तांनी वध केला होता, अथवा उपमर्द केला होता. त्या नगरीतील अतिनामांकित हमुराबी राजा स्वतःला नहुष हीही पदवी लावीत होता. ' बेरीड एंपायर्स ' या ग्रंथाचे कर्ते पॅट्रिक कार्लटन यांनी त्या राजाच्या वर्णनात लिहिले आहे.

'The king's method of signalizing his lordship over the south was typical of him. In his thirty third year he dug a superb canal with the Semetic name Hammurabi--nuhusha- nishi–Hammurabi-is–the–prosperity-of the folk.

या अवतरणावरून हमुराबी हा स्वतःला नुहुषनिशी म्हणवीत होता आणि आपल्या प्रजेला पाणी पुरवून तिचा इंद्र बनला होता, हे उघड आहे. या हमुराबीच्या अनेक नावांमध्ये त्याला अमरपाल असेही एक नाव असल्याचा उल्लेख रागोझिन यांनी त्यांच्या खाल्डिया या ग्रंथात केला आहे. ( पान २२६ ) हमुराबी आणि इंद्र बनलेला नहुष यांचे समीकरण सिद्ध करण्याला आणखीही एक आधार आहे. नहुष इंद्र बनल्यानंतर इंद्राने एका कमलात आश्रय घेतला होता. ' सरसस्तस्यमध्ये तु पद्मिनी महती शुभा। गौरेणोन्नतनालेन पद्मेन महतावृता ॥ पद्मस्य भित्वा नालंच विवेश सहिता तथा। बिसतन्तु प्रविष्टंच तत्रापश्यत् शतक्रतुम् ॥ ' या उद्योगपर्वातील नहुषाख्यानातल्या अवतरणावरून असे कळून येते की, तेव्हा एका सरोवरातील कमलाच्या बिसतन्तूत इंद्र लपून बसला होता. हमुराबीच्या नावाचा कमल असा अर्थ होत असल्याने इंद्राने एका कमलात आश्रय घेतला आहे, असे सांगणे म्हणजे श्लेषाने हमुराबीच्या देहातच इंद्राने आश्रय घेतला आहे, असे सांगणेच होय. या कथेचा ज्योतिषविषयक अर्थ इथेच सांगणे सोयीचे होईल. नहुष शब्दाचा अर्थ संस्कृत आणि हिब्रू भाषेत सर्प असाही होतो. त्यामुळे महाभारताच्या ज्योतिषी कर्त्यांनी, सर्पाचे निवासस्थान असे आश्लेषा नक्षत्र दक्षिणायनाच्या प्रारंभस्थानी आलेले पाहून कल्पना केली की, आता अहिच इंद्र झाला असून खरा इंद्र अहीपलीकडील पुष्य नक्षत्रातील कमलात लपून बसला आहे. वसंतसंपात जेव्हा कृत्तिका नक्षत्राच्या पहिल्या चरणात येतो, तेव्हा दक्षिणायनाचे प्रारंभस्थान आश्लेषा नक्षत्राच्या चौथ्या चरणात येते. वेदकाळाच्या अंतिम पर्वात अशीच परिस्थिती असल्याने विश्वामित्र, वामदेव, वसिष्ठप्रभृतींनी तेव्हा अभिनव संपातसूक्त ' पाहिली '. आपण नवीन इंद्र करीत असल्याचाही विश्वामित्रांनी आपल्या सूक्तांतून उल्लेख केला. ( नव्यं कृणोमि संन्यसे पुराजाम् ) हा काळ ख्रि. पू. २३०० वर्षांच्या आसपास येतो. केंब्रिज येथील प्राचीन इतिहासाच्या कर्त्यांनी हमुराबीचा काळ ख्रि. पू २१०० च्या सुमारास मानला आहे. पण अलीकडील इतिहासकारांनी तो ख्रि. पू. १८०० पर्यंत अलीकडे ओढला आहे. पण त्यांनी चालविलेल्या ओढाताणीचा गंभीरपणाने विचार करण्यात अर्थ नाही.

## अवर्षणाचे चक्र

या काळात इंद्राने खरोखरीच आपले तोंड लपविले होते, असे इतिहासकारांनीही लिहिले आहे. Myths of Babylonia and Assyria या ग्रंथाचे कर्ते डोनाल्ड मॅकेंझी यांनी लिहिले आहे. ' It is believed that the migrations of these period were primarily due to changing climatic conditions, a prolonged " Dry Cycle " having caused a shortage of herbage, with the result that the pastoral peoples were compelled to go farther and farther, afield in quest of fresh woods and pastures new. ' ( पान २४४ ) या काळी दीर्घकालीन अवर्षणामुळे पशुपालनावर उपजीविका करणाऱ्या समाजांनी कृषिजीवी समाजाच्या प्रदेशांवर आक्रमणे करण्याचा उपक्रम आरंभिला.

## अश्वारोही समाजांचें आक्रमण

या पशुपालांनी कृषिजीवी समाजांच्या प्रदेशांवर आक्रमणे आरंभिली, तेव्हा त्यांनी कृषिव्यवसायासहच अश्व हा पशूही आयत्त करून घेतला होता. नहुषाने इंद्राला पदच्युत करण्यापूर्वीच तो अश्वांचा स्वामी झाला होता. ' इंद्रो हरी युयुजे अश्विना रथम् ' अशासारख्या कवनांवरून कळून येते की, अश्विनीकुमार अजून आपला रासभ रथ सज्ज करीत असत, अशा वेळी इंद्र आपले अश्व सज्ज करू लागला होता आणि त्या अश्वांच्या प्रभावानेच तुहुपनिशीसारख्या अहींचा निःपात करू लागला होता. अथर्ववेदाच्या दहाव्या कांडातील सर्पविषविदूरीकरण-सूक्तात पैद्व अश्वाच्या साहाय्याने इंद्रभक्तांनी नशोनशी या सर्पाचा काटा काढल्याचा उल्लेख आला आहे. अथर्ववेदाचे खाल्डिया देशातील संस्कृतीशी किती निकटचे नाते आहे, ते टिळकांनी दाखविलेच आहे. तेव्हा त्या ग्रंथातील सर्पविषयक मंत्रांतून भेटणारा नशोनशी हा सर्प तेथील इष्टिकालेखांतून भेटणारा तुहपनिशी हाच असणे स्वाभाविक आहे. या नामामागील परंपरा लुप्त झाली असल्याने हा पाठ एकट्या पैप्पलाद संहितेतच आढळतो. इतरांनी त्याचे दशोनसी असे परिवर्तन केले आहे. ८ पैद्व प्रेहि प्रथमोऽनु त्वा वयमेवसि, अहीन्व्यस्यतात पथो येन स्मा वयमेमसि ॥६॥ इदं पैद्वो अजायत, इदमस्य परायणम्। इमान्यर्वतः पदाहिघ्न्यो वाजिनीवतः ॥७॥ पेद्वाच्या अश्वा, तू पुढे जा. आम्ही तुझ्या मागून येतो. आमच्या मार्गातून तूं अहींना दूर कर. पेद्वाचा अश्व जन्मला असून हा त्याचा मार्ग अहींना मारणाऱ्या अश्वपदाच्या या खुणा. इतिहासभूगोल अज्ञात असणाऱ्यांनी पेद्वाचा अश्व हा सूर्य मानला असला तरी त्याचा ऐतिहासिक अर्थ करण्याला त्यांचा विरोध असू नये. यदृच्छेने हाती आलेल्या अमेरिकेतील प्राच्यविद्याभ्यासकांच्या मुखपत्रांत (१९१५) प्रसिद्ध झालेल्या असुर्या देशाच्या शकावलीत अहि सुहीन अहि नरु सुहीन ( पान ३६१ ) या सारखी नावे आढळून येतात. बाबिलोनमध्ये राज्य करणाऱ्या कश्शु घराण्यांतील राजांच्या नामातूनही एखादा मर्दुकनादिन अहि आढळती. बायबलमध्येही अहिजाह हे नाव आले आहे. यावरून हे कळून येते की बाबिलोनी संस्कृतीच्या परिसरात अहि हे मानवनाम प्रचलित होते आणि त्यांच्याशी अश्वारोही आर्य लढत होते.

## इराण्यांचा अहि दहाक अथवा जोहाक

इराणी परंपरेत हमुराबीनहुषाला अहि दहाक अथवा जोहाक असे नाव दिले असून त्याच्याविषयी एक अद्भुत कथा सांगितली आहे. एकदा सैतानाने म्हणे याच्या आवडत्या अंतिकाचे ( Page : बाळमित्र ) रूप धारण करून राजाला विनंती केली की, आपल्या वदनचंद्राच्या दर्शनानेच माझे सारे हेतू सफळ होत असले तरी फार दिवसापासून आपल्या स्कंधांचे चुंबन घ्यावे अशी इच्छा माझ्या मनात दृढमूल झाली आहे, तेव्हा ती इच्छा सफळ करण्याचीं एकवार प्रभूंनी कृपा करावी. या अगदी साध्या दिसणाऱ्या विनंतीचे रहस्य राजाला समजून आले नाही. त्याने आपल्या अंतिकाला स्कंधांचे चुंबन घेण्याची संधी दिली. या चुंबनाच्या पाठोपाठ राजाच्या दोनही स्कंधांतून दोन महाभयंकर भुजंग उगवले. हा अकल्पित प्रकार पाहून राजाने ते तोडून टाकले. पण तत्काळ ते तसेच पुन्हा उगवले. या प्रकाराची अनेकदा आवृत्ती झाल्यानंतर राजा हताश होऊन बसला असता सैतानाने एका जांगुलिकाच्या वेषाने त्याची भेट घेतली आणि त्यांना तरुणांच्या मेंदूचा नित्य नैवेद्य दाखविण्याची सूचना केली आणि असे आश्वासन दिले की, या आहाराच्या प्रभावाने ते कालांतराने निजधामाला जातील. ही घटना घडल्यापासून हमुराबीनहुषाने अथवा अहि दहाक राजाने या सर्पांना नरबली समर्पण करण्याचा उपक्रम आरंभिला. या भीषण आख्यायिकेत काही तथ्य असेल, असे अर्वाचीन

वाचकांच्या ध्यानीमनीही यावयाचे नाही. पण ही वस्तुस्थितीच आहे. ग्रीक लोकात चंद्राच्या तीस तिथींपैकी दहा-दहा तिथींची एक अशा तीन चंद्रदेवता मानल्या जात असत. हिंदू समजुतीप्रमाणेही कृष्णपक्षातील पहिल्या पाच तिथी शुक्र पक्षातच मोडतात. उदाहरणार्थ, उपनयनाला कृष्णपक्ष वर्ज्य मानला असला तरी कृष्ण पंचमीपर्यंत मौंजीबंधन होऊ शकते. यावरून चांद्रमासाच्या तीन विभागांची कल्पना आपल्यातही असल्याचे सुव्यक्त होते. या तीन विभागांच्या तीन देवतांच्या रूपाने चंद्र हा द्यावापृथिवी; सागर आणि पाताल यांच्यावर अधिकार चालवीत असे. यांपैकी पातालाचा संबंध परलोकांशी आणि तदनुषंगाने अंतिम न्यायाशी येतो. चंद्राच्या कर्क राशीत पुष्य आणि आश्लेषा ही दोन नक्षत्रे असून यांपैकी पुष्य हे कश्यप या नात्याने पृथ्वीवर आणि समुद्रावर सत्ता चालविते. आश्लेषांची देवता अहि, या देवतेचा निवास भूगर्भात, पाताळात. या पाताल-निवासामुळे अहिदेवतेचा न्यायाशी संबंध येतो. ग्रीक पुराणांचे प्रसिद्ध अभ्यासक रॉबर्ट ग्रेव्हज अथवा फोन रांके यांनी लिहिले आहे.

'It seems that the moon goddesse's title Eurydice (wide justice) the serpent-grasping ruler of the underworld proclaimed her the ruler of Hades. Male human sacrifices were offered to her as Eurydice, their death being apparently caused by viper's venom.'

(ग्रीक मिथ्स खंड पान १२८) या अवतरणावरून कळून येते. की चंद्रवंशात न्यायदेवता ही सर्पधारी मानली जात असून तिच्या सर्पांना नरवली समर्पण करीत. या परंपरेवरूनच नहुष अथवा हमुराबी चंद्रवंशी कसा, तो सर्पांसह किमर्थ संचार करीत असे आणि त्या सर्पांना नरवली का समर्पण करीत असे, याची कल्पना येईल. 'जो राजा असता समस्त महिला, विश्रांति शेषाहिला.' या रघुनाथ पंडितांच्या वचनावरून भारतातही अहि आणि न्याय यांचा अविच्छेद्य संबंध असल्याचे कळून येते.

## भारतीय आणि इराणी परंपरांची तुलना

भारतीय परंपरेप्रमाणे वृत्रासुराच्या हत्येनंतर इंद्र भूमिगत झाला असता, देव आणि ऋषी या सर्वांनी नहुषाला आपले सामर्थ्य समर्पण करून त्याला इंद्र केला. याच्याउलट इराणी परंपरेप्रमाणे प्रथम पुण्यवान असलेला यमराजा, भगिनीगमन करण्याचे नाकारून जेव्हा भ्रष्ट झाला, तेव्हा त्याला पदच्युत करून अहि दहाक हा सम्राट झाला. या दोनही परंपरांचा अर्थ एकच आहे. जरथुश्त्री पंथाच्या उदयानंतर इराणी आणि भारतीय परंपरा जेव्हा विभिन्न झाल्या, तेव्हाच हमुराबीनहुष अथवा अहिदहाक राजाचा उदय झाला. इंद्र आणि यम हे दोघेही दक्षिणायनाच्या प्रारंभाचे द्योतक देव आहेत. इराणात जमशेदी नवरोज, अर्थात नववर्षारंभ जसा प्रसिद्ध आहे, तसाच एकेकाळी भारतात इंद्रध्वजाचा उत्सव सुप्रसिद्ध होता. हे दोनही मूळचे दक्षिणायनारंभाचे उत्सव असून आता ते वसंत ऋतूच्या प्रारंभी साजरे केले जातात. आपला इंद्र अमर असल्याने तो नहुषाकडून मारला जात नाही. पण एकेश्वरपंथी इराण्यांनी यमराजाला केवळ मानवी राजा बनविल्याने तो अहि दहाककडून करवतीने कापला जातो. इंद्र गुप्त झाल्यानंतर नहुष इंद्राणीशचीचा अभिलाष करतो, तर अहि दहाकने यमराजाच्या भगिनींची (अथवा कन्यांची) आपल्या अंतःपुरात भरती केली होती, अशी इराणी परंपरा आहे. इंद्रभक्तांनी नहुषाला सर्प बनण्याचा शाप दिला, तेव्हा तो सर्प बनून पदच्युत झाला, अशी भारतातील परंपरा आहे. उलटपक्षी अहि दहाक हा सर्प बनून नरबलींचा आहार घेऊ लागल्यामुळे त्रैतन-फरिदूनने त्याला पदच्युत केला अशी इराणी परंपरा आहे. भारतातील कथेप्रमाणे अगस्त्यांनी नहुषाला सर्प बनविला, तर इराणी परंपरेप्रमाणे कव अथवा काव (Kaveh काव्य ?) नावाच्या लोहाराने अहि दहाकची निर्भत्सना करून त्याच्याविरुद्ध बंडाची उभारणी केली. अनुशासनपर्वातील नहुषाख्यानात भृगूंच्या प्रभावामुळेच अगस्त्यांना शाप देऊन नहुषाचे उच्चाटन करता आले अशी जी कथा आली आहे, ती इराणी भृगूंच्या प्रभावामुळेच आली असावी. इराणी फरिदूनने अहि दहाकचा वध न करता त्याला देमावेंद पर्वतावर बद्ध करून ठेविले आणि अगस्त्यांनी त्याला अजगर बनवून जिवंत सोडले. नहुष अजगर बनल्याची कथा ऐतिहासिक माहितीवर आधारलेली आहे. बायबलमध्ये (2 Kings 18-4) सालोमनच्या मंदिरात यव्ह अथवा जिहोवा देवासहच नेहुष्टन (Nehushtun) सर्पाची उपासना ख्रि. पू. सातव्या आणि आठव्या शतकात करीत असल्याचा उल्लेख आहे. हा सर्प पितळेचा केलेला असे. महाभारतातील

आजगरपर्वांतही ( त्रित्रांग अंगजैश्चित्रैर्हरिद्रा सदृशच्छवि ) असा त्या अजगराच्या हरिद्रावर्णाचा उल्लेख आला आहे. यमाने भगिनीगमन करण्याचे नाकारल्यावर अहि दहाकने त्याला पदच्युत केले, हे वर सांगितलेच आहे. तेव्हा भारतीय परंपरेप्रमाणे या अहीच्या स्थानी ज्या नहुष राजाचे नाम येते, तो नहुष विरजा नामक पितृ-कन्येचा ( म्हणजेच भगिनीचा ) पती असल्याचा उल्लेख आढळला, तर त्या योगाने भारतीय परंपरा ऐतिहासिक ज्ञानावर आधारली असल्याचेच सिद्ध होते. तसा उल्लेख मत्स्यपुराणाच्या पंधराव्या अध्यायात आहे. ( म. १५–२३ ) 'दाशराज्ञ युद्ध' च्या पहिल्याच प्रकरणाच्या अंती नहुष ही इराणच्या सम्राटांची एक पदवी असल्याचा मी उल्लेख केला होता. ती कल्पनाही साधार असल्याचे नहुषचरित्राच्या चिकित्सेने सिद्ध होत आहे. इथे हे स्पष्टीकरण केले पाहिजे की, पितृकन्या म्हणजे सावत्र बहीण, तिच्याशी विवाह करणाऱ्याच्या मातेची कन्या नव्हे. नहुष हमुराबीचा समकालीन असा यहुदी धर्माचा पहिला प्रेषित जो आब्राहाम त्यानेही नहुषाप्रमाणेच पितृकन्येशी ( सारा ) विवाह केला होता. बायबलवरील भाष्यावरून समजते की नेहुष्टन हा शब्द तिरस्कारव्यंजक आहे. यावरून त्या ग्रंथात नहुषचे थोडे विकृत रूप का येते, याचा उलगडा होतो.

## हमुराबी हाच बायबलमधील अमरपाल

हमुराबीचे नाव बायबलमध्ये Amraphel असे येत असले तरी त्याचे सत्य स्वरूप Amarapal असे असल्याचे रागोझिन यांनी 'खल्डिया' (पान २२६ ) ग्रंथात लिहिले आहे. मात्र त्यांनी ते त्याच्या पित्याचे अथवा त्याचे नाम मानले आहे. हमुराबीचा प्रतिस्पर्धी जो लार्साचा राजा, त्याला पाश्चात्त्य इतिहासकारांनी रिमसिन म्हटले असले तरी बायबलमध्ये त्याचे Arioch आर्यक हे आर्य नाम दिले आहे. प्राचीन चरित्रकोशात एकच आर्यक येत असून तो कद्रूपुत्र आहे. बायबलमधील आर्यक हा इलामाचा राजा कुदुर लागमार याचा भाऊ अथवा चुलतभाऊ होता. यावरून त्याचा कद्रू = कुदुर कुळाशी असलेला संबंध व्यक्त होतो. अमरपाल ही हमुराबीची कुलपरंपरागत पदवी असो, किंवा त्याला प्राप्त झालेली पदवी असो. तिच्यावरून नहुष हा इंद्र झाला होता, या परंपरेची ऐतिहासिकता सिद्ध होते.

## नहुषाने केलेला शचीचा अभिलाष

नहुषाने शचीचा अभिलाष केल्याची कथाही हमुराबीच्या इतिहासावरच आधारलेली आहे. या राजाने आपण जिंकलेल्या प्रदेशातील देवता स्थानिक लोकमताला लाथाडून बाबिलोनला आणविल्या. या प्रकरणी केंब्रिजच्या विद्वान इतिहासकारांनी लिहिले आहे.

'Another letter refers to the removal of these goddesses to Babylon, where Hammurabie himself would be able to refresh his memory and gloat on the triumphs over his foes by the sight of them.' म्हणजे शत्रूंवर मिळविलेल्या विजयांच्या अहंकाराला खाद्य मिळावे म्हणून हमुराबीने जिंकलेल्या प्रांतातील देवतांच्या मूर्ती बाबिलोन येथील मंदिरांत आणून ठेविल्या. या मूर्ती 'मनुष्यवाह्यम् चतुरस्रयानम्' अशाच वाहनांतून आणल्या असतील. 'He informs Sin-idinnam that he will send two officers to take charge of the transport of these goddesses, and that Ssin-idinnam is to embark them in a boat, and see that they come to Babylon with a train of templewomen in attendance.'

या कामावर राजाने आपल्या दोन अधिकाऱ्यांची योजना केली होती, आणि सिन इदिन्नम या त्याच्या विश्वासू अधिकाऱ्याला सूचना केली होती की, या देवता भक्तिणींसह बाबिलोन येथे सुरक्षित पोचल्या पाहिजेत. अशा प्रकारे जिंकलेल्या राज्यांतील प्रजेला तिच्या दैवतांपासूनही वंचित करणे, हे रानटी, अत्याचारी कृत्य आहे, हे सिद्ध करण्याची आवश्यकता नाही. आपला पंढरपूरचा विठोबा विजयानगरच्या राजांनी हंपीला नेला असता संत भानुदासांनी त्याला तेथून आणून त्याची पुन्हा स्वगृही प्रतिष्ठापना केली. हमुराबीच्या या कृत्यात देवतांच्या अभिलाषाचा भाग किती, आणि त्यांच्या भक्तिणींच्या अभिलाषाचा भाग किती, हे केवळ व्यासमहर्षीच जाणत असावेत. नहुषाने शचीचा अभिलाष केल्याच्या कथेच्या रूपाने त्यांनी हमुराबीच्या चरित्राचे जे चित्रण केले आहे, ते सर्वस्वी ऐतिहासिक सत्यावर आधारलेले आहे. नहुषाला पदच्युत करण्याच्या कारस्थानात प्रमुख भाग घेण्याव्यतिरिक्त आपल्या पुराणात शचीने दुसरे कोणतेच महत्कार्य केले नाही. बाबिलोनियातील पुराणकथांचा अभ्यास करणाऱ्या डोनाल्ड

मॅकेंझीनीं लिहिले आहे. की, हमुराबीचे राजघराणे नष्ट करून बाबिलोनमध्ये स्वतःच्या ५७६ वर्षे टिकलेल्या राजघराण्याची स्थापना करणाऱ्या कशूकुलाची शची ही एक सूर्यदेवता होती. बाबिलोनी परंपरेत चंद्र पुरुष आणि सूर्य स्त्रीदेवता असल्याने भारतीय परंपरेत शचीला इंद्राणीचे पद मिळाले, ते उचित आहे. तेव्हा नहुषाने शचीचा अभिलाष केल्यामुळे शचीभक्तांनी त्याला पदच्युत करण्याच्या कारस्थानात प्रमुख भाग घेतल्याची महाभारतातील कथा पूर्णपणे ऐतिहासिक आहे. हमुराबीने असुर देवाची असुरनगरीत पुन्हा स्थापन केल्याची वढाई मारली आहे, तीहि लक्षात घेतली पाहिजे.

## नहुषाचा वर आणि शाप

नहुष शब्दाचा अर्थ सर्प होतो, हे वर सांगितलेच आहे. या अर्थाला अनुसरून नहुषाख्यान रचताना व्यासांनी आश्लेषातील अहीचा कसा उपयोग केला, याचा उलगडा यापूर्वी केला. पण आकाशात सप्तर्षींच्या उत्तरेला आणि ध्रुवाच्या सन्निध जो कालसर्प पसरलेला आहे, त्याचा नहुषाख्यानात कसा उपयोग करून घेतला आहे, याचे विवेचन आता केले पाहिजे. हा ध्रुवासन्निध पसरलेला कालसर्पच सप्तर्षींनी वाहिलेल्या शिबिकेत बसलेला नहुषराजा होय. त्याला सर्प बनण्याचा अभिशाप देण्याची आवश्यकता नाहीच. कारण ज्योतिषी कवींनीं प्रथमपासूनच त्याला सर्प मानला आहे. या सर्पाची शिबिका वाहण्याचा कार्यक्रम जगाच्या उत्पत्तीपासून सप्तर्षी करीत आले आहेत. या सप्तर्षींमध्ये अगस्त्यांचा समावेश होत नाही. असे असून नहुषाच्या शिबिकावाहकात व्यासांनी अगस्त्यांचा अंतर्भाव केला आहे, तो ऐतिहासिक परंपरेला मान देऊन केला असला पाहिजे, असे अनुमान निघते. अगस्त्यांना ऋग्वेदात मान्य आणि मांदार्य अशा संज्ञा दिल्या आहेत. प्राचीन फारशी भाषेत मान्य शब्दाचा अर्थ भूस्वामी असा होतो. मांदार्य हे अगस्त्यांना निवासस्थानावरून पडलेले नाम. अशा मान्य अगस्त्यांनी नहुषविरोधी राज्यक्रांतीत प्रमुख भाग घेतला असल्याने नहुषाच्या शिबिकावाहकात व्यासांना त्यांचा अंतर्भाव करावा लागला. ‘ ज्या व्यक्तीवर तुझी दृष्टी पडेल, त्या व्यक्तीची सर्व शक्ति तू हरण करून घेशील. ’ असा नहुषाला वर मिळाला असताना अगस्त्यांच्या शापाने तो अजगर कसा झाला, हा प्रश्न प्रत्यक्ष महाभारतातच उपस्थित केला आहे. वस्तुतः हा वर म्हणजे नहुषाच्या सर्पस्वरूपाची सूचनाच होय. कारण कोणताही सर्पराज एखाद्या प्राण्याकडे अथवा मानवाकडे टक लावून पाहू लागला, म्हणजे तो आपल्या प्रतिपक्षाची सर्व शक्ती हरण करून घेतो, त्याला जागच्या जागीं खिळवून टाकतो, ही गोष्ट सर्वांनाच सुविदित आहे.

## अगस्त्यांसंबंधीं अधिक चर्चा

अगस्त्यांचा मरुद्गणांशी विशेष निकटचा संबंध होता. या मरुद्गणांनी वृत्रसंहाराच्या प्रसंगी इंद्राला यथाशक्ती साहाय्य केले नाही, म्हणून इंद्राचा त्यांच्यावर कोप झाला असता अगस्त्यांनी त्या उभयतांचा कलह मिटविला आणि या प्रसंगाला अनुलक्षून त्यांचे प्रसिद्ध ‘ कयाशुभीय ’ सूक्त प्रकट झाले, अशी वेदवाङ्मयातील परंपरा आहे. इथे इतके सांगितले म्हणजे पुरे की, हमुराबी नहुषाच्या कुलाचे राज्य ज्या कशुकुलाने हस्तगत केले, त्या कुलाच्या वंशावलीत मरुत्तश् नाम धारण करणारे निदान दोन राजे होऊन गेले. अगस्त्यांनी द्वादशवार्षिक सत्र आरंभिले असता इंद्र वृष्टी करीना, तेव्हा अगस्त्यांनी स्वतःच इंद्र बनून वृष्टी करण्याचे आश्वासन ऋषींना दिले, अशी कथा महाभारताच्या आश्वमेधिक पर्वात आली आहे. ‘ वैदिक आर्यांचे ज्योतिर्विज्ञान ’ या ग्रंथात मी पूर्वीच दाखवून दिले आहे की, नवीन इंद्राची स्थापना करण्याच्या काळातच हा यज्ञ करीत असत. अगस्त्यांनी द्वादशवार्षिक सत्र आरंभिले, त्या काळात एक अवर्षणाचे चक्र चालू झाले होते, असे मी वर डोनाल्ड मॅकेंझींच्या ग्रंथावरून दाखविले आहे, त्याला महाभारतातील या कथेने पुष्टी मिळते. अगस्त्याचा क्रतू, पुलह, पुलस्ति या सर्व कुलांशी निकटचा संबंध होता, अशी पौराणिक परंपरा आहे. हीं सारी ऋषिकुले पश्चिम आशियात निवास करीत असल्याचे ब्रुनहोफेर यांनी त्यांच्या Urgeschischte der Arier या ग्रंथात दाखवून दिले आहे. हा ग्रंथ ‘ दाशराज्ञ युद्ध ’ लिहीत असताना १९४६ मध्ये पाहिला होता. आता तो माझ्या हाताशी नाही, म्हणून पूर्ण संदर्भ देऊ शकत नाही. या साऱ्या संदर्भांचा विचार केला म्हणजे अगस्त्यांच्या स्थळकाळाची काहीशी यथार्थ कल्पना येऊ शकते. इथे हीहि गोष्ट सांगितली पाहिजे की, वर उल्लेखिलेल्या मरुत्त राजाच्या यज्ञातील उरले सुरले धन वेचूनच पांडवांनी आपला अश्वमेध साजरा केला, असे आश्वमेधिक पर्वात सांगितले आहे.

### हमुराबीनहुष, कुरुकुलांतील पहिला धर्मराज

हमुरावीनहुषाला कुरुकुलांतील पहिला धर्मराज असे म्हणता येईल. मात्र तो केवळ काळ्या केसाच्या प्रजेचा धर्मराज होता. आपल्या नहुषस्मृतीच्या प्रस्तावनेत या राजाने म्हटले आहे.

'From the black heads which Bel gave me, to be a shepherd over whom Marduk appointed me, I have not held aloof. With the powerful arms which Zamama and Ishtar endowed me, with the clear glance that Ea granted me, with the bravery that Marduk gave me, the enemy above and below I have rooted out,'

तेव्हा हमुरावी हा काळ्या केसाच्या प्रजेचा पक्षपाती होता आणि या बाबतीत इराणी लोकांचे आणि त्याचे मतैक्यच होते, इराणी लोक तर हिरण्यकेशी मुलांना व्यभिचाराची संतती मानून त्यांचा त्याग करीत. शहानाम्यातील वीर रुस्तुम याचा पिता जाल, याला याच कारणाकरिता पित्याने जन्मतःच टाकून दिला होता. मानवामानवातील सर्व संबंध आणि व्यवहार यांचा नियंता मित्रदेव असल्याची इराणी कल्पनाही हमुरावीला मान्य असल्याने, शम्स हा सूर्यदेव स्वतः आपल्याला नवी स्मृती देत असल्याचे चित्र त्याने आपल्या स्मृतिस्तंभावर खोदले होते.

'The oppressed man who has a cause for complaint shall come before my picture of the King of justice, shall read the inscription, the writing shall explain to him his case, he shall see his right, Hammurabi the king of righteousness, to whom Shams gave the law, I am.'

हमुरावीने आपल्या राजवटीच्या दुसऱ्या वर्षाला, ज्या वर्षी मी न्यायाची स्थापना केली ते वर्ष असे नाव दिले आहे, त्यावरून त्याच्या न्यायप्रवण प्रवृत्तीची कल्पना येते. हमुरावीची ही स्मृती बहुतांशी उपलब्ध असून तिचे अनुवादही प्रसिद्ध झाले आहेत. वरील अवतरणात सांगितल्याप्रमाणे या स्मृतिस्तंभावर त्याने स्वतःला धर्मराज म्हणवून घेतले असून कोणालाही स्वतःवर अन्याय झाला असे वाटत असल्यास त्याने या स्मृतीचे वाचन करून आपल्या अंतःकरणाचे समाधान करून घ्यावे, असे भावी पिढ्यांना आश्वासन दिले आहे. इराण इलामभधील प्रजेने हमुरावीच्या वंशजांपासून वाविलोन जिंकून घेतल्यानंतर तिच्या अंतःकरणात जी पहिली ऊर्मी उद्भवली, ती ही स्मृती सपशेल पुसून टाकण्याची होती. त्या भरात जेत्यांनी तिचा काही भाग पुसून टाकला. पण त्यानंतर ही नहुषस्मृति आपल्या देशातील पर्वत प्रदेशांत बंदिवासात ठेवण्याची प्रेरणा त्यांना झाल्यामुळे त्यांनी तो स्मृतिस्तंभ शूषा राजधानीतील पहाडावर नेऊन ठेविला. भीमाला वनवासात भेटलेला अजगररूपी नहुष अन्य कोणी नसून हा स्मृतिस्तंभच असावा. इश्तर आणि झमामा यांजकडून नहुषाला बलाढ्य बाहू लाभल्याचा उल्लेख वरील अवतरणांतून आलाच आहे. त्याच्या बाहुबलाशी तुलना करताना भीमाचे बाहुबल केवळ कःपदार्थ असल्याचे दाखवून देण्याकरिता व्यासांनी अजगरनहुषाच्या मगरमिठीत भीम अडकून पडल्याचे वर्णन केले आहे. आणि त्या निमित्ताने भारतीय युद्धकालीन धर्मराजाची त्याच्या कुलातील पहिल्या धर्मराजाशी भेट घडवून आणली आहे. इराणी परंपरेप्रमाणेही त्रैतनफरिदून अहिदहाकचा वध करण्याला प्रवृत्त झाला असताना त्याला आकाशवाणीने आदेश दिला की, याला देमावेंद पर्वतावर शृंखलाबद्ध करून ठेव, म्हणजे तिथे कोणी त्याच्याशी संपर्क ठेवू शकणार नाहीत हमुरावीच्या अंतानंतर त्याची नहुष्टुन या सर्पस्वरूपात उपासना चालू झाली, हे मी वर दाखवून दिले आहे. तथापि अशी कल्पना मनात येते की धर्मभीमाना अरण्यवासात अजगररूपाने भेटलेला नहुष राजा म्हणजे हा नहुषस्मृतीचा स्तंभच असावा. धर्मराजाच्या भेटीनंतर तुझा उद्धार होईल, असा जरी अगस्त्यांनी नहुषाला उश्शाप दिला असला, तरी महाभारतात शंवरासुराच्या वचनांचा अनेकदा आधार घेणारा धर्मराजा नहुषस्मृतीचा कधी उद्धार करीत नाही. यामुळे असे म्हणावे लागते की, मॉर्गनसारख्या संशोधकांना नहुषस्मृतीचे दर्शन झाल्यानंतरच त्या राजाचा खरा उद्धार झाला असून धर्मराजाने त्याच्याशी धर्मविषयक संवाद केला, तसा आता कोणालाही त्या महान धर्मराजाशी संवाद करता येईल.

### धार्मिक इतिहासात हमुरावीच्या काळाचे महत्त्व

जगाच्या धार्मिक इतिहासात हमुरावीच्या काळी तीन महत्त्वाच्या घटना घडून आल्या. यांपैकी पहिली घटना

म्हणजे यहुदी धर्माचा आदिनाथ जो आब्राहाम, त्याचा उदय. आब्राहाम आणि अमरपाल हमुराबी हे समकालीन असून अमरपालाच्या सैन्याशी आब्राहामच्या कुलाची एक चकमक झाल्याचे वर्णन बायबलमध्ये आले आहे. याच काळी इराणात यमविरोधी जरथुस्त्री पंथाचा उदय झाला आणि वैदिक आर्यांमध्ये वेदवादरताना न्यूनत्व देणाऱ्या, इंद्राशी न्यूनाधिक प्रमाणात विरोध करणाऱ्या ब्रह्मा, विष्णू आणि शिव या त्रयीच्या उपासकांचा उदय झाला. महाभारतात अर्जुनाला इंद्रपुत्र म्हणून वर्णिले असले तरी खांडवदहनाच्या प्रसंगी तो आणि कृष्ण इंद्राला विरोध करतात. कृष्णाने इंद्रमखाला केलेला विरोध सुप्रसिद्धच आहे. धर्मराज तर इंद्रशत्रू शंबरासुराच्या वचनांचा आधार घेताना आढळतो. 'नातःपापीयसीं कांचिदवस्थां शंबरोऽब्रवीत्। यत्र नैवाद्य न प्रातर्भोजनं प्रतिदृश्यते॥' कृष्णाला कौरवांच्याकडे शिष्टाईला पाठविताना युधिष्ठिराने वरील उद्गार काढले आहेत, यावरून धर्मराजाप्रमाणेच कृष्णालाही शंबराची वचने आप्तवाक्य या नात्याने आदरणीय वाटत असत, ही वस्तुस्थिती व्यक्त होते. धर्मराजाने ज्या मरुत्त राजाचे अवशिष्ट धन वेचून आपला अश्वमेध साजरा केला, त्या मरुत्ताचाही इंद्राशी कलह झाल्याचा आश्वमेधिक पर्वात उल्लेख येतो.

### नहुषाच्या निष्कलंकपणाची पश्चिम आशियातील प्रसिद्धी

वरील विवेचन लिहून झाल्यावर दृष्टोत्पत्तीस आले की, बायबलमधील डेव्हिड राजाचा पिता जेस्से यालाही नखाश म्हटले असून त्यावर टीकाकाराने (रूथ ४-२२) लिहिले आहे.

'Obed begat Ishai (Jesse) whose name is Nachash because there was not found in him iniquity or corruption.'

या निष्कलंक नहुषाला अथवा जेस्सेला आठ पुत्र असून त्यांच्यापैकी डेव्हिड हा पुढे यहुद्यांचा राजा झाला. या डेव्हिडचा पंचविसावा वंशज येशू ख्रिस्त. म्हणजे आब्रहाम ज्या नहुषाशी लढला, त्याच्या निष्कलंक चरित्राची कीर्ती यहुदी लोकात कशी चिरंतन झाली होती, तसेच येशूचा पूर्वज जो डेव्हिड राजा, त्याच्या पित्याचे नाव नहुष असल्याची परंपरा यहुदी लोकांनी कशी जपून ठेविली आहे, हे यावरून वाचकांना कळून येईल.

• • •

## साभार–स्वीकार

**प्राचीन मराठी जैन साहित्य** सुभाषचंद्र अक्कोळे, सुविचार प्रकाशन, नागपूर-पुणे; १५ रु.

**प्राचीन मराठी साहित्य संशोधन** वि. भि. कोलते ठोकळ प्रकाशन, पुणे २; ८ रु.

**आमचे कृतार्थ जीवन** (आत्मचरित्र) रूथबाई हिवाळे, विदर्भ मराठवाडा बुक कं. पुणे २; ८ रु.

**नवतवाद** लालजी पेंडसे, अभिनव प्रकाशन, मुंबई २२; १॥ रु.

**पुस्तकांची दुनिया** भानु शिरधनकर, अभिनव प्रकाशन मुंबई १२; १॥ रु.

**पंजाबराव देशमुख** (चरित्र) मधुकर केचे, ठोकळ प्रकाशन, पुणे २; २॥ रु.

**फराळाचा डबा** (बाळवाङ्मय) दा. न. शिखरे, विदर्भ मराठवाडा बुक कं., पुणे २; १॥ रु.

**प्रेम लाभे प्रेमळाला** (स्त्रीपात्री नाटक) प्रभा दाते, के. वा. जोशी, पुणे २; २॥ रु.

**पंख हवे मज** (नाटक) श्रीनिवास कोचकर, के. वा. जोशी, पुणे २; ३ रु.

**तुम्ही पुरुष म्हणजे** (एकां.) लीला फणसळकर, के. वा. जोशी, पुणे २; ६० पैसे.

**विनोदी नाटिका** लीला फणसळकर, के. वा. जोशी, पुणे २; ७५ पैसे.

# खुरासान व नैशापूर

• देवीसिंग चौहान •

प्रबोधचंद्रोदय या नाटकातील वर्ण्यविषयाने ज्याप्रमाणे भारतातील भक्तिमार्गी विद्वानांना वेड लावले;* तसेच वेड इराणमधील खुरासान या प्रदेशातील विद्वानांना लागणे सहज होते. खुरासान हा प्रदेश आज इराण देशाचा एक जिल्हा किंवा ओस्तान ( ८ स्थान ) आहे. परंतु प्राचीन काळी हा प्रदेश फारच मोठा होता. शकाच्या आरंभापासून तो आठव्या शतकापर्यंत या खुरासान प्रदेशात बौद्धधर्म नांदत होता. इराण देश इस्लाममय झाल्यानंतर ( शकाच्या सातव्या शतकात ) इराणी व अरबी विद्वानांनी अनेक ग्रंथ इतिहास, भूगोल, साहित्येतिहास इत्यादी विषयांवर लिहिलेले आहेत. या ग्रंथांतून खुरासान प्रदेशाची चतुःसीमा आढळून येते. हा प्रदेश आमू दर्या–ऑक्सस नदीच्या दक्षिण भागात–डाव्या किनाऱ्यालगत वसलेला आहे. या प्रदेशाच्या पूर्व भागाला हिंदकुश पर्वत दक्षिणभागी लागतो. पूर्वेस भारत व सीस्तान ( सईस्तान, सकीस्तान, सगीस्तान वा शकस्थान ) हे भूभाग होते. पश्चिमेस इराणमधील गुज्ज व गुर्गान ( जुर्जान ) हे प्रदेश पसरलेले आहेत. दक्षिणेस व दक्षिणपश्चिमेस इराणचे वाळवंट असून उत्तरेस ट्रान्सोक्झियाना ( मावराऊन्नहर ) हा प्रदेश आहे. या प्रदेशाची दक्षिणोत्तर रुंदी ३०० मैल व पूर्वपश्चिम लांबी साधारणतः ५०० मैल होती.

* पत्रिकेच्या जानेवारी १९६८, क्रमांक १६४ या अंकात श्री. चौहान यांचा प्रबोधचन्द्रोदय आणि दस्तूरे-उश्शाक हा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्या लेखात पृ. २२ वर प्रबोधचन्द्रोदयाचा अनुवादरूप दस्तूरे-उश्शाक हा ग्रंथ नैशापूर या प्राचीन सांस्कृतिक केंद्र असलेल्या नगरात लिहिला गेला असे सांगितले आहे. या भारतीय संस्कृत नाटकाची चाहूल व अभ्यास, नैशापूर या दूरस्थ ठिकाणी होण्याची इतिहासदृष्ट्या कशी शक्यता होती, हे स्पष्ट करून सांगणारा हा लेख, मागच्या लेखाचा पूरक व उत्तरार्ध म्हणून, वाचकास रुचकर वाटेल.

सम्पादक

अफगाणिस्तानमधील हरात, बल्ख ( बाक्ट्रिया ) इत्यादी शहराचा या प्रदेशात समावेश होत असे. नैशापूर, सब्जवार, बिर्जंद व कैन हे सुपीक जिल्हे खुरासानमधीलच होत. कास्पियन समुद्राला मिळणारी आत्रक नदी, तसेच दक्षिण वालुकामय प्रदेशात लुप्त होणारी कलेह–मुरा ही नदी या खुरासानमधील मुख्य नद्या होत.

खुरासान हा शब्द केवळ फार्सी म्हणजे संस्कृतोत्पन्न आहे. या शब्दाचा अर्थ या प्रदेशाच्या अर्थाव्यतिरिक्त, पूर्व दिशा असाही दिलेला आहे. संस्कृत स्वर शब्दाचे पहलवी किंवा जुन्या फार्सीतील रूप खुर, खूर किंवा हूर असे पर्यायाने होते. दोन्ही रूपे सदाच उपयुक्त आहेत. स्वर आणि स्थान किंवा आस्थान यांचा सामाजिक शब्द खुरासान होणे शक्य आहे. येथे स्थानमधील था चा आ बनून आसान रूप बनले असावे. खुरासान प्रदेशाचा इतिहास इसवी सन पूर्व हजार वर्षांचा जुना आहे. खुरासान सदैव इराणी सांस्कृतिक वर्चस्वाखाली राहिलेले आहे. म्हणून इराणचा पूर्वतम प्रदेश म्हणून हे नाव सार्थ ठरले. भारतीय आर्यांनी असम या पूर्वतमवर्ती प्रदेशाला प्राग्जोतिष असे नाव दिलेले आहे. तसेच आग्नेय आशियातील देशांनी जपानला उगवत्या सूर्याचा देश असे नाव दिलेले सर्वपरिचितच आहे.

खुरासान प्रदेशात बौद्धधर्माचा प्रसार इसवी सनापूर्वी झालेला आहे. तसा पुरावा पाली व संस्कृत वाङ्मयातून सर्वत्र मिळतो. अफगाणिस्तानमध्ये कंदाहार आणि पुले-दुरुन्त येथे अशोकाचे शिलालेख मिळाले आहेत, हा काळ इसवी सन पूर्व २५० वर्षांचा आहे. बामी खोऱ्यात बुद्धाच्या अनेक मूर्ती लेण्यांतून कोरलेल्या अद्यापि चांगल्या अवस्थेत प्राप्त आहेत. शकाच्या नवव्या शतकापर्यंत हा देश बौद्धधर्माच्या प्रमुख केंद्रापैकी एक होता. चिनी प्रवाशाच्या वर्णनावरूनही यासंबंधी चांगली माहिती मिळते. फा-हियान हा चिनी प्रवासी शक ३२१ मध्ये चंगन शहरापासून स्थलमार्गे

अनुक्रमणिका

निघाला व शक ३३५ मध्ये बुद्धाच्या प्रसिद्ध स्मारकांचा व त्याच्या तात्त्विक विचारांचा ज्ञानसंभार घेऊन समुद्रमार्गे परत गेला. त्याने मध्य आशियामधील खुतन, चकूक, अग्नी इत्यादी नगरांना भेटी दिल्या. तो काशगर मध्येही पोहचलेला होता. तो भारताच्या उत्तर भागात उद्यान, दरप, गांधार, तक्षशिला, पुरुषपूर इत्यादी बौद्ध स्थानांची यात्रा संपवून खुरासानमधील नगरहरा ( हद्दा ), लकी, हरन, उच्छा इत्यादी स्थाने पाहून भारतयात्रेकरिता गेला. नगहरा येथे बुद्धाच्या एका दन्तावषेशावर एक भव्य स्तूप उभारलेला आहे. हे भूभाग आज अफगाणिस्तानात समाविष्ट आहेत.

दस्तूरे–उश्शाकचा लेखक फताहीची मातृभूमी असलेले नैशापूर हे शहर खुरासानची प्राचीन काळी राजधानी होते. अरबांनी इराण देश शक ५७२ त जिंकला. पुढील शंभर वर्षांत इराणची फार्सी आर्य जनता इस्लामानुयायी बनली. फार्सी व अरबी भाषेत लिहिल्या गेलेल्या शेकडो इतिहास ग्रंथांवरून शकाच्या आठव्या शतकात व तदनंतरही नैशापूर हे विद्येचे माहेरघर होते, असे प्रत्ययास येते. मुसलमानी प्रथम कालातील बहुधा सर्व फार्सी साहित्य ही खुरासानी साहित्यिकांची निर्मिती आहे असे म्हणावे लागते. फार्सीचा उपलब्ध आद्य साहित्यिक रुदकी ( रौदकी ) हा याच नैशापूरच्या परिसरात जन्मलेला होता. तो शक ८०० च्या सुमारास जिवंत होता. त्याने पंचतंत्राच्या अरबी अनुवादावरून फार्सीत कथाकाव्य लिहिले. " शाहनामा " ग्रंथाचे आरंभीचे हजार श्लोक लिहिणारा दकीकी हा खुरासानचाच रहिवासी होता. जगप्रसिद्ध " शाहनामा " ग्रंथाचा लेखक फिर्दौसी हा नैशापूरजवळील तुस गावचा राहणारा होता. फिर्दौसीने आपला ग्रंथ शक ९३२ मध्ये परिपूर्ण केला व शक ९५४ मध्ये जीवितयात्रा संपविली. भारताची माहिती देणारा अबुरीहान अल्बेरूनी हा या खुरासान प्रदेशाचाच रहिवासी होता. तो फिर्दौसीचा समकालीन असून त्याचा मृत्यू शक ९७० मध्ये झाला. रुबाईवृत्तात ज्याच्या श्लोकांनी, विशेषतः फिझराल्डच्या प्रस्तावनेमुळे सर्व जगाला वेड लावले आहे असा उमर खय्याम हा नैशापूरचाच रहिवासी होता. कवि ह्मणून जरी त्याची जगाला ओळख असली तरी तो श्रेष्ठ प्रतीचा गणितज्ञ होता हेहि विद्वानांना ज्ञात आहे. नैशापूर येथे निझामुल्मुल्क या प्रसिद्ध पंतप्रधानाने स्थापन केलेल्या विद्यापीठात तो प्राध्यापक होता. श्रेष्ठ गणितज्ञांची समिती शक १००१ मध्ये पंचांग शुद्धीसाठी स्थापण्यात आली व तदनंतर शुद्ध जलाली कालगणना सुरू करण्यात आली. या समितीत खय्याम होता. प्रसिद्ध फार्सी साहित्येतिहासकार नुरुद्दीन मुहम्मद औफी हा खुरासानीच होय. त्याने आपला " लुबाबुलअल्बाब " हा साहित्येतिहास शक ११४३ मध्ये पूर्ण केला. " जवामिरूलहिकायत " नावाचा बृहत्कथा संग्रह शक ११५० मध्ये लिहून त्याने पूर्ण केलेला होता. याच्या या ग्रंथाच्या अध्ययनाने भारतीय कथापरंपरेचा फार्सी कथावाङ्मयावर झालेला परिणाम चांगला तपासता येईल.

खुरासान हे इराणी संस्कृती व फार्सी सारस्वताचे माहेरघर असल्याचे अनेक उल्लेख इतिहास-ग्रंथांतून सापडतात. " यतीमतुल दहर " ( काळाची दुर्मिळ रत्ने ) या अब्दुलमलिक अस्सालिबी नैशापूरनिवासी ( मृत्यू शक ९६० ) याच्या साहित्येतिहासातील उतारा ई. जी. ब्राऊन याने आपल्या फार्सी साहित्येतिहासाच्या पहिल्या खंडात ( पृ. ३६५ ) दिलेला आहे.

" Bukhara was, under the Samanid rule, the fours of splendour, the shrine of Empire, the Meeting-place of the most unique intellects of the Age, the Horizon of the Literary stars of the World and the fairs of the greatest scholars of the Period."

दीपंकर नावाचा ज्येष्ठ श्रेष्ठ बौद्धप्रसारक नेपाळच्या मार्गाने तिबेटमध्ये जाऊन १३–१४ वर्षे तेथे राहिल्याचा विश्वासार्ह इतिहास उपलब्ध आहे. त्याचा मृत्युकाल शक ९७६ सालचा आहे. या दीपंकर विद्वानाला आतिष ही उपाधि मिळाल्याचे सर्वज्ञात आहे. आतिश हा फार्सी शब्द असून आतिशीन म्हणजेच दीपंकर होय. म्हणजे या काळात अफगाणिस्तान, खुरासान, बुखारा इत्यादि प्रदेशात बौद्ध धर्माचे महत्त्व अद्यापि शेष होते असे दिसून येते. शक ६७४ पासून ७२६ पर्यंत इराणच्या खलिफाच्या साम्राज्याची सूत्रे हलविणारा बर्मक नावाचा प्रधान हा खुरासानमधील बल्ख ( बाक्ट्रिया ) येथील नववहार अर्थात वनविहार या प्रसिद्ध बौद्ध विहारच्या उपाध्यायवंशांतला होता. त्याच्या नजीकच्या पूर्वजांनी इस्लामधर्म स्वीकारला होता. कालान्तराने बर्मकने प्रधानपद मिळविले होते. बर्मक हा फार्सी शब्द परमक अथवा परमाख्य या संस्कृत शब्दाचा

अपभ्रंश आहे. वर्मक व त्याच्या दोन वंशजांनी शक ६७४ पासून ७२६ पर्यंत अब्बासी खलिफांच्या बगदाद ( भगदत्त ) राजधानीतून पंतप्रधानकी चालविली. खलिफांच्या या राजवंशकालात फार्सी भाषा व इराणी राज्यकर्ते यांना चांगले दिवस लाभले. याच काळात फार्सी भाषेत ग्रंथरचनेला जोमाने आरंभ झाला. आसामी भाषेत बरुआ ही सेनाधिकाऱ्याची उपाधी आहे. ६००० सेना धारण करणाऱ्याला बरूआ असें म्हणत. हा शब्द देखील प्रमुख + क शब्दापासून आलेला आहे. वर्मक हे धार्मिक पद असून बरुआ हे सैनिकपद होय. नवव्हार येथील देवालय फार्सी इतिहासात प्रसिद्ध असून तेथे यात्रेसाठी निरनिराळ्या देशांतील बौद्ध व हिंदु येत असत असे उल्लेख आढळतात.

" इराण " या इराण शासनाने प्रकाशित केलेल्या ( शक १८८५ ) व पुरातत्त्व माहितीवर आधारलेल्या छोटेखानी पुस्तकात खुरासानविषयी खालीलप्रमाणे वर्णन दिले आहे :–

Persian Resurrection — following the dawnfall of Sasanids, it was Khorasan which led the revolt against the invaders. ( Arabs ) Abu Muslim warrior, agitator, patriot and religious leader laid the groundwork for the fall of the Ommayads. and accession of ( 750 A. D. ) the Abbassids a Pro-persian dynasty. It was Khorasan that produced the first poets who discarded Arabic and started the new Persian literature and it was Khorasan which produced Firdousi, the greatest epic poet of Persia. In art and science too Khorasan was the leader. Avicenna, the great persion Scientist was a native of Khorasan and the Seljuk period ( 1037–1157 A. D. ) was the beginning of Persian assertion in architecture, pottery metal work, textile and other arts ( P. 125 ).

## अफगाणिस्तान

अफगाणिस्तान हा देश गेल्या २००० वर्षात बहुधा इराणी व भारतीय साम्राज्यात राहात आलेला आहे. या देशात स्वतंत्र राज्य व ते केवळ अफगाणिस्तानचे शक सतराव्या शतकात स्थिर झाले. अहमदशाह अबदाली किंवा दुरानी यांनेच या देशाला स्वतंत्र राज्याची अस्मिता प्राप्त करून दिली. प्राचीन काळी दारियस ( दार्थवहु इ. सनपूर्व ५२१ ते ४८६ ) याच्या साम्राज्यात अफगाणिस्तान व सिन्धु नदीपर्यंतचा भारतीय प्रदेश होता. अलेक्झांडरच्या स्वारीनंतर तो भारतीय वर्चस्वाखाली आला; कुशान कनिष्काचे साम्राज्य या प्रदेशावर चालून येथे बौद्ध धर्माची प्रस्थापना झाली. पुरुषपूर अर्थात पेशावर येथे कनिष्काने एक भव्य स्तूप उभारला होता. फाहियान याने ( शक ३२१ ते ३३२ ) येथील अनेक बौद्ध विहारे व स्तूप यांची यात्रा केली होती. अफगाणिस्तानातील बामियन खोऱ्यात बुद्धाच्या काही कोरीव मूर्ती शकाच्या सहाव्या शतकात खोदलेल्या आजही दिसून येतात. ( पाहा—ब्रिटनचा ज्ञानकोश–अफगाणिस्तान ) कंदाहार व पूले-दुरन्त येथे सम्राट अशोकाचे दोन शिलालेख हे अलीकडे उपलब्ध झालेले आहेत. ( इ. स. पूर्व २५० वर्षे. )

अफगान शब्द सर्वप्रथम वराहमिहिराने आपल्या " सूर्यसिद्धान्त " या ग्रंथात वापरलेला आहे. ( पाहा-ब्रिटनचा ज्ञानकोश-अफगाणिस्तान ) वराहमिहिर हा भारतीय नसून तो इराणी होता. असे वि. का. राजवाडे यांनी प्रतिपादले आहे. ( राजवाडे लेख संग्रह, भाग ३ पुणे शक १८५८ ) वराहमिहिर हा ज्योतिषज्ञ अफगाणिस्तानातून आलेला, सूर्योपासक शूद्र जातिपैकी होता. यासंबंधी जहांगीर ई. संजाना यांचा लेख पाहावा ( दिनशाह इरानी स्मारक ग्रंथ शक १८६५ ). " सूर्य-सिद्धान्त " ग्रंथ वराहमिहिराने शक ४९२ त पूर्ण केला.

अल्बेरुनी याच्या " भारत " या ग्रंथाच्या प्रथम खंडाच्या प्रास्ताविकात एडवर्ड सकौ याने शकाच्या नवव्या व दहाव्या शतकात जी निरनिराळी राज्ये बगदादच्या खलिफांच्या वर्चस्वापासून स्वतंत्र झालेली होती त्यापैकी सामानी राजवंशाचा ( शक ७९६ पासून ९२१ ) अधिकाधिक संबंध भारताशी आला असे निरोपिले आहे. सकौ याने असेही म्हटले आहे की या सामानी राजांचा काबूल, पंजाब आणि सिंध या प्रदेशातील हिंदूंशी घनिष्ठ संबंध होता. ( प्रस्तावना पृ. ४५ ).

अबू रैहान अल्बेरुनी याचा " भारत " हा अरबी ग्रंथ ( लेखन काल शक ९५२ ) एडवर्ड सकौ याने प्रथम जर्मन भाषेत शक १८१० त प्रसिद्ध केला. त्याने

स्वतःच त्याची इंग्रजी भाषांतरित आवृत्ती प्रसिद्ध केली. तो ग्रंथ शक १८८४ पश्चिम पाकिस्तान शासनाने पुनर्मुद्रित केला आहे. या ग्रंथात अल्बेरूनीच्या विधानावर टिपणे लिहिताना डॉ. सकौ यांनी अफगाणिस्तानच्या प्राचीन इतिहासाची थोडीशी माहिती दिली आहे. त्याच्या माहितीनुसार सीरियामधील दमस्क या राजधानीतून सत्ता चालविणाऱ्या उमय्य या अरबी मुसलमान सत्तेच्या प्रथम राजवंशाच्या कालात ( शक ५८३ ते ६७२ ) काबुल आणि सीस्तान ( सईस्तान, सजीस्तान, सगीस्तान, सकीस्तान ८ शकस्थान ) हा सर्व प्रदेश भारतात समाविष्ट होता. खलिफाला हा प्रदेश जिंकता आलेला नव्हता. येथील हिन्दू राजे मुसलमानी सत्तेशी निकराने झुंज देत होते. या प्रदेशातील काही भाग जरी खलिफाच्या ताब्यात गेला तरी काबुल व त्याच्या आसमन्तातील भाग मात्र सदैव तेथील पालवंशीय हिंदु सताधिशाच्या अधिपत्त्याखाली राहिला. हारून अल्रशीद या खलिफाचा वारस बनलेल्या त्याचा मुलगा मामून या खलिफाच्या कारकीर्दीत ( शक ७०६ ते ७५५ ) मात्र काबूलचा प्रदेश मुसलमानी राज्यात समाविष्ट झाला. खलिफांच्या राज्यव्यवस्थेनुसार बगदादहून वेगळा प्रशासक नियुक्त व्हायचा परंतु काबूल येथे हिंदू शाहालाच कायम ठेवण्यात आले. ही राजकीय व्यवस्था खीव अथवा खारिज्म या उत्तर खुरासानमधील राजधानीत करण्यात आली. शक ८७२ ते ८९७ च्या दरम्यान काबुल शहर सर्वस्वी मुसलमानी सत्तेत आले होते. तेथील लोकसंख्याही बव्हंशी इस्लामधर्मी होती. परंतु शहराच्या उपनगरातून अद्यापि हिंदूंची संख्या बरीच होती. येथे काही यहुदीही वसत होते. पाल या राजवंशातील जुन्या परंपरेनुसार काबुल ही त्या वंशाची राज्यभिषेक नगरी होती. राज्य कोठून जरी चालले तरी राज्यभिषेक मात्र याच शहरात संपन्न व्हायचा अशी परंपरा चालत आलेली होती.

अशा रीतीने अफगाणिस्तान जरी इस्लामधर्मी झाला तरी उत्तर सीमेवरील डोंगराळ व पहाडी प्रदेशात मात्र तेथील प्रजेने धर्मान्तर केलेले नव्हते. ते हिंदूच राहिलेले होते. म्हणून या प्रदेशाला काफिरिस्तान असे नाव मुसलमान विजेत्यांनी दिलेले होते. शकाच्या गेल्या शतकातच या काफिरिस्तानातील हिंदूंना जबरदस्तीने बाटवून मुसलमान करण्यात आले. ( पाहा—ब्रिटनचा ज्ञानकोश अफगाणिस्तान ) मौलाना सय्यद सुलेमान नदवी या विद्वानाने आपल्या " हिंदू व अरबके ताल्लुकात " ( संबंध ) या उर्दू ग्रंथांतही वरील विधानाच्या सत्यतेचा निर्वाळा दिलेला आहे. ते म्हणतात " ( ५ ) बल्ख खुरासानका एक शहर है और उस मुल्कका मजहब ( धर्म ) इस्लामसे पहले गुजश्ता और मौजूदा दोनों मुहक्किकोंके नज्दीक बौधमत था। चुनांचि इब्न नदीमने (अल्फिहिरिस्त ग्रंथाचे लेखक) भी खुरासान एक पुरानी तारीख ( इतिहास ) के हवाले ( संदर्भ ) से यही लिखा है कि ' इस्लामसे पहले खुरासानका मज्हब ( धर्म ) बौधका था ' ( ६ ) बर्मकके इस्लामके हालमें मौरिखोंने यह लिखा है कि ' नौ बिहारके पुजारी का जो मज्हब था वही मज्हब हिंदुस्तान, चीन और तुर्कोंके बादशाह का था ? । सबको मालूम है कि हिंदुस्तान, काबुल, चीन और तुर्कीस्तानका मज्हब बौधमत था, अतिशपरस्ती ( अग्निपूजा ) और मजूसियत ( मगी पंथ ) नहीं " ।

### संस्कृतची फार्सीला देन :

फार्सी भाषेने संस्कृत साहित्यापासून ज्ञानप्राप्ती करून घेण्याची परंपरा फारच प्राचीन आहे. उत्तमोत्तम संस्कृत ग्रंथांचे अनुवाद फार्सी भाषेत नेहमीच होत आलेले आहेत. जलालुद्दीन अकबर या मोगल सम्राटाने आपल्या अबुलफजल या विद्वानाकडून संस्कृत ग्रंथाचे फार्सी भाषेत करविलेले अनुवाद सर्वश्रुतच आहेत. अकबराचा पणतू शहाजहानपुत्र दारा शिकोह यानेही आपल्या वंशाची परंपरा कायम ठेवलेली होती. फार्सी भाषेत ही परंपरा अरबांचे पाय इराणच्या आर्यभूमीस लागण्यापूर्वी आरंभ झालेली होती. अरबांच्या आक्रमणपूर्व काळात इराणात सासान राजवंशाची सत्ता व साम्राज्य होते. ते शक ५७२त संपुष्टात आले. या राजवंशातील खुस्रौ अनुशेर्वान ( नौशेरखान ) या राजाचा प्रधान व राजवैद्य बुर्झोय याने भारतात प्रवासयात्रा केली होती. त्याने इराणात नेलेल्या अनेक नवीन गोष्टींपैकी पंचतंत्राचा पहलवी ( जुनी फार्सी ) भाषेत केलेला अनुवाद आणि बुद्धिबळाचा खेळ ( चेस ) ह्या दोन भारतीय देणग्या होत. खुस्रौचा राज्यकाल शक ४५३ ते ५०१ होय. बुर्झोय ( बुजुर्ज मिहिर ) याने हा पञ्चतंत्राचा अनुवाद शक ४९२ मध्ये केला असे आता विद्वानांनी परिश्रमपूर्वक निश्चित केले आहे. संस्कृतमधून फार्सी व अरबी भाषेत झालेल्या अनेक अनुवादाची यादी देता येते.

अरबी भाषेचा विकासदेखील फार्सीच्या चिरसहवासाने व फार्सी भाषेचा संस्कृत आणि ग्रीकच्या सहवासाने

झालेला इतिहासात नमूद आहे. खलिफांच्या अब्बासी राजवंशाच्या काळात फार्सीला बरे दिवस आले. अब्बासी खलिफा हे आपल्या इराणी प्रधानाच्या सल्ल्याने वागत. हे इराणी मुत्सद्दी बहुधा खुरासान प्रांतातील असत. या खुरासानी पुढाऱ्यांच्या सहकार्यानेच उमय्य राजवंशाचा निःपात करण्याची राज्यक्रान्ती (शक ६७१) होऊ शकली. खलिफाची गादी या ईराणी-खुरासानी पुढाऱ्यांच्या सहाय्याने सुरक्षित राहू शकते अशी त्यांची पुरेपूर खात्री होती. आरम्भापासून वर्मक व त्याच्या दोन मुलां-नातवानी (शक ६७४ पासून ७२६) हे प्रधानपद चांगल्या रीतीने चालविले होते. या अब्बासी खलिफांच्या काळातच अरबी भाषेचा विकास होऊ शकला. डॉ. सकौ याने म्हटले आहे की अरबी भाषेचे माहेरघर सीरियातील दमस्क हे नसून ते बगदाद हे होय. अब्बासी खलिफाचे बरेचसे इराणीकरण झालेले होते. अरब हे मूलतः वालुकामय प्रदेशात राहणारे, बरेच अशिक्षित व अल्पसुसंस्कृत होते. त्यांना सुसंस्कृतीचे बाळकडू त्यांच्या जित इराणी लोकांकडून मिळाले असा अभिप्राय विद्वानांकडून सर्वत्र व्यक्त झालेला आहे.

अरबी भाषेतील कथात्मक साहित्य हे फार्सी भाषेतून अनुवादून घेतलेले आहे. " अलिफ लैला " हा बृहत्कथा-संग्रह (एक सहस्त्र व एक रात्री) हा कलिला व दमना या इब्न मुकफ्फा (वध शक ६७२) या इराणी विद्वानाने अरबी भाषेत केलेल्या पंचतंत्राच्या अनुवादाचा वंशविस्तार आहे. या सर्व फार्सी व अरबी कथा-साहित्याचे मूळ भारतीय आहे. " खुदाईनामा " (स्वधानामक) या फिर्दौसीच्या शाहनामा ग्रंथाला आधारभूत असलेल्या ग्रंथावरून अरबीत ऐतिहासिक साहित्य लिहावयास आरम्भ झाला. सकौच्या निवेदनानुसार फार्सी भाषेत गणितशास्त्र अथवा ज्योतिषशास्त्र या क्षेत्रात सासान राजवंशाच्या काळात किंवा तदनंतर ग्रंथरचना झालेली नव्हती. या क्षेत्रातील ज्ञान व ग्रंथ हे भारतातून फार्सी व अरबी भाषेत गेले. शक ६३३ मध्ये अब्बासी घराणे विजयी झाल्यापासून या देवाण-घेवाणीस आरंभ झाला. सिन्ध प्रांत शक ६७५ पासून ६९६ पर्यंत खलिफांच्या वर्चस्वाखाली होता. सकौ याच्या म्हणण्याप्रमाणे या काळात देशात परदेशी वकिलाती होत्या. त्यांच्याबरोबर भारतीय पंडित, गणितज्ञ व विशेषतः तज्ज्ञ वैद्य हे बगदाद येथे बोलाविले गेले. वैद्यांना राजवैद्य म्हणून नेमणुका मिळाल्या. त्यांच्या साहाय्याने वैद्यकशास्त्र त्या भागात प्रगत होत गेले. संस्कृत ग्रंथांची भाषान्तरे करण्यात आली किंवा अनुवादरूप स्वतंत्र ग्रंथनिर्मिती झाली.

वरील शक ६७५ ते ६९६ या कालखंडात ब्रह्मगुप्त ह्या भारतीय गणितज्ञाचे " ब्रह्मसिद्धान्त " आणि " खण्डखाद्यक " (?) हे ज्योतिषशास्त्रविषयक ग्रंथ बगदादला पोहचले. ब्रह्मसिद्धान्ताचे अरबी भाषेत " सिंदहिंद " नावाने अनुवाद झाले आणि खण्डखाद्यक या ग्रंथांचा " अरकंद " असा अवतार सिद्ध झाला. याच्यापूर्वीच इब्न मुकफ्फा याने पहलवीवरून अरबीत पंचतंत्राचा अनुवाद केलेला होता. या वरील दोन संस्कृत ग्रंथांचा अनुवाद व भाषान्तर अल्फजरी व याकूब इब्न तारीक या पंडितांनी केलेला आहे. या दोन ग्रंथाचा अरबी साहित्यावर (व पर्यायाने फार्सीवर देखील) खूपच प्रभाव पडलेला आहे. असे सकौ यांनी " भारत " या ग्रंथाच्या प्रस्तावनेत नमूद केले आहे. या घटनेनेच अरबांना ज्योतिषशास्त्राच्या शास्त्रीय प्रक्रियेची ओळख झाली. अरबांना प्रथमतः ब्रह्मगुप्ताच्या ग्रंथावरूनच ज्ञान झाले. ग्रीक टॉलेमीचा परिचय अरबांना यांच्या मागून घडून आला.

शक ९५२ मध्ये अबूरैहान अल्बेरूनी याने अनेक संस्कृत ग्रंथांच्या भाषान्तराने व अनुवादाने आपला " भारत " हा ग्रथ अक्षरबद्ध केला. हा ग्रंथ अरबी भाषेत आहे. वाराणसीकर गणितज्ञ जयानन्दसुत विजयानन्द याच्या " करणतिलक " या संस्कृत फलज्योतिषशास्त्राचा अनुवाद (लेखनकाल इ. स. दहावे शतकपूर्व) अल्बेरूनी याने अरबी भाषेत " गुर्रत–अल्जिजात " या नावाने केलेला उपलब्ध आहे. ग्रंथाचा परिचय ' इस्लामिक कल्चर ' या त्रैमासिकाच्या एप्रिल सन १९६३ च्या अंकात समद हुसेन रिझवी यांनी करून दिलेला आहे. या ग्रंथाची मूळ हस्तलिखित प्रत अहमदाबाद येथील मुहम्मदशाह यांच्या दर्ग्यात सुरक्षित असल्याचे लेखकाने सांगितले आहे.

अमीर खुस्रौ या दिल्लीकर पंडिताने (मृत्यू शक १२४७) आपल्या " नृह सिपिहर " या ऐतिहासिक महाकाव्यात एक अरबी पंडित वाराणसी येथे दहा वर्षे-पर्यंत संस्कृत भाषेचा अभ्यास करीत असल्याचे वर्णन केलेले आहे. इस्लामिक कल्चर, हैद्राबाद (शक १८७६, पृ. ४१०) या त्रैमासिकात डॉ. नजीर अहमद-

अलीगडकर याने " लहजाते सिकंदरशाही " या फार्सी भाषेत केल्या गेलेल्या संगीतशास्त्रविषयक अनुवादाची वाचकांना ओळख करून दिलेली आहे. हा ग्रंथ सिकंदर लोदी या दिल्लीकर बादशहाला अर्पण केलेला आहे. या सिकंदराचा काल शक १४११ ते १४३९ असा आहे. अनुवादक हम्माद याने १ संगीत रत्नाकर, २ नृत्य-संग्रह, ३ उद्भारत, ४ सुधानिधि, ५ संगीत समस्या, ६ संगीत कल्पतरू व ७ संगीत मातंग या संस्कृत ग्रंथाच्या आधारे आपल्या " लहजाते-सिकंदरशाहीची " निर्मिती केली आहे.

अकबर बादशहाच्या आदेशानुसार अबूलफजल याने पंचतंत्राचे " आय्यारे-दानिश " ( बुद्धीचा निकश ) या नावाने अनुवादन केले होते. परंतु या अनुवादाची फार्सी भाषा बोजड असल्यामुळे व अनुवाद बराचसा मुळाला सोडून झाल्यामुळे, अकबराने आपल्या उत्तर-कालात मुस्तफा खालिकदाद अब्बासी यांच्याकरवी पंचतंत्राचा " पंचाख्यान " नावाने आणखी एक अनुवाद करविला. हा अनुवाद शक १५३३ मध्ये पूर्ण झालेला आहे. ( पाहा- इस्लामिक कल्चर, जानेवारी सन १९६५ ).

दारा शिकोह ( जन्म शक १५३७–मृ. १५८१ ) याने ८–९ ग्रंथांचे अनुवाद फार्सी भाषेत केल्याची वा करवून घेतल्याची नोंद डॉ. विक्रमजित हस्रत यांनी इस्लामिक कल्चरच्या जानेवारी १९५१ च्या अंकात करून दिलेली आहे. अबुलफजल याने " नलदमयंती, " भास्कराचार्य-कृत " लीलावती " इत्यादींची केलेली अनुवादने सर्व-ज्ञातच आहेत.

वरील विवेचनावरून खुरासानची भूमी या प्रदेशात बौद्धधर्माचा आलेला हजार बाराशे वर्षांचा संपर्क व एकूण फार्सी भाषेची संस्कृत भाषेशी जवळीक दिसून येईल. दस्तुरे-उश्शाकचा लेखक फताही याने कृष्णमिश्राच्या प्रबोधचंद्रोदयाचा मागोवा घेतला तर त्याने अक्षुण्ण मार्ग चोखाळला असे कसे म्हणता येईल ?

• • •

## साभार - स्वीकार

# ज्ञानदेवींच्या दोन प्रतीं

● वि. मो. केळकर ●

ज्ञानदेवीच्या ज्या दोन प्रतींसंबंधी काही प्रथमच आणि नवीन विचार पुढे व्यक्त करण्यात येत आहेत त्या दोन प्रती म्हणजे एक राजवाडे-प्रत आणि दुसरी फाटक-प्रत या होत.

'ज्ञानेश्वरीची ओवीसंख्या' हा आमचा प्रबंध १९५६ साली प्रसिद्ध झाला. त्याच्या प्रस्तावनेत आम्ही म्हटले आहे की, प्रस्तुतचा प्रबंध पुष्कळ दिवस अर्धवट स्थितीत पडून होता. कारण राजवाडे-प्रतीशी अत्यंत साम्य असलेली, ज्ञानदेवीची दुसरी प्रत आम्हाला तोपर्यंत उपलब्ध झाली नव्हती. परंतु अशा प्रकारची एक अप्रकाशित, हस्तलिखित प्रत प्रा. न. र. फाटक यांच्या जवळ असल्याचे आम्हाला समजले. त्यांच्या कृपेने आम्हाला ती वाचावयास मिळाली, आणि म्हणूनच आम्ही तो प्रबंध पुरा करून प्रसिद्ध करू शकलो.

'ज्ञानेश्वरीची ओवीसंख्या' हा प्रबंध पूर्ण करावयास जसा आम्हाला त्या प्रतीचा उपयोग झाला तसाच 'ज्ञानेश्वरीचा अभ्यास भाग १ ला' या आमच्या पुढील पुस्तकातही आम्ही त्या प्रतीचा पुष्कळच उपयोग केला आहे; आणि आम्ही व प्रा. अरविंद मंगरूळकर यांनी सहकार्याने ज्ञानदेवीचे जे तिसरा, पाचवा, नववा आणि बारावा हे अन्वयार्थासह सटीप अध्याय प्रसिद्ध केले आहेत, त्या अध्यायांतही प्रस्तुत प्रतीचा आम्ही खूपच उपयोग केला आहे, हे त्या त्या अध्यायाच्या वाचकास माहीतच आहे.

प्रा. न. र. फाटक यांच्याकडून आम्हाला ती प्रत प्रथम उपलब्ध झाली म्हणूनच केवळ आम्ही तिला फाटक-प्रत ( फा-प्रत ) असे नाव दिले. परंतु वस्तुत: ती माडगांवकर-प्रतच होय. म्हणजे श्री. रामचंद्र विष्णू माडगांवकर यांनाच तिचे मूळ हस्तलिखित बीड-पाटांगण येथे प्रथम उपलब्ध झाले. त्यांनी त्या हस्त-लिखित पोथीची तेल्या कागदावर नक्कल करून ठेविली. ती नक्कल केलेली पोथी श्री. माडगावकर यांच्या चिरंजीवा-च्या संग्रही होती. ती त्यांनी त्यांच्या अंतकाली प्रा. न. र. फाटक यांस आपल्या घरी भेटण्यास बोलावून घेऊन त्यांच्या स्वाधीन केली. ही हकिगत आम्ही 'ज्ञानेश्वरी-ची ओवीसंख्या' या आमच्या प्रबंधाच्या एका परि-शिष्टात स्वच्छ नमूद केलेली आहे. तेव्हा त्या प्रतीला फाटक-प्रत असे नाव देण्यात आम्ही माडगांवकर यांचे श्रेय हिरावून घेतो व त्यांचेवर अन्याय करतो असे बिल-कुलच होत नाही. पण तसे करण्यात मात्र आम्ही प्रा. न. र. फाटक यांना--त्यांनी ती आम्हाला कृपया वाचा-वयास दिल्यामुळे—कृतज्ञताबुद्धीने न्याय करीत आहोत असे आम्हाला प्रांजलपणे वाटते.

अशी वस्तुस्थिती असता, राजवाडे-प्रतीची संशोधित आवृत्ती काढण्यासाठी नेमलेल्या संपादकमंडळाला ही गोष्ट मान्य झाली नाही. त्या मंडळाने फाटक-प्रतीला माडगांवकर-प्रत ( अप्रकाशित, हस्तलिखित ) असे नाव देऊन, माडगांवकर यांच्या मुद्रित-प्रतीला 'ज्ञानदेवी' या नावाने संबोधिले आहे. माडगांवकर यांनीही आपल्या मुद्रित प्रतीला 'ज्ञानदेवी' हे नाव दिलेले आहेच. परंतु त्यांनी 'ज्ञानदेवी' हे नाव जरी दिलेले असले तरी ती 'माडगांवकर-प्रत' या नावानेच सुपरिचित आहे, सर्वत्र ओळखिली जाते. 'ज्ञानदेवी' हे नाव सर्वत्र रूढ नाही. अशा परिस्थितीत माडगांवकर यांच्या दोन प्रती येथे उपपन्न होतात. हा घोटाळा टाळण्याकरिता मग प्रत्येक वेळी माडगांवकर हस्तलिखित प्रत आणि माडगावकर मुद्रित-प्रत असा खुलासा करावा लागेल. त्यापेक्षा माडगावकर.. हस्तलिखित प्रतीला आम्ही फाटक-प्रत हे जे नाव दिले आहे तेच कायम ठेविले म्हणजे हा नावाचा घोटाळा होणार नाही; आणि माडगांवकर-प्रत म्हणजे त्यांची मुद्रित 'ज्ञानदेवी' होय हे सहजच निष्पन्न होईल. शिवाय इतरही ग्रंथकार 'ज्ञानदेवी' म्हणूनच आपल्या आवृत्तींना संबोधितात. रा. हर्षे यांनी आपल्या पहिल्या अध्यायाला 'ज्ञानदेवी' हेच नाव दिलेले आहे. आम्हीही आमच्या विविध अध्यायांना 'ज्ञानदेवी' म्हणूनच संबोधितो. प्रा. वनहट्टी

यांनीही अलीकडेच प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या बाराव्या अध्यायाला ' ज्ञानदेवी ' हेच नाव दिलेले आहे. म्हणून ' ज्ञानदेवी ' या नावाने माडगांवकर मुद्रित-प्रतीचाच नेहमी निर्देश होईल असे नाही. सबब माडगांवकर हस्तलिखित प्रतीला फाटक-प्रत या नावाने संबोधणेच योग्य होईल असे आम्हाला वाटते; आणि वर म्हटल्याप्रमाणे तसे करण्यात माडगांवकर यांना अन्याय होईल असेही वाटत नाही.

फाटक-प्रतीत आम्हाला पुढे दर्शविल्याप्रमाणे वस्तुस्थिती आढळात आली. फाटक-प्रतीत प्रत्येक अध्यायाच्या आरंभी ' श्रीगणेशायनमः ' याच्या ऐवजी पुढील प्रमाणे योजना आहे.

| अध्याय | नमन |
|---|---|
| १ | श्रीगणेशायनमः । **श्रीजनार्दनगुरुभ्योनमः** । श्रीज्ञानमूर्तयेनमः । नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमं । देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥ १ ॥ |
| २-९ | ० |
| १० | ॐ नमो ' वासुदेवाय । श्रीमद्भवान्यैनमः । **श्रीजनार्दनगुरवेनमः** । श्रीराम ॥ |
| ११ | श्रीगणंजयायनमः । श्रीमद्भवान्यैनमः । **श्रीमज्जनार्दनगुरुभ्योनमः** ॥ |
| १२ | श्रीगणेशायनमः । |
| १३ | श्रीगणेशायनमः । **श्रीमज्जनार्दनगुरुभ्योनमः** । श्रीज्ञानमूर्तयेनमः ॥ |
| १४ | श्रीगणेशायनमः । **श्रीजनार्दनगुरुभ्योनमः** । श्रीभवान्यैनमः । श्रीकृष्ण ॥ |
| १५ | श्रीगणेशायनमः । **श्रीमज्जनार्दनगुरुभ्योनमः** । श्रीसच्चिदानन्दमूर्तयेनमः ॥ |
| १६ | श्रीगणेशायनमः ।··· । **श्रीमज्जनार्दनगुरुभ्योनमः** ॥ |
| १७ | श्रीगणाधिपतयेनमः । श्रीमद्रेणुकायैनमः । श्रीज्ञानदेवाय ॥ |
| १८ | श्रीगणेशायनमः । **श्रीजनार्दनगुरुभ्योनमः** । श्रीनिवृत्तिदासाय ज्ञानदेवायनमः ॥ |

फाटक-प्रतीत अध्यायाच्या अंती पुढीलप्रमाणे समर्पण-योजना आहे.

| | |
|---|---|
| १-९ | ० |
| १०-१७ | **श्रीमज्जनार्दनार्पणमस्तु** । |
| १८ | श्रीकृष्णार्पणमस्तु । |

फाटक-प्रतीतील वर उद्धृत केलेल्या वस्तुस्थितीवरून काय समजावयाचे ? आरंभ आणि अंत यांचे सूक्ष्मतेने अधिक पृथक्करण केल्यास असे दिसते की, २-९ हे आठ अध्याय आणि १२ व १७ हे दोन अध्याय वगळिता प्रत्येक अध्यायाच्या आरंभी जनार्दनगुरूंचा एकवचनी अथवा बहुवचनी निर्देश आहे. त्याचप्रमाणे १-९ आणि १८ हे अध्याय वगळिता प्रत्येक अध्यायाच्या अंती जनार्दनगुरूंना समर्पण केल्याची नोंदही आहे. फक्त येथे समर्पणात ' गुरु ' या पदाचा निर्देश नाही. परंतु त्या-त्या अध्यायाच्या आरंभी, नमनात ( अध्याय १२ व १७ हे दोन वगळिता ) त्या पदाचा एकवचनी अथवा बहुवचनी निर्देश असल्यामुळे येथे समर्पणातही तो आहेच असे मानावयास प्रत्यवाय नाही. अठराव्या अध्यायाच्या अंती तो अध्याय समाप्तीचा असल्यामुळे श्रीकृष्णाचा निर्देश असावा, हे उचितच आहे. आरंभ-नमन आणि समर्पण मुळीच नसण्यात २-९ हे आठ अध्याय एकविध आहेत. परंतु तसे ते त्या त्या अध्यायात का नसावे या शंकेला समाधानकारक उत्तर मिळत नाही. ज्या अध्यायांना आरंभ-नमन आहे त्यात फक्त दहाव्यात गणेशाचा निर्देश नाही; इतरत्र तो आहे. ' जनार्दना'चा श्रीकृष्णाशी संभ्रम होऊ नये म्हणून ' गुरु ' हे पद आरंभ-नमनात मुद्दाम योजिलेले दिसते. समर्पणात ते नाही पण वर म्हटल्याप्रमाणे तेथेही ते गृहीत केले पाहिजे. अर्थात जनार्दनाचा निर्देश ' गुरु ' या नात्यानेच करावयाचे तात्पर्य आहे. संख्येच्या दृष्टीने अधिकात अधिक उल्लेख ' गणेश ' आणि ' जनार्दन गुरु ' यांचे आहेत.

या संदर्भात पुढील काही विचार लक्षणीय वाटतात. जनार्दनस्वामी हे एकनाथांचे गुरू होत ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे, आणि वर दर्शविल्याप्रमाणे फाटक-प्रतीत त्यांचा अनेकवार आवर्जून निर्देश झालेला आहे. तसेच एकनाथांनीच ज्ञानेश्वरीचे ज्ञानेश्वरानंतर प्रथम संशोधन केले हेही सुप्रसिद्ध आहे. तेव्हा फाटक-प्रत जीवरून नकलली गेली ती प्रत एकनाथांची किंवा त्यांनी संशोधिलेल्या प्रतींपैकी एक असेल काय ? आणि म्हणून फाटक-प्रतीत वर निर्दिष्ट केल्याप्रमाणे अध्यायांच्या आरंभ-नमनात आणि समर्पणात जनार्दनगुरूंचे निर्देश केलेले असावेत काय ?

राजवाडे-प्रतीत फाटक-प्रती प्रमाणे जनार्दनगुरूंचे निर्देश नाहीत ही गोष्ट खरी; परंतु त्या दोन्ही प्रती बीड-

पाटांगण या एकाच मठात उपलब्ध झालेल्या आहेत. तसेच त्या प्रतींमध्ये विस्मयजनक साम्यही आढळते; इतके की, त्या जुळ्या वहिणी शोभाव्यात. यावरून त्यांचे उगमस्थानही एकच असावे. म्हणून राजवाडे-प्रत ही एकनाथांनी ज्ञानेश्वरी-संशोधनासाठी गोळा केलेल्या एखाद्या अगोदरच्या प्रतीवरून तर नकललेली नसेल ना? म्हणजे राजवाडे-प्रत ही नाथपूर्वकालीन (आणि म्हणून त्या प्रतीत जनार्दनगुरूंचे निर्देश नाहीत) आणि फाटक प्रत ही नाथकालीन म्हणजे नाथांची किंवा त्यांनी संशोधिलेल्या प्रतीवरून नकललेली (आणि म्हणून तीत जनार्दनगुरूंचे निर्देश आहेत.) परंतु दोन्हीही प्रती एकाच मूलस्रोतामधून, अर्थात पाठपरंपरेमधून थोड्याशा फरकाने प्रवृत्त झालेल्या आहेत, असे म्हटले तर ते चुकीचे ठरेल काय?

वर लिहिल्याप्रमाणे राजवाडे-प्रत ही एकनाथ पूर्व-कालीन आणि फाटक-प्रतही एकनाथकालीन ही विचारसरणी मान्य केली म्हणजे दुसरा एक निर्णय मान्य करणे प्राप्त होते. आणि तो हा की, राजवाडे-प्रत आणि फाटक-प्रत यांमध्ये अत्यंत साम्य असल्यामुळे, एकनाथांनी ज्ञानेश्वरीचे संशोधन करताना मूळ ज्ञानेश्वरीला बिलकुल धक्का लावलेला नाही. या दृष्टीने रा. चिं. ढेरे यांचे पुढील विवेचन यथार्थ वाटते. ते म्हणतात "त्यांनी (एकनाथांनी) ज्ञानेश्वरीच्या जुन्या प्रती मिळविल्या आणि त्या प्रतींचे शास्त्रीय निरीक्षण करून शुद्धपाठांची निश्चिती केली. ज्ञानेश्वरीच्या पाठशुद्धीत नाथांची दृष्टी परिष्करणाची किंवा स्वतःच्या काळाला अनुरूप अशा सुलभीकरणाची नव्हती. ज्ञानेश्वरांनी लिहिलेली ज्ञानेश्वरीच त्यांना लोकांपुढे ठेवावयाची होती. त्यांनी मूळ शब्दांच्या जागी नवे सोपे शब्द घातले किंवा नव्या ओव्या रचून घातल्या, ही समजूत चुकीची आहे. "ज्ञानेश्वरीचिये पाठीं। जो ओवी करील मऱ्हाठी। तेणे अमृताचिये ताटीं। जाण नरोटी ठेविली"॥ असे उद्गार काढणारे नाथ कोणत्या दृष्टीने ज्ञानेश्वरीकडे पाहात होते, याची कल्पना येते. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी की, पाठशुद्धी-संबंधीच्या नाथांच्या या ओव्याच नुसत्या गाजत राहिल्या आणि नाथांनी केलेली ज्ञानेश्वरीची शुद्धपाठावृत्ती प्रचारात आली नाही. आज एकनाथ मान्य समजल्या जाणाऱ्या सर्व प्रती एकनाथांना 'पाठांतरी अवद्ध' वाटलेल्या अशुद्ध प्रतींच्याच नकला आहेत. इतिहासाचार्य राजवाडे यांना मिळालेली ज्ञानेश्वरीची प्रत ही एकनाथांनी जमविलेल्या प्राचीन प्रतींपैकी एका प्रतीची नक्कल आहे, हे निश्चित पुराव्याने सिद्ध झालेले आहे. राजवाडे-प्रत ही नाथांच्या संग्रहातील प्रत आहे, आणि तिचा प्रसार आदरपूर्वक त्यांच्या एका परंपरेत होत राहिला, ही गोष्टच नाथांची यासंबंधीची भूमिका स्पष्ट करणारी आहे. ज्ञानेश्वरीच्या एकनाथ-पुरस्कृत पाठाची लोकप्रिय नक्कल झालीच नाही, ही एका अभ्यासकाने व्यक्त केलेली खंत यथार्थ आहे." रा. चिं. ढेरे यांच्या या उद्धृत केलेल्या विवेचनावरून असे निष्पन्न होते की, राजवाडे-प्रत ही एकनाथांनी जमविलेल्या प्राचीन प्रतींपैकी एका प्रतीची नक्कल आहे. मग फाटक-प्रत ही ज्ञानेश्वरीच्या एकनाथ-पुरस्कृत पाठाची नक्कल समजावयाची काय?

फाटक-प्रत माडगांवकर यांच्या चिरंजीवांकडून प्रा. न. र. फाटक यांना उपलब्ध झाल्यावर काही वर्षे ती त्यांच्याजवळ होती. पुढे मग ती प्रत राजवाडे-प्रतीची संशोधित आवृत्ती काढण्यासाठी नेमल्या गेलेल्या संपादक-मंडळाच्या हाती गेली. त्या संपादक-मंडळात कै. सोनोपंत दांडेकर, पंडित बाळाचार्य खुपेरकर, प्रा. न. र. फाटक, प्रा. प्रियोळकर आणि कै. वेलिंगकर या मोठ्या व्यक्तींचा समावेश होता. परंतु फाटक-प्रतीतील वर निर्दिष्ट केलेली वैशिष्ट्यपूर्ण वस्तुस्थिती त्यांपैकी कोणाच्याही निदर्शनास आलेली आमच्या ऐकिवात किंवा वाचनात नाही.

राजवाडे-प्रतीचे मूळ हस्तलिखित आज उपलब्ध नाही आणि पुढे केव्हातरी ते उपलब्ध होईल असे वाटत नाही. ते कोठे गेले आणि त्याचे काय झाले हे समजावयास काहीच मार्ग नाही. एवढे महत्त्वाचे हस्तलिखित गहाळ किंवा नष्ट व्हावे याचे आश्चर्य वाटून अतीव दुःख होते. ते उपलब्ध नसल्यामुळे राजवाडे-प्रतीवर अनेकांकडून नानाविध आक्षेप घेण्यात आले; परंतु फाटक-प्रत उपलब्ध झाल्यामुळे ते सर्व आक्षेप नष्ट झाले आणि राजवाडे-प्रतीला जोरदार पाठिंबा मिळाला. परंतु फाटक-प्रतीचीही ती जीर्ण-शीर्ण झाल्यामुळे दुर्दशा झाली आहे असे ऐकिवात येते; याचेही फार दुःख होते. ती चांगल्या स्थितीत असताना तिचे प्रतिमीकरण करून घ्यावयास पाहिजे होते. ज्यांच्याजवळ ती होती त्यांना सरकार दरबारी फार महत्त्व आणि मान होता. त्यांनी मनावर घेतले

असते तर ते त्यांना सहज साध्य होते असे आम्हास वाटते. परंतु तो योग नव्हता ही गोष्टच खरी.

राजवाडे-प्रत (आणि फाटक-प्रतही) सर्वस्वी निर्दोष आहे, तीत काही उणिवा, चुका, अपपाठ नाहीत असे आम्ही म्हणत नाही. परंतु विद्यमान प्रतीत जुन्यात–जुनी म्हणून ती राजमान्य आणि विद्वन्मान्य झाली आहे. आणि म्हणूनच महाराष्ट्र–शासनाने तिची सुधारित आवृत्ती काढली आहे. परंतु ती केवळ मूलमात्र आहे. आम्ही (मी स्वतः आणि प्रा. मंगरूळकर) महाराष्ट्र-शासनाच्या एक पायरी पुढे गेलो आहोत. म्हणजे आम्ही संपूर्ण राजवाडे-प्रतीचा अन्वयार्थ लिहून पुरा केला आहे आणि तो जगापुढे प्रकाशात येण्यासाठी कोणी प्रकाशक मिळतो किंवा काय याची वाट पाहात आहो. या वस्तुस्थितीमुळे राजवाडे-प्रतीचे भाषा, व्याकरण, शुद्धपाठ इत्यादी दृष्टींनी खरे महत्त्व आणि मूल्य आमच्या चांगलेच प्रत्ययास आले आहे. आणि म्हणून आम्ही निश्चयाने म्हणतो की, विद्यमान प्रतींत राजवाडे-प्रत हीच सर्व दृष्टींनी सरस आणि उजवी आहे.

कोणी काहीही म्हटले आणि कितीही नाक मुरडले तरी राजवाडे-प्रत ही नाथपूर्वकालीनच नव्हे, ज्ञानेश्वरांना जवळात–जवळच नव्हे तर ती ज्ञानेश्वरकालीनच असली पाहिजे असे मानावयास पाहिजे; आणि असे मानावयास बलिष्ठ पुरावाही मिळता. तो असा : महानुभावांचे सुप्रसिद्ध 'साती ग्रंथ'* आणि इतरही पुष्कळ वाङ्मय आता उपलब्ध झाले आहे. त्यांचा काळ जवळ-जवळ निश्चित आहे आणि तो, ज्ञानेश्वरीचा जो शके १२१२ हा काळ, त्याच्यात आगे-मागे असा आहे. राजवाडे–प्रतीची आणि महानुभाव ग्रंथाची भाषा यांमध्ये इतके विलक्षण साम्य दृग्गोचर होते की, ते सर्व ग्रंथ एककालीनच असले पाहिजेत असे मानणे प्राप्त होते. आणि म्हणूनच वर म्हटले आहे की, राजवाडे-प्रत नाथपूर्वकालीनच नव्हे, ज्ञानेश्वरांना जवळात-जवळच नव्हे, यादवकालीनच नव्हे तर ज्ञानेश्वर-कालीनच असली पाहिजे.

---

* 'साती ग्रंथः' १ शिशुपालवध : शक ११९५ कवीश्वर भास्कर ऊर्फ भानुभट वोरीकर. २ एकादशस्कंद : शक ११९६ : कवीश्वर भास्कर. ३ वत्सहरण : शक १२००: दामोदर पंडित. ४ रुक्मिणीस्वयंवर : शक १२१०: नरेंद्र कवी. ५ ज्ञानबोधः शक १२५३: विश्वनाथ वाळापूरकर. ६ सह्याद्रिवर्णनः शक १२५४: रवळोव्यास. ७ ऋद्धपूरवर्णनः शक १२८५ नारो व्यास ऊर्फ नारायण पंडित वहाळे.

ज्ञानेश्वर नामदेवांचा काल : ल. रा. पांगारकर पृष्ठ ४२७

• • •

## साभार - स्वीकार

**केशवसुत : काही दृष्टिकोन** –सु. गो. देशपांडे, महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर; ५ रु.

**अभंगसंहिता** –न्यायरत्न विनोद, संपादक व प्रकाशक प्र. रा. दामले, वाडिया कॉलेज, पुणे १; ५ रु.

**त्रिकालगीता** –संपादक ग. श्री. खैर, अ. वि. गृह प्रकाशन, पुणे २; १ रु.

# टिपणे

## शब्दवेध

ढिलेपणाने किंवा चुकीने शब्दांचा वापर करून पुढच्या पिढीच्या दृष्टीने ते टाकाऊ बनविणे हा भाषासंपत्तीचा अपव्यय म्हणावा लागेल. ज्यांना साहित्याबद्दल आस्था आहे त्यांना शब्दांच्या अर्थाचा नेमकेपणा व व्याप्ती याबद्दलही कुतूहल असणे स्वाभाविक आहे. शब्दार्थाविषयीच्या कुतूहलाचे स्वरूप व्युत्पत्ती शोधण्यापुरतेच मर्यादित नसते.

शब्दांच्या वापरासंबंधी चोखंदळपणा, शब्दार्थांच्या सूक्ष्म छटांची जाणीव हे भाषाभिरुची जिवंत असलेल्या समाजाचे एक लक्षण आहे. ही जाणीव वेगवेगळ्या रीतींनी प्रकट होत असते. 'नेत्रदीपक' हा शब्द चटकन लोकप्रिय होतो पण काही काळाने त्याची पीछेहाट होते. Evolution ला 'उत्क्रांति' म्हणायचे का 'विकास' असा वाद निर्माण होतो. 'मागोवा' 'साक्षेप' इत्यादी शब्दांचे पुनरुज्जीवन करावेसे वाटते. आणि पुष्कळ दिवस कळत नकळत विकल्पाने वापरलेले 'साहित्य' आणि 'वाङ्मय' या शब्दांच्या नेमक्या अर्थाबद्दल संभ्रम असल्याचे आढळते. मराठीचा जो महाकोश होईल त्यात अशा बाबींची नोंद व्यवस्थितपणे होणे अगत्याचे आहे. ही गोष्ट ध्यानात घेऊन या सदराचा प्रपंच करायचा आहे. 'आवा' 'कंडा,' 'आयू-व्हिटॅमीन' 'वैताग(वाडी)' यासारखे नवे नवे Slang शब्द ऐकू येतात. काही मागे पडतात. म्हणजे शब्द ही केवळ जतन करून ठेवण्याची वस्तू नाही तर भाषिक खेळाचेही ते एक साधन आहे हे यावरून समजेल. परंतु वर उल्लेखिलेला शब्दसंपत्तीचा अपव्यय आणि तात्पुरते खेळणे म्हणून बनविलेले आणि नंतर टाकून दिलेले शब्द यांत फरक आहे.

सध्याच्या काळात इंग्रजीसाठी मराठी प्रतिशब्द तयार करण्याकरता निरनिराळ्या समित्या निर्माण झालेल्या आहेत. त्या आपले कार्य करीत राहतीलच. पण मुद्दाम घडवायला बसल्यावर ठराविक वेळापत्रकाप्रमाणे तयार होणारे सर्वच शब्द समाधानकारक होत नाहीत असा आपणा सर्वांचा अनुभव आहे. असे शब्द वाचताना एखाद्याला सहजगत्या चांगले पर्यायी शब्द सुचतात. त्यांचा आपल्याला उपयोग होऊ शकेल. नवे मराठी शब्द घडविण्यापेक्षा मूळ इंग्रजी शब्दच वापरावेत असे म्हणणारा एक पक्ष आहे. परंतु या पक्षाचे पुरस्कर्तेसुद्धा luxury bus ऐवजी 'आराम गाडी' किंवा transition periodला 'संक्रमणकाळ' हे शब्द वापरले तर तक्रार करतील असे वाटत नाही.

अशा प्रकारची चर्चा महाराष्ट्र-साहित्य पत्रिकेमध्ये नियमित पद्धतीने एखाद्या सदराच्या स्वरूपात चालू व्हावी असे महाराष्ट्र-साहित्य परिषदेच्या भाषा-समितीच्या काही सभासदांच्या मनात आले. ह्या कल्पनेचे दृश्य-फल म्हणून हे निवेदन आणि डॉ. अशोक रा. केळकर ह्यांनी लिहिलेली तीन टिपणे पत्रिकेकडे पाठवीत आहे.*

**मु. ग. पानसे**
निमंत्रक, भाषा-समिति

(१)

## आर्ट्स्, कला, वाङ्मय, मानव्यविद्या

Arts शब्दाचा संगीत, चित्रकला आदी ललितकला (fine arts) हा अर्थ येथे अभिप्रेत नाही तर साहित्य, तत्त्वज्ञान, भाषा, इतिहास इत्यादी अभ्यासविषयांचा एक समूह हा अर्थ येथे अभिप्रेत आहे. (अमेरिकेत हा

*डॉ. पानसे ह्यांनी सुचविलेला उपक्रम स्वागतार्ह वाटतो. त्यानुसार ह्या अंकापासून 'शब्दवेध' हे सदर सुरू करण्यात येत आहे. त्यासाठी पत्रिकेच्या वाचकांनी शब्दविषयक घडामोडींची नोंद करणारी किंवा त्या घडामोडींना इष्ट त्या दिशेने चालना कशी द्यावी ह्याबद्दल सूचना करणारी टिपणे अवश्य पाठवावीत. स्वतंत्र मजकुराशिवाय संकलन करण्याजोगी शब्दचर्चा कोणाच्या वाचनात आली तर तीही मूळ संदर्भासह उतरवून पाठविण्यास हरकत नाही. मात्र केवळ व्युत्पत्तिविषयक टिपणे पाठवण्याची तसदी कृपया घेऊ नये. —संपादक

अनुक्रमणिका

फरक दाखवण्यासाठी पुष्कळदा liberal arts हा शब्दप्रयोग केला जातो. )

आर्ट्समध्ये केवळ साहित्याचाच अंतर्भाव होत नाही हे स्पष्ट आहे. पण इतर कशाकशाचा करावा ह्याबद्दल मात्र विद्यापीठीय व्यवहारात अनिश्चितता दिसून येते. मध्ययुगीन युरोपमध्ये Arts, Laws, Medicine, आणि Divinities ह्या चारच faculties विद्यापीठांमधून मानल्या जात. त्यांपैकी बाकीच्या तीन शाखांतून येत नाही ते सर्व ज्ञान असे Artsचे संमिश्र स्वरूप होते. ह्या शाखेसाठी कारणपरत्वे arts, humanities, philosophy, letters असे निरनिराळे पर्याय वापरले जात. ( अजूनही Doctor of philosophy हा शब्दप्रयोग जुन्या अर्थाने वापरला जातो. ) कालांतराने भौतिक विज्ञान (Natural sciences, Natural philosophy), ललितकला, वाणिज्य ( Commerce ), आणि अलीकडे सामाजिक विज्ञान (Social sciences) ह्यांचे संसार वेगळे थाटले गेले. इतिहास आणि अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान आणि मानसशास्त्र ह्यांची फारकत झाली. गणिताला तत्त्वतः Arts आणि Science ह्या दोन्ही शाखांत आणि व्यवहारतः Science शाखेत स्थान मिळाले.

' आर्ट्स् ' ह्या शब्दासाठी आज मराठीत एकच रूढ असा पर्यायी शब्द नाही. प्रथम-वर्ष, वाङ्मय; कला-शाखा असे शब्दप्रयोग सामान्यतः ऐकू येतात. पुणे–विद्यापीठ–पत्रिकेचे ज्ञानखंड ( Humanities Section ) आणि विज्ञानखंड ( Science and Technology Section ) असे दोन खंड पाडलेले आहेत. वाई येथे ज्या संकल्पित विश्वकोशाचे काम चालू आहे त्याच्या संपादनकार्याच्या मानव्यविद्या आणि विज्ञान व तंत्रविद्या अशा दोन कक्षा मानलेल्या दिसतात. ' कला–शाखा ' ही संज्ञा जेथे Faculty of Fine Arts खोलण्यात आली आहे अशा विद्यापीठात तर आणखीनच घोटाळा उत्पन्न करणारी आहे.

प्रथमच हे लक्षात घेतले पाहिजे की काही विचारपूर्वक निश्चित व्यवच्छेदक लक्षणे ठरवून केलेल्या वर्गवारीतून आलेली अशी arts ही संज्ञा नाही. ती ऐतिहासिक योगायोगातून सिद्ध झालेली एक गोष्ट आहे. वर उल्लेखिलेल्या निरनिराळ्या इंग्लिश संज्ञा ह्या उगमांकडे आपल्याला घेऊन जातात. Humanities म्हणजे मानवासंबंधी Secular विद्या; अध्यात्मविद्या Divinities. ह्याच्या उलट Philosophy म्हणजे ज्ञानाबद्दलची ओढ; व्यावहारिक उपयोगाचा त्यात विचार कमी. Letters म्हणजे लेखनाशी संबद्ध. Liberal arts म्हणजे Laws, Medicine, Divinities ह्यांच्याप्रमाणे विशिष्ट व्यवसायाशी निगडित नाही, आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र ( free ) अशा माणसाला अनुरूप अशा विद्या. Art चा मूळ अर्थ 'विद्या' ( art is long, life is short ), किंवा ज्यात विशेष कौशल्य लागते अशी गोष्ट (diplomacy is an art ); प्रस्तुत संदर्भात अर्थ, कोणतेही ज्ञान संपादन करायला आवश्यक अशी साधने–तर्कशास्त्र, व्याकरण, गणित आदी. मराठीत ह्या सर्व अर्थच्छटा एकवटतील असा शब्द मिळणे साहजिकच कठीण दिसते. पण ज्यात अव्याप्ती आणि अतिव्याप्ती हे दोष फार ठळकपणाने दिसणार नाहीत आणि इतर गोष्टींशी ज्यामुळे घोटाळा उडणार नाही असा शब्द मिळणे अवघड नाही. ' कला ', ' वाङ्मय ' ( किंवा ' साहित्य ' ), आणि ' ज्ञान ' ह्या शब्दांपेक्षा ' मानव्यविद्या ' हा शब्द निःसंशय सरस आहे आणि तोच रूढ करावा असे मला वाटते. जरूर तेथे ' विद्या ' हे पद संक्षेपासाठी गाळायला हरकत नाही; उदाहरणार्थ ' मानव्यशाखा '.



– २ –

## युनिव्हर्सिटी, विद्यापीठ, विश्वविद्यालय

भारतात अन्यत्र जरी ' विश्वविद्यालय ', हाच शब्द अजून रूढ असला तरी महाराष्ट्रात तो मागे पडून ' विद्यापीठ ' शब्द पुढे आलेला दिसतो. ( युनिव्हर्सिटी ह्या अर्थाने तो वापरण्याची कल्पना प्रथम कुठली ? नागपूर का महर्षि कर्व्यांचे महिलाविद्यापीठ का गुजरात ?) तक्षशीला, नालंदा, विक्रमशीला ह्या ठिकाणी युनिव्हर्सिटीसारख्या संस्था होत्या पण त्यांना ' विद्यापीठ ' किंवा इतर काही स्वतंत्र नाव होते असे वाटत नाही.

' गुरुकुल ' हा शब्द त्या मानाने University च्या मूळ अर्थाला अधिक जवळचा. University म्हणजे Universe विश्व ह्याचा अभ्यास करण्याचे केंद्र असे नसून University of masters and scholars ( विद्वान आणि विद्यार्थी ह्यांचा समाज, विद्याविश्व ) ह्या शब्दप्रयोगाचा तो संक्षेप आहे. University म्हणजे ' गुरु–शिष्य–कुल ' ! ' विश्वविद्यालय ' नव्हे.

आता मनात प्रश्न असा येतो की, आजची जी ' विद्यापीठे ' आपल्या समोर आहेत त्यांना ' समाज, ' ' कुले ' म्हणायला आपले मन माघार का घेते? ' युनिव्हर्सिटी'चे स्वरूप पश्चिमेकडेही बदललेले आहे. तिचा एकसंधपणा लोपत असल्यामुळे काहींनी थोड्या कुचेष्टेने multiversity हा शब्द वापरला आहे. पूर्वी मध्ययुगात विद्यापीठ म्हणजे त्याचे सदस्य-विद्वान आणि ( विद्यापीठात असेपर्यंत ) विद्यार्थी—हे बाकीच्या समाजापासून थोडे वेगळे पडत असत. आज दोघांनाही विद्यापीठाच्या बाहेरची व्यवधाने बरीच आहेत. दोघेही विद्यापीठे बदलू पाहतात. दोघांमध्ये एक दुरावा येऊ पाहात आहे. विद्यापीठाच्या निरनिराळ्या विभागांतही दुरावा आहेच. अर्थात ह्या सर्वांची इष्टानिष्टता ठरविण्याचे हे स्थळ नव्हे. शब्द तोच राहून आशय कसा बदलू शकतो एवढेच येथे दाखवायचे आहे.

– ३ –

## अनुवाद, भाषांतर

" अनुवाद आणि भाषांतर हे दोन शब्द अलीकडे समानार्थक म्हणून वापरण्यात येऊ लागले आहेत. काही वर्षांपूर्वी ह्या दोहोत थोडासा फरक करीत असत; आणि तो फरक योग्य होता असे माझे मत आहे. भाषांतर हे मूळ शब्दाला धरून असावे; म्हणजे त्याचा अर्थ तर अन्य भाषेत यावाच पण शिवाय मूळच्या भाषेची ढब, अवघडपणा किंवा सोपेपणा, मूळची वाक्यरचना आणि तिचे अंगभूत ढंग हे भाषांतरात उमटलेले दिसावे. पण अनुवादात मात्र मूळ लेखकाचा अभिप्राय पूर्णपणे व्यक्त झाला म्हणजे पुरे; बाकीची सारी किमया आपली असावी, असा एक स्थूल समज असे. परंतु, अलीकडे हा भेद मावळलेला आहे. सध्या भाषान्तरालाच अनुवाद म्हणतात आणि अनुवादालाच भाषांतर समजतात."

कै. श्री. म. माटे ह्यांनी आपल्या ' अनुवाद अथवा भाषांतर ' ह्या सुंदर निबंधाची सुरवात ह्या तक्रारीने केली आहे (विवेकमण्डन, पुणे : व्हीनस, १९५६, पृ. १३४). अलीकडे हा भेद मावळण्याची दोन कारणे मला दिसतात. एक हिंदीचा प्रभाव, पर्यायाने हिंदीच्या मार्फत बंगालीचा. ' राजमान्य राजश्री 'ला ' श्रीयुत 'ने ढकलून दिले ते याच पद्धतीने. (नाही म्हणायला रा. रा. भालचंद्र नेमाडे पहिल्याचा आवर्जून उपयोग करीत असतात!) दुसरे कारण भाषांतरकाराची आपल्याला ' भाषांतरकार' ( किंवा त्याहून वाईट ' भाषांतऱ्या ' ) म्हणवून घ्यायला नाखुषी; ' अनुवादक ' शब्द अधिक भारदस्त वाटत असावा! वास्तविक तसे म्हटले तर भाषांतरकाराची जबाबदारी नुसत्या अनुवादापेक्षा अधिक; त्याचे कौशल्यही कदाचित जास्त.

मला असे वाटते की, माट्यांनी सांगितलेला भेद पुनरुज्जीवित करण्यासारखा आहे. मी स्वतः तरी तो पाळतो, आणि मुख्य म्हणजे भाषांतरकाराचे स्थान कमी लेखत नाही!

—अशोक रा. केळकर

• • •

# परीक्षणे

## श्रीगणेशकोश

संपादक–अमरेन्द्र गाडगीळ; प्रकाशक–वोरा अँण्ड कंपनी, मुंबई २; पृ. ६७०, मूल्य रुपये तीस, १९६८.

ह्या मोठ्या अष्टपत्रीकाउन आकाराच्या ग्रंथाचे १ गणेशग्रंथ, २ गणेश-स्थाने, ३ गणेश-मूर्ति, ४ स्तोत्रादिसंग्रह, ५ उपासना-विधिविधाने, ६ युगायुगांतील स्थित्यंतरे आणि ७ संकीर्ण ( पेणचे अलीकडचे मूर्तिकार व त्यांच्या कोरण्या वगैरे मुद्धा ) असे सात खंड असून त्यात श्रीगणेशदैवतविषयक एकंदर उपलब्ध झालेली संपूर्ण माहिती (छापील, लेखी, ऐकीव) वर्गीकृत, सचित्र आणि ससंदर्भ देण्याचा प्रयत्न संपादक-प्रकाशकांनी आपल्याकडून साक्षेपाने केला आहे. ग्रंथामध्ये वारीक ठशातील इतक्या विविध प्रकारच्या मजकुराच्या पाठपुराव्याला ६२ रेखाचित्रे, १८२ छायाचित्रे ३ रंगीत भद्र ( देवतास्थापनेसाठी संकल्पावयाचे न्यासपीठ ), ४ गणेशयंत्र ( देवता-प्रतीक आकृती ) आणि श्रीरामसिद्धि-विनायकाचे दर्शनीय उत्कृष्ट तिरंगी चित्र असा वैभवशाली थाट आहे. तो पाहून कोणाही ग्रंथप्रेमी व्यक्तीचे नेत्र तृप्त होतील. मग गणेशदैवताची उपासना प्रिय असणाऱ्या भक्ताला ही अमोल पर्वणी वाटल्यास नवल नाही.

नामपृष्ठाच्या मागच्याच बाजूवर ‘श्रीगणेशकोश: इतिहास’ म्हणून दिला आहे. त्यावरून पाहता अगदी संकल्पापासून ह्या प्रचंड ग्रंथाच्या प्रकट प्रकाशनापर्यंतचे सगळेच्या सगळे सोपस्कार बरोबर ३६५ दिवसांत यथासांग पार पडले असे प्रकाशकांनी अभिमानाने नमूद केले आहे; त्याचेही कौतुक वाटल्याशिवाय राहात नाही. पण हा पहिला भर ओसरल्यावर ग्रंथाचे निरीक्षणाकडे वळले म्हणजे कांही निराळे विचार सुचणे अपरिहार्य होते.

थोडासा विचार केला तर ग्रंथाचे हे वैभव म्हणजे प्रकाशकाची किमया आहे; संपादकीय विद्वत्ता, विखुरलेल्या सामग्रीचे एकीकरण, व यांत्रिक मुद्रणामुळे सुलभ झालेली वेगवत्ता या सर्वांचे सूत्रीकरण करण्याच्या प्रकाशकाच्या संघटनविषयक सामर्थ्याला याहूनही प्रचंड कार्य अल्प कालात उभे करता येईल, हे कोणासही पटेल, परंतु त्या घणाघाईत, अशा ‘संदर्भोपयोगी’ म्हणावयाच्या ‘साधनग्रंथा’च्या गुणवत्तेत जी अक्षम्य वैगुण्ये उघड दिसतात त्याकडे वाङ्मय-समालोचकाने दुर्लक्ष करणे योग्य होणार नाही. कारण पूर्वीच्याच वर्षात समान ध्येयाचा व विस्ताराचा श्री. प्रभुदेसायांचा ‘देवीकोश’ ( अर्धा का होईना पण ) जनतेसमोर आलेला आहे. आणि ‘कलौ चण्डीविनायकौ’ या वचनाला अनुसरून चण्डी आणि विनायक आश्री पुढे आल्यावर राहिलेल्या दैवतांचा क्रम अनुकरणाने त्यांच्यानंतर लागण्याचा दाट संभव आहे.

प्रस्तुत कोशातील सातही खंडांची अनुक्रमणिका आरंभी एकत्र छापली असली तथापि प्रत्येक खंडाला स्वतंत्र पृष्ठांक दिले आहेत. यामुळे अपेक्षित वस्तु शोधून काढण्यासाठी पहिल्याने खंड व नंतर त्यांतील दृष्ट पृष्ठांक धुंडाळावे लागतात. खंडवार पृष्ठांक ठेवावयाचेच तर प्रत्येकाला स्वतंत्र अनुक्रमणिका हवी; खंड वेगळे बांधायला हवेत. नाही तर सर्व ६७० पृष्ठांक सलग छापले पाहिजेत.

अनुक्रमणिका ही सूचीचे काम केव्हाही करू शकणार नाही. अशा संकलनात्मक ग्रंथातील इतस्ततः विखुरलेले साहित्य वर्णानुक्रमाशिवाय शोधून काढण्याची आपत्ती म्हणजे द्रव्य देऊन ओढवून घेतलेली सक्तमजुरी होय.

संपादकांनी तरतमभाव न ठेवणाऱ्या संकलकाची नम्र भूमिका घेतली हे वस्तुस्थितिदर्शक सत्य म्हणून मान्य करून ग्रंथाचा स्वीकार केला, तथापि हें संकलन शुद्ध आणि यथार्थ पदरात पडावें अशी रास्त अपेक्षा कोणीही करील. आपल्या गणेश व इतरही दैवतविषयक संदर्भांमध्ये देववाणीतील संदर्भांचा भरणा पुष्कळच आहे. त्यातील मंत्रतंत्रातील शब्द न शब्द बिनचूक हवा. कानामात्रा देखील इकडची तिकडे होणे हे अनर्थकारक असेल, तर असले ग्रंथ पूर्वी निर्णयसागरने घालून दिलेल्या अनुकरणीय परंपरेप्रमाणे अगदी अचूक असले पाहिजेत. अतिविस्तृत शुद्धिपत्राची टोपली पदरात टाकली ( चारपाचशे अशुद्धे ) म्हणजे भरपाई झाली असे मानण्याने भावड्या

भक्तीने इष्टपूर्तीसाठी आपला आश्रय करणाऱ्यांची 'शास्त्रोक्त' फसवणूक होते.

दैवतोपासनेचे तंत्र आणि मंत्र मुद्रणामुळे सुलभ होतात. परंतु संप्रदायितांशिवाय नवशिक्यांना त्यात थोडेच गम्य असते. त्या दृष्टीने विधिविधानाच्या आविष्कारात अनेक पारिभाषिक शब्द 'पटल', 'कुट्टलविधि', 'स्थालीपाकविधि', (एवढेच काय पण 'पंचायतन', 'पंचखाद्य' सुद्धा) येतात. त्यांचा शब्दकोश सार्थ किंवा निदान ग्रंथातील संदर्भनिदर्शक पृष्ठांक देणारा (परिभाषाकोश) अपरिहार्यच आहे.

एवढया मोठ्या किमतीच्या ग्रंथसागरातून तरून जाण्यासाठी आणखी थोडीशी पाने विषयसूचीसाठी न देणे म्हणजे किल्लीशिवाय सामग्रीची ट्रंक भरपूर मूल्य घेऊन हवाली करण्यासारखे आहे. अलीकडे सूचिशास्त्र प्रगत झाले आहे. तितकी मजल न मारली तरी कांही उपकारक मर्यादेपर्यंत प्रकाशकांनी हात पुढे केलाच पाहिजे. संदर्भग्रंथांची नामावली हा एक केवळ सोपस्कार झाला आहे. तारतम्यदर्शक दृष्टी नसल्याने फडके-सातवळेकरांचे 'मंगलमूर्ति' 'बालगोष्टीं'च्या पंक्तीत बसले आहेत !

आणखी एक मुद्दा. मुद्रणाचे खिळे तयार करणारांनी मुद्रणाच्या ठाकठिकीत पुष्कळ प्रगती केलेली असली तथापि काही चिन्हांच्या बाबतीत अजून अपूर्णता राहून गेलेली आहे, असे अशा संदर्भग्रंथात हरघडी आढळून येणाऱ्या वैगुण्यांमुळे ध्यानात येते. विशेषतः पुनरुक्ती दर्शविण्यासाठी वापरावयाचे डिट्टो (,,) हे चिन्ह घ्या. ते ओळीत मधोमध बसावे असे घडविले पाहिजे. परंतु जोड अवतरण चिन्हांच्या जोडीतीलच वापरल्याने ते जरा खालीच दिसते. तीच गोष्ट ... या किंवा फुलीसारख्या अन्य चिन्हांची. संक्षेपदर्शक टिंब ओळीत मधोमध यावे. पूर्णविरामाप्रमाणे अक्षराच्या खालच्या टोकापाशी नको.

ह्या सर्व गोष्टी आज सर्वस्वी असंघटित म्हणून अनन्यगतिक झालेल्या वाचकाच्या खऱ्या हिताच्या आहेत. त्या घडवून आणल्या पाहिजेत. पाश्चात्त्य प्रगत देशात अशा गोष्टीसंबंधी प्रकाशकांना कौल लावण्यासाठी तेथील ग्रंथालयसंघ वगैरे संघटना जवळ जवळ तीस चाळीस वर्षे उद्योग करीत आहेत. आचारसंहिता बनवून प्रकाशकांकडून मान्य करून घेत आहेत. औद्योगिक उत्पादनातील प्रमाणीकरणा (स्टँडर्डायझेशन) प्रमाणेच, प्रकाशनाच्या त्याहूनही अधिक संस्कृतिपोषक क्षेत्रामध्ये, या प्रमाणीकरणाचे महत्त्व फार मोठे आहे. आणि ते संस्कृताच्या क्षेत्रात आणि विशेषतः संस्कृताशिवाय पानही न हालेल अशा दैवतकोशात किती आहे हे आवर्जून सांगण्याची आवश्यकता नाही.

ह्या गोष्टी सोडल्या तर यापूर्वी गणेशदैवतविषयक इतस्ततः विखुरलेली माहिती एकत्र करण्याचे फार मोठे काम प्रस्तुत कोशात साधले आहे. सर्व भाषांतील मुद्रित व हस्तलिखित मिळून एकूण सुमारे हजार (त्यात मराठी भाषेतीलच दोनशे) लहान मोठ्या ग्रंथांची नावे, त्यातील उपलब्धांचा कोशात उपयोग करून, येथे दिली आहेत. त्यावरून मानवी बुद्धीने या दैवताला केंद्र मानून चालविलेला बुद्धिविलास ध्यानात येतो. गणेशाबद्दल व त्याच्या उपासनेबद्दल वाङ्मयाचा एवढा विस्तार झाला याचाच अर्थ त्यामध्ये मूळ निश्चित सत्यतेच्या स्थिरबिंदूपेक्षा मानवनिर्मित पर्यायांनाच अधिक स्थान आहे. आणखीही माहिती उपलब्ध होईल ! यामुळे गणेशदैवताचा इतिहास हा एखाद्या चिरंतन एकमेव सत्याचा इतिहास नसून वेदकालापासून आजपर्यंतच्या प्रदीर्घ कालात वागविलेल्या व गाजविलेल्या दैवतोपासनेच्या पुरस्कर्त्या भिन्नभिन्न समाजांचा परिचय होय. तशा चिकित्सेला पुष्कळच अवसर असल्यामुळे या कोशग्रंथाचे स्वरूप संकलनात्मकच आहे आणि ज्ञानकोशासारखे निर्णायक नाही, किंबहुना होण्यासारखे नाही, हे उपकारकच म्हणावे लागेल. कारण अशाच परिस्थितीत त्यातील विधिविधानपद्धतीतून व्यक्त झालेले आहारोपचारातील विविध प्रकार, मूर्तींची वर्णने आणि प्रत्यक्ष मूर्ती वा चित्रे यांतील फरक आणि वैचित्र्य, गणेशानी या नावाचे स्त्रीस्वरूप, शिरविरहित गणपती, १४ हातांचे व विशिष्ट ध्यानांचे गणपती, डाव्याउजव्या सोंडेचे व अनेक सोंडांचे गणपती, इतिहासकालातील उत्सव, वासुदेव बळवंत फडके यांची उपासना, इत्यादी गोष्टींत केवळ भक्तांपेक्षा बहुसंख्याकांचें चित्त सहज रमू शकेल. अशा साधनसामग्रीच्या अलोडनाचा निष्कर्ष म्हणून शेवटी (खंड ६ पृ. ११) " सर्व पुरावे उपलब्ध असले तरी गणपतीचे आधुनिक स्वरूप कसे प्रगत होत गेले असावे, त्यातील प्रमुख टप्पे कोणते, हा यक्षप्रश्नच उरतो " हा यामुळेच स्वीकार्य आणि आव्हानात्मक वाटतो.

दि. वि. काळे

• • •

**१. विविध ज्ञान विस्तार लेख-सूचि** – संकलक : सौ. पुष्पा भावे, श्री. शं. ग. दाते सूचिमंडळ प्रकाशन २२, किंमत सहा रु. **२. ज्ञानदेव वाङ्मय-सूचि**— संकलक : डॉ. मधुसूदन परशुराम पेठे, श्री. शं. ग. दाते सूचिमंडळ प्रकाशन ३ २, किंमत वीस रु. दोहोंचे प्रकाशक : प्रमुख कार्यवाह, मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय, मुंबई १४.

मराठी ग्रंथविश्वात अलीकडे वाढीस लागलेल्या संदर्भ-वाङ्मयप्रकाशनाच्या उपकारक प्रथेची उदाहरणे म्हणून वरील दोन सूचि-पुस्तकांची दखल अभ्यासकांना घ्यावी लागेल. सर्वसामान्य वाचकांना त्यांचे महत्त्व वाटणार नाही; परंतु विशिष्ट विषयांचा अभ्यास करणाऱ्यांना त्यांचे दर्शन, त्यांची रचनापद्धती, त्यांचा विस्तार आणि त्यांच्या द्वारा सुलभ होणारे ज्ञान यांबद्दल कुतूहल वाटल्याशिवाय राहणार नाही. प्रस्तुत दोन प्रकाशनांपैकी पहिल्यात म्हणजे विविधज्ञानविस्ताराच्या सूचीत त्या लोकविख्यात मासिकातील लेखांची एकूण ३६ विषयांत विभागणी करून प्रत्येक लेखाचे वर्ष, अंक व पृष्ठ असा तपशील देणारी यादी दिलेली आहे. लेखाचे शीर्षक किंवा लेखकाचे नाव यांतून दोहोंची किंवा कोणत्या एकाचीही अक्षरविल्हेवारी साधण्याचा प्रयत्न केलेला नसून, विषयाच्या पोटात लेखांची नावे कालानुक्रमाने दिलेली आहेत. म्हणजे काव्य या विषयाखालील कविता प्रथम पहिल्या पुस्तकातील, नंतर दुसऱ्या पुस्तकातील ( अर्थात् त्या त्या पुस्तकाच्या अंकवारीने आणि अंकात पृष्ठवारीने ) अशा हारीने छापलेल्या आढळतात. एखादा लेख नक्की केव्हा प्रसिद्ध झाला हे समजण्याचे प्रत्यक्ष साधन काही नाही !

प्रस्तुत दुसरे ( मालेतील तिसरे ) प्रकाशन ' ज्ञानदेव वाङ्मयसूचि ' या सूचीमध्ये वरील विविधज्ञानविस्ताराच्या सूचीपेक्षा अधिक साक्षेपाने आणि तपशिलाने ज्ञानदेव-वाङ्मयाचा परिचय करून दिलेला आहे. त्याबद्दल आणि त्याच्या सुसंबद्ध शास्त्रीय रचनेबद्दल तारीफच करावी लागेल.

ही दोन्ही पुस्तके चाकोरीबाहेरची असली तथापि त्यांचे महत्त्व फार मोठे आहे.

कोणत्याही विषयाचा अभ्यास करणाऱ्या वाङ्मयोपासकाला, अनेकविध विषयांची गंगोत्री म्हणून, ' विविधज्ञानविस्तारा'च्या बंदिस्त मंजूषेचा मागोवा जसा घेतलाच पाहिजे, तसाच भारतीय तत्त्वज्ञानाच्या उगमावरील ज्ञानेश्वरी, ह्या भाष्यग्रंथाच्या जनकाचे नाना प्रकारांनी निरीक्षण, परीक्षण आणि दर्शन घडविणाऱ्या अमाप साहित्य-संपदेचा परामर्श देखील घेतला पाहिजे.

कोणाही चोखंदळ अभ्यासकाला, आणि खरा अभ्यास संशोधनाशिवाय यथार्थ ठरत नाही म्हणून कोणाही ' संशोधका'ला, असा परामर्श आपआपल्यापुरता घ्यावा लागतो; सरळ मुद्रित किंवा हस्तलिखित स्वरूपात माहिती उपलब्ध नसली तर स्वतःची यादी, सूची एकहाती तयार करावी लागते. आणि मग त्या यादीची गुणवत्ता कोणाच्या नजरेत भरून तिला सर्वोपयोगी असे मुद्रित स्वरूप प्राप्त होते. रियासतकार सरदेसाई यांच्या प्रचंड इतिहासलेखनकार्याच्या अनुषंगाने त्यांनी स्वतः, कै. आपटे, शेजवलकर, वाकसकर अशांच्या साह्याने, काही नियतकालिकांतील व इतर ग्रंथांतील संदर्भ एकत्र केले आणि ते १९२४ व १९२५ च्या सुमारास श्रीमंत औंधकरांनी व बडोद्याच्या सहविचार-कर्त्यांनी पुस्तिकारूपाने छापले. माझी स्वतःची महाराष्ट्रातील किल्ल्यांची यादी अशीच १९२७ च्या ' शिवाजी सुव्हनीर ' मध्ये छापली. तसे पाहिले तर हे जुजबी प्रयत्न ( १ ) आद्य ग्रंथसूचिकार न्यायमूर्ती रानडे यांच्या ( सर अलेक्झांडर ग्रँटच्या हुकुमाने प्रसिद्ध झालेल्या ) डिसेंबर १८६४ अखेरच्या ' कॅटॅलॉग ऑफ नेटिव्ह पब्लिकेशन्सशी ', ( २ ) ज्ञानकोशासाठी तयार झालेल्या बऱ्याच मोठ्या ग्रंथांच्या व लेखांच्या १९१९ तील वाङ्मयसूचीशी, वा (३) कार्यमाहात्म्याने ऋषिपदाला पोचलेल्या श्री. शंकरराव दाते यांच्या प्रचंड द्विखंडी २३,००० ग्रंथांच्या चक्षुर्वै सत्यं यादीशी पासंगाला देखील पुरणारे नाहीत. दाते-सूची चाळून पाहिली तर आणखी असे कित्येक, नामांकित प्रयत्न म. म. पोतदारां-सारख्या जिद्दीच्या व्यक्तींनी आपले स्वतःचे व इतरांचे संग्रह कामाला लावून केलेले आढळतील. परंतु अशा वैयक्तिक प्रयत्नांचे कौतुक करण्याचा एकमेव प्रभावी मार्ग म्हणजे अशा प्रयत्नांचे चिरंतन महत्त्व ओळखून त्यांना जाणीवपूर्वक उत्तेजन देणे आणि त्यातील तांत्रिक, रचनात्मक, निर्दोष प्रकाशनपद्धती विकसित करवून त्याप्रमाणे योजनाबद्ध प्रकाशने करविणे.

कै. दाते यांच्यापासून स्फूर्ती घेऊन नुकत्याच कामाला लागलेल्या सूचिमंडळाने अर्ध्यापाऊण वर्षांच्या आत प्रस्तुत दोन आणि खुद्द शंकर गणेश दाते यांचे

स्वतःचे, [ लोकवाङ्मयांतील श्रेष्ठ अधिकारी व्यक्ती पंडिता दुर्गाबाई भागवत यांनी 'अशास्त्रीयतेच्या संपर्कापासून सर्वस्वी मुक्त' म्हणून गौरविलेले 'लोककथा' हे पहिले ] अशी एकूण तीन प्रकाशने जनतेच्या पदरात घातली आहेत. हे त्यांचे कार्य नवा उपकारक पायंडा पाडणारे आहे.

सौ. पुष्पा भावे आणि डॉ. मधुसूदन परशुराम पेठे या दोघांच्याही प्रस्तुत सूच्या त्यांनी आपआपल्या प्रबंधांच्या पूर्ततेसाठी परिश्रमपूर्वक तयार केल्याचे सांगितले आहे; त्यावरुन अशा सूच्यांच्या निर्मितीचे वर सुचविलेले कारण बहुतांशी खरे ठरते, हे ध्यानात येईल. उभयतांच्या प्रबंधांचे स्वरूप त्यांच्याकडून समजून घेता आले म्हणजे त्या त्या संदर्भात त्या त्या सूचीच्या गुणवत्तेचे मोजमाप घेणे निरीक्षकाला सुलभ होणार आहे.

डॉ. मधुसूदन पेठे यांच्या प्रबंधाचे नाव 'ज्ञानदेव ( विषयक ) व ज्ञानेश्वरीविषयक अभ्यासाचे ऐतिहासिक समालोचन' असे आहे. १९६६ मध्ये आपला प्रबंध सादर केल्यानंतरदेखील प्रकाशनापर्यंतच्या पुढील वर्ष दीडवर्षात मुळात पडलेली भर दाखवून डॉ. पेठे यांनी त्यांना आरंभापासून उपलब्ध झालेल्या ग्रंथलेखादींचे संपूर्ण वाङ्मयवर्णन तर सूचीत केलेच आहे; पण त्याबरोबरच प्रत्येक संदर्भाचे स्वरूप बऱ्याच निःसंदिग्ध पणे विशद करून, कोणत्या मुद्यावर, कोणत्या लेखकाने कोणत्या काळी कोणते मत व्यक्त केले होते, याचे ज्ञान करून घेण्याचे साधन निर्माण केले आहे. स्थल, काल आणि व्यक्ती या तीन पेडांनी घटना पूर्ण होत असतात, याचे इतके तारतम्य डॉ. पेठे संदर्भसाह्यपटुत्वामुळे सुसंघटित स्वरूपात व्यक्त करू शकले, यात शंका नाही; तथापि त्यांच्यातील संशोधक हाच येथे प्रभावी ठरला आहे, हे त्यांच्या नेमक्या सारांशावरून आणि मतभेद व्यक्तविणाऱ्या टिपणांवरून निर्विवाद सिद्ध होते. डॉ. पानसे यांची स्फूर्ती व श्री. दाते यांचा आदर्श पुढे ठेवून, आणि मर्यादित क्षेत्र निवडल्यामुळे शक्य झालेली विपुल तपशील देण्याची संधी योग्य प्रकारे घेऊन, डॉ. पेठे यांनी, सूचिप्रकाशन-क्षेत्रात केलेल्या ह्या प्रगतीच्या मागे एखादे पाऊल जाण्यास आता यापुढे चोखंदळ अभ्यासक तयार होणार नाही.

ग्रंथ आणि लेख या दोन्ही संदर्भांना एकरूप तत्त्वे लावून दाखवून आपली सूची डॉ.पेठे यांनी सिद्ध केली आहे. एका अर्थाने त्यांनी खुद्द सूचि-मंडळाच्या आगामी लेखसूचीचा मार्ग चोखाळून दिला आहे, हे या सूचीचे तेवढ्यापुरते वैशिष्ट्य मानावे लागेल. सुमारे दोन हजार ग्रंथांचे व मासिकादी वाङ्मयखंडांचे संदर्भ आणि संदर्भकोशातील बावीस चोवीसशेच्यावर अक्षरविल्हेवारी नोंदी, यांच्या साह्याने "कोठे ना कोठे तरी अभ्यासकाची अक्षरविल्हेवारीशी गाठभेट करून दिल्याशिवाय गत्यंतर नाही" हा संदर्भसूचीचा अटळ दंडक डॉ. पेठे यांनी पाळला आहे.

सूचिमंडळाच्या प्रस्तुत दोन्ही सूच्यांच्या संकलकांना कै. शंकरराव दाते यांच्या श्रेष्ठ कार्याचा परिचय आणि त्यांचे मार्गदर्शन ही दोन्ही समान लाभली असूनही या दोहोंत काही विभिन्नता दिसत असेल तर तिचे कारण अन्य परिस्थितीत शोधावयास हवे. विस्ताराच्या सूचि-लेखिकाच्या प्रस्तावनेतील पुढील विधान सूचक वाटते:– "प्रस्तुत सूची ही 'प्रबंधा'ला पूरक आहे; यामुळे ( १ ) विस्ताराच्या प्रकाशनाचा तपशील व ( २ ) विस्तारातील त्या त्या विषयांवरी लेखाचे कर्तृत्व ह्या दोन समकालीन वाङ्मयेतिहासाच्या अभ्यासकाला अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी सूचीत दिलेल्या" नाहीत. "त्यांची प्रबंधात चर्चा होईल." या त्रुटीमुळे वाचकाला सहजासहजी ( सूचिकाराच्या अभ्यासाच्या मर्यादेपर्यंत देखील ) त्या गोष्टी विचारात घेता येणार नाहीत. ही अपूर्णता कोणत्याही ग्रंथाच्या केवळ परिशिष्टालाच फक्त शोभण्यासारखी आहे. वाङ्मयेतिहासाच्या अभ्यसकाला त्या इतिहासाचे 'सूत्र' विविधज्ञान-विस्तारातील लेखांशी 'जोडावे लागते' हे मान्य केले म्हणजे त्या त्या विचारांची व्यक्त कालसंगती लावण्याचे साधन सरळ सरळ उपलब्ध करून देण्याची खबरदारी सूचिकारांनी घ्यावयास पाहिजे होती. ती जबाबदारी अटळ आहे. विस्ताराचे उपलब्ध खंड वर्षवार बांधलेले असले तथापि त्या त्या वर्षाचे साल काढता येण्यासारख्या सुलभ कोष्टकासाठी जागा काढावयास तसे कठीण नव्हते. त्या प्रकारचे कोष्टक नाही तर मग पाच दहा ओळीत मार्गदर्शक तपशील तरी देता आला असता. तो कोठेही दिलेला नाही.

'विविधज्ञानविस्तार' लेखसूची हा एका विशिष्ट नियतकालिकाचा परिगणनात्मक परिचय ( साधन-ग्रंथ ) आहे. याच उद्देशाने कमीअधिक तपशिलाचे,

'ज्ञानोदयाची शंभर वर्षे' (१८४२), 'दर्पण' (१८३२), 'मराठी ज्ञानप्रकारक' (१८५०–१८६६) असे एकेका नियतकालिकाचे वर्णन-ग्रंथ यापूर्वी साक्षेपी लेखकांनी जनतेला सादर केले आहेत. त्यांचा आणि प्रस्तुतच्या लेखसूच्यांचा एकत्र तुलनात्मक विचार कोणालाही सहज सुचेल. प्रस्तुत लेखसूचीरूप जंत्रीपेक्षा नियतकालिकांच्या अंतरंगाची झलक कळण्याचा वस्तुनिष्ठ प्रकार म्हणून तो प्रत्यक्ष उतारे देणारा नमुना स्वागतार्ह वाटला तर त्यात नवल नाही. डॉ. पेठे यांची कारणापुरती सारांश देण्याची चोखंदळ पद्धती ही संशोधनविषयाच्या अंतरंगात निर्वेध प्रवेश घडविणारी महत्त्वाची पायरी होय. सौ. भावे यांच्यासारखी ३३००, ३४०० लेखांची संपूर्ण 'जंत्री' म्हटली तरी ती केवळ निर्जीव असता कामा नये. प्रबंधलेखकाने अंतरंग-परिचयाला उपकारक होईल असे सूचक वर्गीकरण संकल्पिले पाहिजे. आपण जेव्हा सौ. भावे यांच्याप्रमाणे स्वतःच्या अभ्यासासाठी म्हणून सलग जंत्री तयार करतो तेव्हा त्या त्या लेखांतील विषयाचे भान आपण कारणापुरते मिळविलेले असते, ते आपल्या प्रबंधाच्या योजनेत कोठे कसे वापरावयाचे याची व्यवस्था डोक्यात तयार असते, आणि त्या योजनेला अनुकूल असे आपले समर्पक वर्गीकरण कागदावर उतरत असते. ते आपल्या प्रबंधाला अनुकूल असणे हाच आपल्या अभ्यासाचा स्वाभाविक परिपाक होय. ही आपल्या प्रबंधाची योजना आपण जितकी स्पष्ट करू तितका आपला वाचकवर्ग आपल्या योजनेशी समरस होईल. नाही तर तो आपल्या ज्ञानाच्या पार्श्वभूमीवर फिरून नवी व्यवस्था करील, मागेल, सुचवील. प्रस्तुत सूची तशी सावधपणे रचण्यास पुरेसा वेळ दिलेला दिसत नाही. विविधज्ञानविस्तारासारख्या नव्या जुन्या तीन पिढ्यांचे प्रतिनिधित्व केलेल्या नियतकालिकाचे दर्शन अनेक प्रकारे आणि अनेक ढंगांनी करता येण्यासारखी, थोडी का होईनात पण, चर्चात्मक साधने सुदैवाने उपलब्ध आहेत; त्यांचा उपयोग सूचीकारांना केव्हाही महत्त्वाचा वाटावा.

अशा प्रकारे साधकबाधक तात्त्विक चर्चा करून अशा चाकोरीबाहेरच्या विशिष्ट प्रकारच्या प्रकाशनांचे सर्वसंमत म्हणजे शास्त्रपूत दंडक कटिबद्ध दातेसूचिमंडळाला निर्माण करावे लागतील.

प्रकाशनात विशिष्टीकरणाचे स्थान मोठे आहे. आणि तरीदेखील निरनिराळ्या संस्थांमध्ये आपल्या मातृभाषेच्या उन्नतीसाठी सहकार्याला किती तरी अवसर आहे. समाजातील सत्प्रवृत्तीच्या सिद्धीकरिता मंडळीकरण हा अत्यंत यशस्वी मार्ग सर्वत्र याहून वेगाने अवलंबिला गेला पाहिजे. आणि प्रथम संग्रह आणि मग प्रकाशन या क्रमाने वाङ्मयसमृद्धी साधली पाहिजे. या संदर्भात 'अल्पमप्यस्य धर्मस्य' हे तत्त्व महत्त्वाचे असले, तथापि सविस्तर, ससारांश, अशा सूच्यांनी तरी वाङ्मयाभ्यासकांचे खरे समाधान होते का, हा प्रश्न विचारात घ्यावयास हवा. सूच्यांचे दालन कितीही समृद्ध झाले, तथापि त्यांच्या द्वारा प्रत्यक्ष त्या वाङ्मयाचे दर्शन घेण्याची उत्पन्न होणारी जिज्ञासा भागविणारे संपूर्ण सुव्यवस्थित संग्रह अस्तित्वात आल्याशिवाय असल्या सूच्या म्हणजे केवळ ज्ञानकीर्दीच्या (पण कीर्दीविरहित) खतावण्या बनतील! सर्व वाङ्मयाचे पुनर्मुद्रण हा पर्याय म्हणजे आपल्या देशाला न परवडणारी चैनच होय. तेव्हा सूची-प्रकाशनाच्या जोडीला उत्कृष्ट प्रकारचे संग्रह निर्माण करणे ही नानाविध संस्थांची, मंडळांची व शासनाची जबाबदारी असून तिचाही सतत पाठपुरावा करीत राहिले पाहिजे. 'दाते सूचिमंडळा'चा पुरस्कार करणारे मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय ही त्या दृष्टीची योजनापूर्वक कार्यवाही करणारी आज तरी एकमेव अशी व्यापक ध्येय बाळगणारी सुप्रतिष्ठित आणि समृद्ध संस्था आपल्या महाराष्ट्रात आहे, हे महाराष्ट्राचे हेवा करण्यासारखे भाग्य आहे.

दि. वि. काळे

• • •

## मानवेन्द्रनाथ रॉय

ले. द्वा. भा. कर्णिक, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४, ५ रु.

मानवेन्द्रनाथ रॉय यांचे जीवन हे एक अद्भुत महाकाव्य होते. कृती आणि विचार यांची उत्तुंग शिखरे हे रॉय यांच्या जीवनाचे वैभव. श्री. द्वा. भ. कर्णिक यांनी रॉय यांची जीवनकथा उचित पद्धतीने लिहिली आहे. विविध अनुभवांतून जात असताना सत्याचा शोध घेणे हे रॉय यांचे वैशिष्ट्य होते. दहशतवादाकडून मार्क्सवादाकडे आणि मार्क्सवादाच्या पलीकडे जाऊन माणुसकीच्या शोधासाठी रॉय यांनी केलेली धडपड श्री. कर्णिक यांनी बहारीने चित्रित केली आहे. हे करीत असताना, 'एका

अनुयायाने वाहिलेली श्रद्धांजली' अशी त्यांनी आपली भूमिका स्पष्ट केली आहे. ही भूमिका मान्य केल्यावर म. गांधी, पं. नेहरू, सुभाषचंद्र बोस यांच्याशी तुलना करताना लेखक रॉय यांनाच श्रेष्ठ ठरवितो याचे आश्चर्य वाटत नाही. पण श्री. कर्णिक यांच्यासारख्या चिकित्सक लेखकाकडून यापेक्षा माझी अधिक अपेक्षा होती. रॉय यांच्याजवळ कठोर आत्मपरीक्षण करण्याचे सामर्थ्य होते. श्री. कर्णिक यांच्या मनावर मात्र रॉय यांचे जीवन परिपूर्ण होते, या कल्पनेचा इतका जबरदस्त पगडा बसला आहे की, ते रॉय यांच्या कोणत्याही कृतीचे कठोर परीक्षण करू शकत नाहीत. मात्र असे असूनही या चरित्राला भावडेपणाचा स्पर्श होत नाही. याचे कारण श्री. कर्णिक यांना रॉय यांची भूमिका मनोमन पटली असून, चिंतनशील वृत्तीने त्यांनी हे लेखन केलेले आहे. श्री. कर्णिक यांची भाषाशैली चिंतनशील लेखनाला अनुरूप आहे.

ग. प्र. प्रधान

• • •

## राममनोहर लोहिया

ले. इंदुमती केळकर, रुचि प्रकाशन, पुणे २; १५ रु.

डॉ. राममनोहर लोहिया हे एक प्रतिभासंपन्न विचारवंत आणि प्रक्षोभक व्यक्तिमत्त्वाचे झुंजार नेते होते. श्रीमती इंदुमती केळकर यांनी डॉ. लोहियांच्या संघर्षमय जीवनाचा बारकाईने अभ्यास करून 'राममनोहर लोहिया' हा चरित्र ग्रंथ लिहिला आहे. १९३० ते १९६६ या भारतीय राजकारणातील तीन तपांचे दर्शन लोहियांचे हे चरित्र वाचताना घडते. डॉ. लोहियांच्या मनाची घडण कशी झाली, कोणत्या विचारांकडे ते त्यांच्या जीवनातील पूर्वावस्थेत आकृष्ट झाले, महात्माजींच्या नेतृत्वाचा त्यांच्या झंजावाती व्यक्तिमत्त्वावर कसा परिणाम झाला, हे श्रीमती केळकर यांनी मार्मिकपणे विशद केले आहे. डॉ. लोहिया यांचे विविध प्रश्नांवरील स्वतंत्र विचार आणि नवी आंदोलने निर्माण करण्याचे त्यांचे सामर्थ्य यांचा नेटका परिचय या चरित्रात करून दिलेला आहे. " रचनेशिवाय संघर्ष म्हणजे क्रियापदाशिवायचे वाक्य " किंवा " प्रत्येक क्षण महाकालप्रवाहात एक दुवा आहे. पण तो स्वतः-देखील शाश्वत आहे. क्षणांचे हे द्विविध रूप विसरल्यामुळे भौतिक व आध्यात्मिक असे खोटे द्वंद्व निर्माण झाले आहे. " —यांसारखी डॉ. लोहियांची अनेक प्रक्षोभक वाक्यें या चरित्रात विखुरली असल्यामुळे ते अतिशय वेधक झाले आहे. डॉ. लोहियांच्या जीवनातील महत्त्वाच्या घटनांचे वर्णनही लेखिकेने तपशीलवारपणाने केले आहे.

हे सर्व गुण मान्य केले तरी मराठीतील चरित्र-वाङ्मयात आढळणारा विभूतिपूजेचा दृष्टिकोण या चरित्रातही ठायी ठायी आढळून येतो. या वृत्तीमुळे डॉ. लोहियांच्या सर्वच कृतींचे व विचारांचे समर्थन श्रीमती केळकर करतात. चरित्रलेखकाने विषयाशी समरस झाल्याशिवाय चरित्राला रसाळपणा येत नाही, त्याचबरोबर चिकित्सक वृत्तीने चरित्रनायकाच्या जीवनाचे विश्लेषण केल्याशिवाय सत्यदर्शनाचा खरा आल्हाद वाचकाला मिळत नाही. श्रीमती केळकर या डॉ. लोहियांच्या विचाराने व व्यक्तिमत्त्वाने इतक्या प्रभावित झाल्या आहेत की, त्या चिकित्सक दृष्टीने लोहियांच्या विचारांकडे वा कृतींकडे पाहू शकत नाहीत; ही या चरित्रग्रंथाची मोठी मर्यादा!

ग. प्र. प्रधान

• • •

## लीळाचरित्र [एक अभ्यास]

ले. व. दि. कुलकर्णी, व्हीनस प्रकाशन, पुणे १९६७ पृष्ठे १०+८८, मूल्य ४ रु.

आजपर्यंत लीळाचरित्राचा अभ्यास झाला तो त्याच्या संहितेच्या ज्या आवृत्त्या काढल्या गेल्या त्यांच्या त्रोटक प्रस्तावनांमधून किंवा त्यात आलेल्या सामाजिक व सांस्कृतिक माहितीचे संकलन म्हणून. चक्रधरांच्या तत्त्वज्ञानाचा मागोवा घेण्याचा किंवा त्यांचे व्यक्तिमत्त्व अजमावण्याचाही प्रयत्न झाला. मराठी गद्यरचनेचा आद्य ग्रंथ म्हणून लीळाचरित्र हा मराठी-वाङ्मयाचा भक्कम पाया आहे. त्याची वाङ्मयीन महत्ता स्वतःसिद्ध आहे. त्यातले गद्यशैलीचे बरेचसे नमुने ठसठशीतपणे नजरेस भरणारे आहेत. परंतु वाङ्मयीन मूल्य आणि साहित्याचे सौंदर्य यांचा रसिकवृत्तीने आस्वाद घेणारे सर्वांगस्पर्शी परिशीलन अजून झालेले नाही. शिवाय "महानुभावीय वाङ्मयाचा व्हावा तसा आणि व्हावा तितका वाङ्मयचिकित्सात्मक अभ्यास

व्हावयास भरपूर वाव आहे." या तीव्र जाणिवेतून प्रस्तुत अभ्यास झालेला आहे.

त्याची पाच छोटेखानी प्रकरणे आहेत. १ 'लीळाचरित्र'—'स्मरणभक्ती'चा एक 'आदर्श', २ त्रिखंडात्मक लीळाचरित्राचे त्रिविध स्वरूप, ३ लीळाचरित्राचे वाङ्मयीन स्वरूप ४ लीळाचरित्र-वाक्यविचार आणि भाषाशैली. ५ उपसंहार आणि शेवटच्या चार पानांमध्ये मूर्तिवर्णन हे परिशिष्ट व संदर्भग्रंथांची यादी.

स्वतः चक्रधरांनी व भटोवासांनी आपल्या अनुयायांना लीळास्मरणाचा उपदेश केला. त्यात 'नाम : लीळा : मूर्ति : चेष्टा' हे चतुर्विध स्मरण महत्त्वाचे. अर्थात स्मरणाची कल्पना एवढ्यापुरतीच मर्यादित नाही. त्यात 'प्रसाद' समजल्या जाणाऱ्या परमेश्वराच्या सर्व संबंधी जिनसांचा समावेश होतो. पण 'दृष्ट' आणि 'श्रुत' स्मरणांना प्राधान्य आहे. या स्मरणभक्तीच्या पोटी म्हाइंभटाने संकलित केलेल्या चक्रधरांच्या लीळा नागदेवांनी प्रथम 'दृष्टपूत' केल्यानंतर मगच अनुयायांच्या हाती पडल्या. आजच्या भाषेत सांगायचे तर ही 'अधिकृत' [ authentic ) संहिता असल्याने या 'लीळा' प्रत्यक्ष घडल्या तशाच व ऐकलेल्या शब्दातच लिहिल्या गेल्या याबद्दल शंका नाही.

लीळाचरित्राचे एकांक, पूर्वार्ध व उत्तरार्ध असे तीन खंड आहेत. एकांकामध्ये चक्रधरांचे एक माणूस म्हणून दर्शन घडते. पूर्वार्धात परमेश्वरावतार म्हणून. उत्तरार्धात (हा कालखंड फक्त चार वर्षांचा आहे) आपली ब्रह्मविद्या नागदेवाला देऊन चक्रधरांनी निर्याण केले. अवताराच्या या तिन्ही अवस्था अगदी रेखीवपणे उठून दिसतात. लीळाचरित्राचे स्वरूप त्रिविध आहे. संकलन, संपादन आणि निवेदन.

महानुभावपंथाचे वेगळे अस्तित्व जाणवलेलें नव्हते. म्हणून लीळाचरित्रात पंथीय अभिनिवेशाचा मागमूस नाही. निर्भेळ स्मरण हे ध्येय बाळगल्यामुळे म्हाइंभटाच्या व्यक्तिमत्त्वाची सावलीही त्यावर नाही. ऐकले त्याबर-हुकूम लिहिण्याचे तत्त्व काटेकोर पाळल्यामुळे लेखनाचा साधेपणा हेच या ग्रंथाचे सौंदर्य. सहज घडलेली अशी ही वाङ्मयनिर्मिती. व्यक्तिदर्शनात आणि प्रसंगचित्रणात लालित्य दिसते. प्रत्येक लीळा स्वयंपूर्ण, जिवंत आणि आस्वाद्य; तशीच पूर्वापर संदर्भदृष्ट्या महत्त्वाची आहे. या लीळांचे वृत्तलेखन, प्रसंगचित्रण, कथाकथन व तत्त्व-निरूपण असे स्थूल वर्गीकरण करून प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी त्यांचे आणखी पोटविभाग केले आहेत. नंतर व्यक्ति-स्थल-काल वर्णन आणि स्थिति-कृति-चित्रांची कल्पना देऊन संवादरचनेची चर्चा केलेली आहे. व्यक्तींच्या स्वभावदर्शनाचे एक चांगले माध्यम म्हणजे संवाद. बोलणाऱ्या व्यक्तींचे परस्परसंबंध, त्यांची मनःस्थिती, बोलण्याचा विषय यांना अनुसरून संवादात शब्द व वाक्यांना रंग आणि गति लाभते. संवादाच्या सहजपणाने या गद्यशैलीचे सामर्थ्य वाढलेले आहे. लीळाचरित्रात विनोद आहे तसे रागलोभ व हेवे-दावेही आहेत. त्यात नाट्याभिनयालाही वाव आहे. त्यामुळे लीळाचरित्राच्या लेखनात विविधता आलेली दिसते.

लीळाचरित्र बोली भाषेतच लिहिल्याने त्यातील लहान लहान धावती वाक्ये ही या गद्याची खरी प्रकृती. इतर वाक्यरचनेत संयुक्त वाक्यांपेक्षा मिश्र वाक्यांची संख्या जास्त. अरूपाचे रूप दाखवण्यासाठी आलेल्या समर्पक प्रतिमा, प्रत्यक्षीकरणाची ताकद वाढवणारे ध्वन्यनुकारी शब्द, अभिव्यक्तीत जोम आणणारी प्रश्नार्थक वाक्ये यांच्या साह्याने विषय, प्रसंग व प्रवृत्ती यांना अनुरूप अशी शैली साकार होते. पण स्वतः चक्रधरांची भाषा वेगळी वाटते व एकदम मनात ठसते म्हणून प्रा. कुलकर्णी यांनी ती जास्त बारकाईने पाहिली आहे. चक्रधरांना उपमेपेक्षा रूपक अधिक प्रिय होते. त्यांच्या भाषेत एक कस आहे. संस्कृत शब्द नेमका वापरला जातो. त्याने कुठेही मराठी-पण झाकोळत नाही. चक्रधरांच्या दृष्टान्तांची बोली देशी आहे पण त्यांच्या सूत्रांमध्ये संस्कृतचा प्रभाव दिसतो.

चरित्र-आत्मचरित्र, वार्ता-वृत्तांत, कथा-कहाणी, सूत्र-भाष्य इत्यादी अनेकविध वाङ्मयप्रकारांचा आस्वाद एका लीळाचरित्राच्या वाचनाने घेता येतो. मराठीतल्या या आद्य ललित व ललितेतर ग्रंथातल्याइतके यथातथ्य चित्रण, एवढे विस्तृत, एकसंध, अव्यभिचारी व प्रत्ययकारी उदाहरण सापडणे कठीण आहे. याबाबत कै. लक्ष्मीबाई टिळकांची 'स्मृतिचित्रे' लीळाचरित्राला बरीच जवळची असल्यामुळे उपसंहारात या दोन ग्रंथांची मार्मिक व समर्पक तुलना केलेली आहे.

प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी सूक्ष्म व चिकित्सक दृष्टीने केलेला लीळाचरित्राचा हा अभ्यास प्रमाणबद्ध व ठाशीव स्वरूपाचा आहे. तपशिलाचा पसारा न वाढवता मुद्दा थोडक्यात स्पष्ट होण्यासाठी आवश्यक तेवढाच प्रपंच त्यांनी केलेला दिसेल. उदाहरणादाखल एखाददुसरे अवतरण घेऊन जरूर तेथे स्पष्टीकरण दिले आहे. व इतर संबंधित लीळांचे नुसते आकडे नमूद केले आहेत. ८४ पृष्ठांपैकी पहिल्या २८ पृष्ठांमध्ये पंथाच्या दृष्टीने लीळाचरित्राचे महत्त्व आणि त्याच्या रचनेचे स्वरूप सांगून पुढच्या ५६ पानांमध्ये लीळांचा वाङ्मयीन आणि भाषिक विचार केला आहे. पृ. ५९–६० वर केलेले वाङ्मयरूपांचे वर्गीकरण व पृथक्करण लक्षणीय आहे. वाक्यविचार आणि भाषाशैली हे प्रकरणसुद्धा बहुधा सर्वस्पर्शी आहे. "लीळाचरित्राच्या शब्दसंपत्तीचा, त्याच्या स्वरूपाचा आणि विशेषांचा येथे वास्तविक विचार व्हावयास हवा आहे" (पृष्ठ ७६). याची जाणीव 'वर्दी' ना आहे पण फक्त वाङ्मयीनदृष्ट्या शब्दयोजनेतील औचित्य-विचार दिग्दर्शित करायचा म्हणून तळटीपेत एकदोन प्रस्तावनांचा हवाला दिला, आणि तो भाग वाचकांनी समाविष्ट करून घ्यावा म्हणजे हा विचार पुरा होईल असे त्यांनी सुचविले आहे.

शैलीचा वाङ्मयदृष्ट्या विचार व्हावा हे वाजवी, परंतु भाषेच्या अंगानेही वाक्य-रचनेचा विस्तृत विचार होणे आवश्यक आहे. इतरांनी तसा काहीसा अभ्यास केलेला असला तरी त्यांच्यापेक्षा प्रा. कुलकर्णी यांची दृष्टी वेगळी आहे. म्हणून एकंदर शब्दसंपत्तीचा नाही तरी काही विशेषांचा परामर्श त्यांनी घ्यावयास पाहिजे होता. चक्रधरांच्या तोंडी "मी" ऐवजी "हे" सर्वनाम येते, वर्तमानकाल–भूतकाल यात दिसणारा क्रियापदरूपांचा संदिग्धपणा, हीराइसा, परशरामबास, रामेश्वरबास यांच्या पाठभेदांमुळे आशयात नसला तरी वाक्यरचनेत क्वचित पडणारा फरक इत्यादी काही बाबींची या प्रकरणात दखल घेतली असती तर बरे झाले असते. कारण या गोष्टी भाषेच्या घडणीची प्रक्रिया दाखवतात आणि या बाबतीतही लीळाचरित्राचे महत्त्व विशेष आहे.

पण ही या अभ्यासाची उणीव आहे असे नव्हे, तो अधिक व्यापक झाला असता इतकेच. एका समर्थ आणि साक्षेपी अभ्यासकाचा लीळाचरित्राच्या सर्व वाङ्मयीन पैलूंचे दर्शन घडविणारा हा अभ्यास आकाराने लहान असला तरी अंगाने भरीव आणि विवेचनाच्या वजनाला भारदस्त झाला आहे.

—मु. ग. पानसे

• • •

## नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचे चरित्र

लेखक : पु. पां. गोखले, नीळकंठ प्रकाशन, पुणे ९. किंमत रु. १०

१९६६ साली नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांचा जन्मशताब्दी उत्सव भारतात टिकठिकाणी साजरा झाला. त्यानिमित्त गोखले यांची काही चरित्रे लिहिली गेली. त्यांपैकी श्री. पुरुषोत्तम पांडुरंग गोखले यांनी लिहिलेले एक होय.

श्री. पु. पां गोखले यांनी गेली चाळीस वर्षे म. गांधींच्या राजकारणात आस्थेने भाग घेतला आणि त्या बाबतीत पुष्कळ कष्टही सहन केले आहेत.

म. गांधींनी नामदार गोखले यांना आपले गुरू मानले होते. गोखल्यांच्या पश्चात म. गांधी लोकप्रियतेच्या शिखरावर गेले तरी त्यांनी आपल्या गुरूंच्याबद्दलची आपली भक्ती बोलून दाखविताना कधी कधी अप्रियताही सहन केली. अशा मनस्वी पुढाऱ्याचे अनुयायित्व श्री. पु. पां गोखले यांनी आपल्या तरुणपणात केले. त्यामुळे महात्मा गांधी ज्यांना गुरू मानीत त्यांच्याबद्दलची जिव्हाळ्याची भावना त्या काळी त्यांच्या सर्व अनुयायीवर्गात पसरली आणि जोपासली गेली. त्या दृष्टीने या चरित्रलेखनात एका विशिष्ट प्रकारच्या भक्तीचा जिव्हाळा निर्माण झाला आहे. श्री. पु. पां. गोखले यांची वृत्ती थोर माणसांच्या गुणांचे संकीर्तन करण्याइतकी भक्तियुक्त आहे. त्यामुळे या चरित्रात नामदार गोखले यांचे दर्शन घडविताना श्री. पु. पां. गोखले यांनी एका गुणज्ञ भक्ताची भूमिका स्वीकारली आहे.

श्री. पु. पां गोखले यांची चरित्रलेखनाची पद्धत नेहमीच्या ठराविक तंत्राची आहे. बालपणापासून मृत्यूपर्यंतचा एक आराखडा करून त्यात सर्व घडामोडी कालानुक्रमाने देण्याची जी एक ठराविक पद्धत आहे तिचाच श्री. गोखले यांनी अवलंब केला आहे. पण त्यात

सर्व गोष्टी शक्यतोवर याव्यात अशी योजना केली आहे. सार्वजनिक सभा, डेक्कन सभा, वेल्बी कमिशन, कॅंग्रेसची अधिवेशने, प्रांतिक व मध्यवर्ती कायदेकौन्सिलांच्या बैठकी, इंग्लंड व द. आफ्रिका येथे जाऊन केलेल्या चळवळी, हिंदसेवक समाजाची स्थापना आणि डी. ई. सोसायटीच्या शिक्षणसंस्थांतील कामगिरी या विविध घडामोडींचा इतिहास म्हणजे गोखले यांचे चरित्र आहे. पण या सर्व ठिकाणी कार्य करताना, आपण एक समाजाचे सेवक आहोत आणि ती समाजसेवा सातत्याने करण्यासाठी स्वार्थत्याग, उद्योगप्रियता, शुचिर्भूतपणा आणि श्रेष्ठ दानत हे गुण अंगी बाणवून घेऊन आपल्याला कार्य करावयाचे आहे, ही ना. गोखले यांची जाणीव कधी लोपली नाही. या जाणिवेपायी गोखल्यांनी प्रसिद्धिविन्मुख राहून सामान्यतः दहाबारा वर्षे अर्थशास्त्रीय आणि राजकीय अशा तांत्रिक विषयांच्या अभ्यासात घालविली. प्रसिद्धिविन्मुख राहण्याचे व्रत स्वीकारणे ही गोष्ट साधी नाही. न्या मू. रानडे यांच्यासारख्या कदरदान गुरूची शिकवण आत्मसात करताना गोखले यांना कमी कष्ट पडले नाहीत. पण त्यांची गुरुभक्ती ही स्वतःच्या विकासाकरिता पतकरलेली होती; इतरांची नजरबंदी करण्यासाठी पतकरलेली नव्हती. म्हणून जे जे काम अंगावर पडले ते ते निःस्वार्थबुद्धीने ना. गोखले यांनी पार पाडले. परमेश्वराचे नम्र प्रेषित म्हणून आपल्याला नियतीने समाजसेवेच्या कार्यासाठी नियुक्त केले आहे, यश आले किंवा अपयश आले तरी ती परमेश्वराची इच्छा असे मानून निराश न होता आपल्या अंगीकृत कार्यात मग्न होण्यातच पुरुषार्थ आहे अशी ना. गोखले यांची धारणा होती. श्री. पु. पां. गोखले यांनी ही ना. गोखले यांच्या मनोरचनेची बाजू पार्श्वभूमीदाखल घेऊन आपले सर्व चरित्र लिहिले आहे.

गोखले यांनी १८८८ पासून १९१५ पर्यंत सतत सत्तावीस वर्षे सार्वजनिक जीवनात वेचली. डी. ए. सोसायटीत अठरा वर्षे काम करताना अध्यापनकार्याची त्यांनी कधी चालढकल केली नाही. गणित, इंग्लिश, अर्थशास्त्र, इतिहास असे निरनिराळे विषय त्यांनी कॉलेजात शिकविले. संस्थेसाठी त्यांनी कार्यवाहाचे काम केले आणि १८९२ ते १९०२ या दहा वर्षांत हजारो रुपयांच्या देणग्या जमविल्या. १९०२ साली ते संस्थेतून निवृत्त झाले तरी त्यांचे संस्थेकडील लक्ष कमी झाले नाही. १९१५ साली मृत्यु येईपर्यंतदेखील फर्ग्युसन कॉलेजच्या नैमित्तिक बाबींशी त्यांचा संबंध होता. फर्ग्युसन कॉलेजात नोकरी करीत असतानाच त्यांनी १८८८ पासून सार्वजनिक सभेचे काम करण्यास सुरवात केली व ते काम त्यांनी १८९५ अखेर पर्यंत केले. या कामाचे वेतन नियमाप्रमाणे त्यांना घेता आले असते पण त्यांनी एक पैही घेतली नाही. १८९६ मध्ये सार्वजनिक सभेचा त्यांनी राजीनामा दिला, व डेक्कन सभा स्थापन केली.

डेक्कन सभेचे ते अखेरपर्यंत आधारस्तंभ होते. १८९९ साली प्रांतिक कायदेकौन्सिलात आणि १९०२ पासून मध्यवर्ती कायदेकौन्सिलात नियुक्त झाल्यावर त्यांनी कौन्सिलातील आपली प्रसिद्ध कामगिरी केली. १९०२ पासून १९१४ पर्यंत असा विषय नव्हता की, ज्यावर कौन्सिलात गोखले यांनी जनतेची बाजू घेतली नाही. दुष्काळनिवारण, मिठावरील कर, शेतकऱ्यांचे कर्जनिवारण, सक्तीचे प्राथमिक शिक्षण, शेतकरीपतपेढ्या, इत्यादी अनेक गोष्टींचा संबंध समाजातल्या खालच्या थरातील श्रमजीवी जनतेशी होता. या जनतेची मोठ्या कळवळ्याने आणि आवेशाने कौन्सिलात बाजू मांडताना गोखल्यांचे सारे वक्तृत्व पणास लागत असे. या सर्व कामगिरीचे वर्णन श्री. पु. पां. गोखले यांनी मोठ्या आत्मीयतेने केले आहे. " बहुजनसमाजाच्या जीवनाचा सूक्ष्म अभ्यास करून त्याच्या अव्वल हिताच्याच प्रगतीसाठी आपल्या 'अकलेचा पवाड' गोपाळकृष्णांनी विधिमंडळातून व विधिमंडळाबाहेर एवढा घातला की, आखीव, रेखीव, कोरीव आणि आदबशीर शब्दांनी गोपाळ कृष्ण गोखल्यांनी जनतेची आणि भारताची मांडलेली बाजू परकीय सत्तेला कडू कोयनेलासारखी मुकाट्याने गिळावीच लागे," असे लेखकांनी गोखल्यांच्या कौन्सिलातील कामगिरीचे यथार्थ वर्णन केले आहे.

" विधिमंडळाच्या बाहेर राहून सरकारवरील जळजळीत टीकेने व मथळ्यांनी वर्तमानपत्रांचे रकानेच्या रकाने भरण्यास अगर घंटे घंटे सभा चालवून वक्तृत्वाच्या फैरी झाडण्यास जेवढे धैर्य व जेवढा अभ्यास लागतो, तेवढेच, प्रसंगी त्याच्याहून अधिक धैर्य व अधिक अभ्यास विधिमंडळातील अधिकाऱ्यांच्या आणि राज्यकर्त्या सूत्रधारांच्या समोरासमोर, न्याय्य व सणसणीत टीका करण्यास अवश्य असतो, " हे लेखकाचे उद्गार विशेष महत्त्वाचे आहेत. कारण त्या काळी

'हिंदू पंच' या पत्राने गोखल्यांच्या या वक्तृत्वाची केवळ 'पोपटपंची' या शब्दाने संभावना केली आणि सतत पोपटाच्या वेषात गोखल्यांचे चित्र छापून, सवंग लोकप्रियता मिळविली. याच 'हिंदू पंचा' वर गोखल्यानी १९०९ साली बदनामीची फिर्याद केली. आरोप शाबित होऊन 'हिंदू पंच'च्या संपादकाला जबर दंडाची व छापखान्याच्या जप्तीची शिक्षा झाली. त्या वेळी त्या संपादकाची पुढे फार दैन्यावस्था झाली. गोखले त्या संपादकाला पुढे खासगी रीतीने, त्याच्या संसारासाठी आर्थिक साहाय्य करीत होते!

लो. टिळकांना १९०८ च्या जुलैत सहा वर्षे कारागृहवासाची शिक्षा झाली. त्या वेळी गोखले इंग्लंडमध्ये होते. दि. १७ जुलै, २३ जुलै व १३ ऑगस्ट १९०८ या तारखांची गोखल्यांची आपल्या हिंदुस्थानातील सहकाऱ्यांना आलेली पत्रे लेखकांनी उद्धृत केली आहेत. ती वाचली असता कोणाही निष्पक्षपाती माणसाला गोखल्यांच्या प्रामाणिक आणि प्रांजळ वृत्तीची जाणीव होईल. पण त्या वेळी ही पत्रे शिवरामपंत परांजपे यांच्यासारख्या नेत्याला दाखविली तेव्हा शिवरामपंतांनी त्या पत्रांची हेटाळणी केली, व आपल्या अनुयायांनी गोखल्यांवर चालविलेल्या दोषारोपांना या पत्रांच्या आधारे पायबंद घालण्याचा प्रयत्न केला नाही! श्री. पु. पां. गोखले यांनी प्रत्येक घटनेचे गोखल्यांपुरते घडलेले भाग चरित्रात दिले आहेत; पण त्यांचे वरीलसारखे पूरक भाग दिले नाहीत. केवळ विपर्यास केला गेल्यामुळे गोखल्यांना खरा मनस्ताप झाला. राजकीय मतभेदांच्या तीव्रतेने त्यांना कधी त्रास झाला नाही. त्यांना त्रास झाला तो नसत्या गोष्टी त्यांच्या माथी मारण्यात आल्या म्हणून. ही गोष्ट लेखकांनी स्पष्ट करण्यास हरकत नव्हती.

अशा मोघम लिहिण्याने गोखल्यांचे समग्र व्यक्तिमत्त्व लोकांपुढे स्पष्ट उभे राहात नाही. सार्वजनिक सभेतील निवडणूक, वेल्बी कमिशनसमोरील साक्षीच्या वेळी त्यांनी केलेले सार्वजनिक व डेक्कन या समानधर्मी संस्थांचे उल्लेख, प्लेगातील सोजिरांच्या अत्याचाराबद्दलच्या स्वतःच्या विधानासंबंधी गोखल्यांनी मागितलेली सरकारची माफी, १९०७ साली गोखल्यांनी केलेला इनॉक्युलेशनचा प्रचार, १९०८-९ साली सरकारचे पक्षपाती म्हणून झालेली त्यांची हेटाळणी आणि मृत्यूपूर्वी दोन पक्षांत समेट व्हावा यासाठी त्यांनी प्रयत्न केले त्यात भूपेंद्रनाथ बसूंना त्यांनी पाठविलेले पत्र व त्यावरील काहूर इत्यादी अनेक प्रसंगी गोखल्यांच्या म्हणण्याचा विपर्यास करण्यात आला. आज तो इतिहास थोडयाशा स्पष्टपणाने मांडण्यास हरकत नव्हती. कारण तो केवळ इतिहास आहे. त्या वेळच्या अनेक घटनांची उपपत्ती सुबुद्ध वाचक सारा इतिहास समोर आला म्हणजेच करील. नासिकच्या जॅकसनखूनकटातीलच काही जबाबदार क्रांतिनेते गोखल्यांना ठार मारण्यासाठी पुणे-मुंबई आगगाडीत शिरले होते. पण ऐनवेळी गोखल्यांचा डबा योगायोगाने बदलण्यांत आला म्हणून क्रांतिकारकांचा बेत हुकला! हे क्रांतिकारकही देशभक्त मानले जातात आणि गोखलेही देशभक्त होते असे इतिहासाने मानले आहे. समाजात आज दोघांचेही उत्सव चालू आहेत. अशा स्थितीत आपापल्या मनाशी ज्याला त्याला निर्णय करता यावा म्हणून सर्व घटना सविस्तरपणे मांडणे हे लेखकांचे कर्तव्य होते. १९०९ साली सन्मित्रसमाजमेळ्याने बदनामीकारक पदे म्हटली. त्यावर गोखल्यांनी फौजदारी खटला केला. गोखल्यांच्या सहनशक्तीचा अगदी अंत पाहिला गेला तेव्हाच त्यांनी आपल्या नेहमीच्या स्वभावाविरुद्ध ही फिर्याद केली. ती सारी हकिकत थोडक्यात का होईना लेखकांनी उल्लेखावयास हवी होती. त्यावेळची मेळ्यातली तालासुरांनी आकर्षक केलेली पदे सदभिरुचीला धरून कितपत होती हेही आजचा कोणताही वाचक आपल्याशीच ठरवू शकला असता. लेखकांनी ही पदे द्यावयास हवी होती. इतिहासाच्या दृष्टीने घटनांची व कागदपत्रांची संपूर्ण नोंद करणे हे सचोटीच्या (Bonafides) दृष्टीने फार महत्त्वाचे असते. त्या बाबतींत अनेक ठिकाणी लेखकांनी उदासीनता पतकरली आहे.

असे काही संदिग्ध किंवा थोडेफार चुकीच्या माहितीचे उल्लेख या ठिकाणी दर्शविले तर योग्य ठरेल म्हणून ते येथे देतो. पान २९ वर, "टिळकांच्याबरोबर त्यांचे सहकारी नामजोशी व प्रा. पाटणकर हेही सोसायटी (डी. ई.) सोडून गेले" असे म्हटले आहे. त्यात नामजोशी यांजबद्दलचा उल्लेख बरोबर नाही. नामजोशी हे १८९४ पर्यंत म्हणजे नंतर जवळजवळ तीन वर्षे मागे डी. ई. सोसायटीत घोटाळत राहिले. वस्तुस्थिती अशी की ते धड कामही करीनात आणि सरळ निघूनही

जाईनात ! मोठ्या मिनतवारीने पण सर्कानेच त्यांना सोसायटीतून काढावे लागले. पान ३९ वर गणेशोत्सव, पं. रमाबाईंचे शारदासदन, संमती वयाचा वाद, सामाजिक परिषद काँग्रेसमंडपात भरविण्याचा वाद इत्यादी घटनांचा उल्लेख करून या " प्रश्नांनी महाराष्ट्रात १८९५ साली उग्रतम स्वरूप धारण केले, " असे म्हटले आहे. या सर्व घटना व त्यावद्दलच्या चळवळी १८९५ सालीच झाल्या नाहीत. १८८९ ते १८९५ पर्यंत या विविध चळवळींनी महाराष्ट्राचे सार्वजनिक जीवन घुसळून निघाले, असे म्हटले असते तर ते कालानुक्रम राखण्याच्या दृष्टीने बिनचूक व बरोबर झाले असते.

पान ४५-४६ वर डेक्कन सभेच्या स्थापनेची हकिकत दिली आहे. पण ती स्थापन होताना केसरीत टिळकांनी १८९६ नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात " म्हातारचळ की पोरखेळ " हा लेख लिहिला. त्यातील काही भाग लेखकांनी या ठिकाणी उद्धृत करणे जरूर होते. म्हणजे दोन्ही पक्षांचे म्हणणे आज निर्भेळपणे लोकांसमोर आले असते. पान ४७ वर वेल्बी कमिशनच्या साक्षीबद्दलची माहिती आहे. " गोखल्यांनी साक्षीसाठी तीन महिने जय्यत तयारी चालविली आणि गणेश व्यंकटेश जोशी या त्यांच्या उस्तादाची अभ्यासाच्या बिनचूकपणाबद्दल खातरजमा झाल्यावरच, फडावर कुस्ती मारावयास जाणाऱ्या पहिलवानाप्रमाणे गोपाळराव गोखले वेल्बी कमिशनपुढे साक्ष द्यावयास इंग्लंडला रवाना झाले," असे म्हटले आहे. पण हे वस्तुस्थितीला धरून नाही. गोखले कित्येक वर्षे रा. ब. जोशी यांच्याशी विचार-विनिमय करीत असत हे खरे. पण या वेल्बी कमिशनच्या वेळी, जोशी याजकडे निवांतपणे धडे घेण्यास गोखल्यांना फुरसतच झाली नाही. गोखल्यांनी आपली कच्ची साक्ष बोटीच्या प्रवासात लिहिली. प्रत्यक्ष साक्षीच्या कामाशी रा. ब. जोशी याचा संबंध आला नाही ! गोखल्यांची टिपणे दादाभाई व वेडरबर्न यांनी तपासली.

पान ५४ वर, " ता. २० जुलैच्या केसरीवरून लो. टिळक काही पुरावा गोळा करण्याच्या खटपटीत असावे. पण सरकारने २७ जुलै रोजी त्यांना अटक करून त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरावयास काढल्या-कारणाने त्यांचा काही उपयोग होणे शक्य नव्हते, " असे म्हटले आहे. हा प्रसंग १८९७ साली ता. ३० जुलै रोजी गोखले इंग्लंडहून मुंबईस आले, त्यानंतर त्यांना इंग्लंडमधील मँचेस्टर गार्डियनमधील आपल्या प्लेग-विषयक विधानाबद्दल माफी मागावी लागली त्याबद्दलचा आहे. दि. १ ऑगस्ट १८९७ रोजी गोखल्यांची माफी वृत्तपत्रात प्रसिद्ध झाली. ज्या २० जुलैच्या केसरीतील स्फुटाचा श्री. पु. पां. गोखले उल्लेख करतात त्या स्फुटात टिळक लिहितात, " प्रो. गोखले हे शेवटपर्यंत येथे नसल्यामुळे त्यांच्या वर दिलेल्या दोन विधानांत थोडीशी अतिशयोक्ती आहे व एकास तर काहीच पुरावा नाही. " अशा स्थितीत गोखल्यांच्या दृष्टीने काही पुरावा गोळा करण्याचा प्रश्नच उरला नाही !

पान ५६ वर शेवटच्या परिच्छेदात प्लेगच्या इनॉक्युलेशनचा गोखल्यांनी प्रचार केला इत्यादी जी माहिती दिली आहे ती देताना १८९९ साली व १९०७ साली झालेल्या गोखल्यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या कामगिरीची गल्लत केली आहे. १९०७ साली ' केसरी ' त ता. १५ व २२ नोव्हेंबरला गोखल्यांच्या या कामगिरी-संबंधाने टीका आली आहे. " लोकांच्या पुढाऱ्यास सरकारी लालूच ! " या मथळ्याखाली गोखल्यांवर ती टीका आली आहे. श्री. पु. पां. गोखले यांनी ही सारी घटना १८९९ त एकत्र केलेली दिसते !

पान ९१ वर, " बहिष्काराच्या ठरावावर बोलणाऱ्या एका वक्त्याने बहिष्काराची व्याप्ती शाळा, माणसे वगैरे पर्यंत देखील पोचवल्याने ना. गोखल्यांनी बहिष्कार फक्त ब्रिटिश मालापुरताच आहे, असे उठून सांगितले, " असा उल्लेख आहे. हा प्रसंग १९०६ सालच्या कलकत्ता काँग्रेसचा आहे. हा एक वक्ता म्हणजे बिपिनचंद्र पाल. हे नाव उल्लेखणे अवश्य होते. कारण हे पाल लवकरच लाल-बाल-पाल या त्रयीत समाविष्ट केले गेले आणि काही काळ त्यांची एखाद्या दैवतासारखी भारतीय जनतेने पूजा केली ! त्या वेळी पाल जे म्हणाले ते प्रत्यक्ष असे होते- " Boycott shall move from point to point, move from city to city, move from Division to Division; move, I hope you will allow me to add, from Province to Province. It is not a mere boycott of goods. It is a boycott of something else... " या वेळी गोखले उठून म्हणाले, " We who are assembled here in this Congress are bound by the resolutions we pass. Individual interpretations of individual resolutions are matters which concern individuals only. The resolution

put before you means that the boycott movement that has been introduced to mark the resentment of the people against the partition of Bengal was and is in the opinion of the Congress and the people of India legitimate. To this extent we all agree. Upto this point we all go together. Beyond this, if any of you want to go, go by all means, but do not go in the name of the Congress." ( २२ व्या काँग्रेसचा अहवाल-पाने ८३, ८४ ). या सर्वाला फार महत्त्व आहे. कारण पुढल्याच वर्षी सुरतेला पाल यांच्या पक्षाने सर्वंकष बहिष्काराचा ठराव, 'in the name of the congress', करून घेण्यासाठी तर एवढे रण माजविले आणि त्या शब्दच्छलावरच काँग्रेस दुभंगली. म्हणून या सर्व प्रकाराला इतिहासात फार महत्त्व आहे. श्री. पु. पा. गोखले यांनी अशा ऐन प्रसंगी मोघम लिहिले त्यामुळे चरित्रग्रंथाला उणेपणा येतो हे सांगितले पाहिजे.

पान १०० व १०१ वर सुरतेस दि. २७ डिसेंबर १९०७ ला अधिवेशन सुरू झाले असे म्हटले आहे, व ता. २७ ला बरखास्त झालेले अधिवेशन ता. २८ ला फिरून १ वाजता सुरू झाले असा उल्लेख केला आहे. पण या तारखा २६ आणि २७ अशा पाहिजेत.

पान १०२ वर लेखक म्हणतात, "एप्रिलमध्ये ( १९०८ ) काँग्रेसचे कुंपणमांडणीचे काम संपल्यावर, खुद्द लॉर्ड मिंटो यांनीच गोपाळराव गोखल्यांना इंग्लंडमध्ये जाऊन लॉर्ड मोर्ले यांना सहाय्य करण्यास सुचविले." हे सर्वस्वी चूक आहे. लजपतराय यांच्या हद्दपारीबद्दल निषेधाचे उद्गार गोखल्यांनी काढले म्हणून गोखल्यांच्यावर मिंटो अतिशय नाराज होते. आणि शिवाय त्यांनी गोखले यांना इंग्लंडात जाण्याचा आदेश कधी दिला नाही अशी वस्तुस्थिती आहे.

पान १२१ वर, १९१३ साली गोखल्यांनी गांधीजींना दक्षिण आफ्रिकेच्या लढ्यासाठी आर्थिक मदत पाठविली, त्याचा उल्लेख आहे पण तो मोघम आहे. त्यावेळच्या प्रत्यक्ष घटनांचे व दौऱ्यांचे उल्लेख करावयास हवे होते. गोखले प्रकृती नाजूक असतानाही लाहोरपर्यंत दौरा करून आले हे सांगण्याने गोखल्यांच्या कर्तव्यबुद्धीचा जास्त बोध झाला असता!

पान १३५ ते १४० या भागात गोखल्यांच्या मृत्यूच्या आधी दोन अडीच महिने जहालांनी काँग्रेस-मध्ये सहकार्य करावे म्हणून काँग्रेसघटना थोडी शिथिल करून समेट करण्याचे जे प्रयत्न झाले त्यांची माहिती दिली आहे. हा समेटाचा वाद अखेरीस टिळक व गोखले यांच्या वैयक्तिक वादाने कडवट बनला व वाढीस लागला. पण गोखले यांचा आकस्मिक मृत्यू झाला आणि तो वाद कृतांत काळानेच थांबविला! या वादातील सर्व कागदपत्रे पाहून लेखकांनी तो संक्षेपाने मांडावयास हवा होता. श्री. पु. पां. गोखले यांनी या बाबतीत सरधोपटपणाने लिहिले आहे आणि त्यामुळे वाचकाला नेमके काय घडले याचा स्वच्छ उलगडा होत नाही. याबाबतीत पान १५८ वर लेखकानी या प्रकरणाचा एका वाक्याने पुन्हा उल्लेख करून ना. गोखले हे या प्रसंगी उतावीळपणाने वागले असे म्हटले आहे. गोखले यांनी फक्त बसूनाच पत्रे लिहिली नाहीत. त्यांचे ॲनी बेझंट व टिळक इत्यादींशीही या प्रसंगी पत्रव्यवहार झाले. "What passed between Tilak and me at this interview is correctly described by Mr. Gokhale" असे स्वता सुबारावांनी जाहीर केले. प्रो. आण्णासाहेब विजापूरकर यांना तर या समेटाच्या वाटाघाटींच्या वेळी स्वता टिळकांनीच बोलावून घेतले होते. विजापूरकर प्रत्येक चर्चेच्या वेळी हजर होते. म्हणून त्यांनी खुलासा करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांनाही वादाच्या धुमश्चक्रीत टिळकांनी गप्प बसविले. श्री. पु. पां. गोखले यांनी या गोष्टी देऊन मग आपले कोणतेही मत व्यक्त करण्यास हरकत नव्हती.

पान १५७ वर "ॲरिस्टॉटलच्या व्याख्येप्रमाणे अवगुण व गुणातिरेक यांमधील सुवर्णबिंदूचा त्यांनी बरोबर वेध घेतला होता," या वाक्यापासून पुढल्या चार पाच ओळींचा मजकूर अवतरणांकित करावयास हवा होता. कारण ते गोखल्यांचे वर्णन. कै. न. चिं केळकर यांनी केले आहे व ते प्रसिद्ध आहे. पान १८७ वर सर गायफ्लीटवुड विल्सन यांचा उल्लेख हिंदुस्थानचे अर्थमंत्री असा केला आहे. विल्सन हे फडणीस होते. त्या वेळी कोणी अर्थमंत्री असणे शक्य नव्हते.

भाषेसंबंधानेही लेखकांनी बराच निष्काळजीपणा दाखविला आहे. काही ठिकाणी वाक्यरचना बोजड, व्याकरणदृष्ट्या दूरान्वयाची आणि अर्थदृष्ट्या अपुरी झालेली आहे. शेवटच्या 'ना. गोखले यांचे विवेकदर्शन' या भागात गोखल्यांच्या इंग्रजी भाषेतील उताऱ्यांचे मराठी भाषांतर दिले आहे. त्यात कित्येक ठिकाणी मराठी भाषा फार चमत्कारिक व धेडगुजरी झालेली आहे. उदाहरणे दिली तर फार विस्तार होईल. असे असले तरी ना. गोखले यांच्या जीवनाचा सर्वसामान्य परिचय होण्याच्या दृष्टीने या सवादोनशे पृष्ठांच्या चरित्रग्रंथाचे

महत्त्व नाकारून चालणार नाही. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य-युद्धातील एक पर्व ना. गोखले यांच्या साहचर्याने अंकित झालेले आहे. राजकारणातल्या एका तात्त्विक मतप्रणालीचे एक श्रेष्ठ पुरस्कर्ते म्हणून भावी इतिहासकारांना गोखल्यांचा उल्लेख केल्याशिवाय पुढे जाता येणार नाही. गोखल्यांनी केवळ राजकीय पुढारी म्हणूनच कार्य केले नाही. हिंदसेवक-समाजाच्या स्थापनेने त्यांनी राजकीय कार्यकर्त्यांची दानत व शील ही कशी घडविली जावीत याचा प्रत्यक्ष वस्तुपाठ दिला. " Public life must be spiritualised " हे त्यांचे तत्त्व इतिहासात कायमचे स्थिर होऊन राहिले आहे. सत्यनारायणाच्या प्रसादाच्या शिऱ्यांत आपण भेसळ करीत नाही. त्याप्रमाणे राजकारणाच्या कार्यपद्धतीत कसल्याही हीन व कुटिल वृत्तींचा आश्रय केला जाऊ नये हा त्यांचा आग्रह होता. आणि तो आग्रह अगदी शंभर टक्के बरोबर होता हे आजचा राजकारणाचा खेळ पाहणारा कुणीही तटस्थ आणि सुबुद्ध गृहस्थ आदराने निःसंशय मान्य करील. मागे त्यांचे नाव राहील ते त्यांनी अभ्यासूपणाने मांडलेल्या अनेक विषयांमुळे ! पब्लिक सर्हिस कमिशनवर आयर्डिंग्टन् याच्या नेतृत्वाखाली त्यांनी काम केले व अनेक साक्षी नोंदविताना एखाद्या श्रेष्ठ राष्ट्रनिष्ठ अभ्यासकाला भूषणभूत होऊन राहतील असे मार्मिक आणि मर्मभेदक प्रश्न वरचेवर विचारले. या त्यांच्या कर्तृत्वाला निर्विवादपणे भारतीय इतिहासात मानाचे स्थान मिळेल. भारतासाठी हव्या असलेल्या सुधारणांचा आराखडा गोखले यांनी केला. मृत्यूच्या आदल्या दिवसापर्यंत त्यांनी हा आराखडा करण्याचे काम केले. गोखल्यांच्या त्यावेळच्या कोणत्याही समकालीन भारतीय पुढाऱ्याने आपल्याला काय हवे त्याचे इतके सूत्रबद्ध टिपण केलेले नाही. यात टिपणाला गोखल्यांचे राजकीय मृत्युपत्र म्हणतात. त्याचा मॉंटेग्यू चेम्सफर्ड सुधारणांवर पुष्कळ परिणाम झाला.

स्वतःच्या कार्याबद्दलची एक निश्चित कल्पना मनाशी इतकी पक्की केल्यामुळेच गोखले यांना जीवनात यश लाभले. उद्दिष्टासंबंधात त्यांची कधी चलबिचल झाली नाही. जनतेने मानले किंवा न मानले तरी त्याची खंत न बाळगता गोखले कार्य करताना अविचल राहिले. " राष्ट्रभक्तीच्या एका उदात्त भावनेपुढे बाकी सारे विचार निर्माल्य बनून गेले पाहिजेत " असे आपले उद्गार ज्याने आपल्या चरित्राने व चारित्र्याने अन्वर्थक ठरविले, त्या श्रेष्ठ देशभक्ताला आज कुणीही झाले तरी धन्यवादच देईल. श्री. पु. पां. गोखले यांनी हे चरित्र लिहून आजच्या पिढीला ना. गोखले यांचा स्थूल परिचय करून दिला याबद्दल त्यांचे अभिनंदन करणे अवश्य आहे.

**वि. बा. आंबेकर**

• • •

---

[ संपादकीय — पृष्ठ २ वरून पुढे चालू ]

अशा प्रकारची काही व्यवस्था करावयाची असेल तर त्याकरिता, व्याख्याने घडवून आणणाऱ्या संस्था, ती देणारे वक्ते आणि प्रकाशक, वृत्तपत्रे यांचा सहविचार आणि सहकार होणे आवश्यक आहे. कदाचित या कार्यासाठी एखाद्या नव्या नियतकालिक प्रकाशनाची योजनाही आखावी लागेल. आता महाराष्ट्रात एकाहून अधिक ठिकाणी वृत्तपत्रव्यवसाय शिक्षणाचे वर्ग सुरू झाले आहेत. त्यांतील उमेदवारांचे यासाठी साहाय्य संपादन करता येणे कठीण नाही. त्यात इतरांप्रमाणे त्यांचाही फायदाच होईल. आजकाल अनेकांपाशी टेपरेकॉर्डर असतात. त्यांचा वापर करून शक्य तेथे व्याख्याने ध्वनिलिखित करता येतील व मागाहून सवडीनुसार त्यांचे लिप्यंतर, संपादन आणि संस्करण करता येईल.

सध्या अनेक लहान लहान शहरांतून विद्यालये, महाविद्यालये, किंबहुना विद्यापीठेही निघत आहेत; निघाली आहेत. त्यांतील अध्यापक, प्राध्यापक, छात्र आणि अन्य जिज्ञासू नागरिक यांना त्यांच्या आवडीच्या अथवा व्यासंगाच्या विषयासंबंधीची सर्व आधुनिक अद्ययावत ज्ञानसाधने उपलब्ध होणे कठीण पडते. यामुळे बाहेरील जगातील शैक्षणिक, सांस्कृतिक, वैज्ञानिक प्रगतीची अद्ययावत माहिती मिळविण्याची उत्कंठा असूनही ती त्यांना उपलब्ध होत नाही. इच्छा, तळमळ असूनही त्यांच्या जिज्ञासेचा कोंडमारा होतो. मोठमोठ्या शहरांत होणाऱ्या ज्ञानसत्रांचा त्यांना लाभ मिळेल असा काही मार्ग, काही उपाय, अंमलात आणणे, हे लोकशिक्षणाचे महत्त्वाचे अंग ठरल्यावाचून राहणार नाहीं. इंग्लंडमधील ' बी. बी. सी. ' ने आपल्या ' तिसऱ्या कार्यक्रमा 'त झालेल्या ' भाषणां ' तील काही विषयांच्या पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत. त्यांच्या वाचनाने त्या विषयांचे फार सखोल अथवा सर्वांगीण ज्ञान न झाले, तरी विषयाची व्याप्ती आणि त्या क्षेत्रातील तज्ज्ञांचे त्यासंबंधीचे मौलिक आणि अद्ययावत विचार परिचित होण्यास, माणूस बहुश्रुत होण्यास, चांगली मदत होते. पुणे विद्यापीठही आपल्या बहिःशाल व्याख्यानमालेच्या काही वक्त्यांकडून, त्यांच्या व्याख्यानविषयांवर पुस्तके लिहून घेऊन ती प्रसिद्ध करीत असते. हे उपक्रम स्पृहणीय आहेत. मुंबईमराठीसाहित्यसंघ, विदर्भसाहित्यसंघ, मराठवाडासाहित्यपरिषद, महाराष्ट्रसाहित्यपरिषद या सर्वांनाही, सहविचाराने आपापल्या विभागांतील विद्यापीठांच्या मदतीने या बाबतीत तसे बरेचकाही करता येण्यासारखे आहे.

**—के. नारायण काळे**

अनुक्रमणिका







# परिषद-वार्ता

( चिटणिसांकडून )

**गोखले पारितोषिक :** परिषदेतर्फे एकवर्षाआड उत्कृष्ट ललितेतर ग्रंथाला रु. १५० चे 'कै. विश्वनाथ–पार्वती गोखले पारितोषिक' दिले जाते. १९६८ सालातील उत्कृष्ट ललितेतरग्रंथ म्हणून यंदा हे पारितोषिक श्री. य. न. केळकर यांच्या 'काही अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रे' या ग्रंथाला देण्यात आले. पारितोषिकाच्या शिफारशीसाठी प्रा. श्री. के. क्षीरसागर व श्री. ग. ल. ठोकळ यांची समिती कार्यकारी मंडळाने नेमली होती.

**कै. राजे भवानराव औंधकर यांची जन्मशताब्दी :** औंधचे लोकप्रिय राजे व म. सा. संमेलनाचे भूतपूर्व अध्यक्ष कै. भवानराव पंतप्रतिनिधी यांची जन्मशताब्दी १ नोव्हेंबरला पुणे येथे डॉ. चिंतामणराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली भव्य प्रमाणात साजरी झाली. म. सा. परिषद या कार्यक्रमात सहभागी झाली होती. परिषदेचे उपाध्यक्ष म. म. प्रा. द. वा. पोतदार यांनी समारंभप्रसंगी कै. पंतप्रतिनिधींच्या छायाचित्रास पुष्पहार घातला व गौरवपर भाषण केले.

**हिंदी साहित्यिकांची भेट :** अहिंदी भाषिक राज्यातील हिंदी लेखक व अनुवादक यांचा एक मेळावा ऑक्टोबरच्या शेवटच्या आठवड्यात पुण्यात भरला होता. मेळाव्यात भाग घेतलेल्या हिंदी लेखक-अनुवादकांना २९ ऑक्टोबर रोजी परिषदेने मुद्दाम आमंत्रण दिले व तासदीडतास त्यांच्याशी साहित्यविषयक चर्चा केली. परस्परपरिचय, चर्चा, काव्यगायन असा कार्यक्रम या प्रसंगी झाला. परिषदेतर्फे या वेळी डॉ. रा. शं. वाळिंबे, श्री. ग. ल. ठोकळ, श्री. स. कृ. पाध्ये, श्री. मो. रा. वाळंबे, प्रा. स. शि. भावे., डॉ. मु. ग. पानसे, श्री. श्रीपाद जोशी, प्रा. भीमराव कुलकर्णी, प्रा. प्र. रा. भुपटकर इत्यादी कार्यकर्ते उपस्थित होते. बैठकीला पुढील हिंदी साहित्यिक आले होते. श्री. बालशौरी रेड्डी, मद्रास; श्री. वे. राधाकृष्ण मूर्ति, हैद्राबाद; श्री. रमेश चौधरी, मद्रास; डॉ. एस. माधवराव, वाल्टेर; डॉ. पी. जयरामन, मुंबई; श्री. शारी राजन, मद्रास; श्री. सुमतींद्र, प्रिन्सिपल, तिरुचिरापल्ली; श्री. तुळशी जयरामन, मद्रास, डॉ. एन. व्ही. राजगोपालन, आग्रा; श्री. अभय देव, कोट्टायम; प्रो. चंद्रशेखर नायर, त्रिवेंद्रम; डॉ. हिरण्मय, म्हैसूर; डॉ. नरेंद्र मोहन शर्मा, दिल्ली, श्रीं. कुलदीप बग्गा, दिल्ली; डॉ. महीपसिंग, दिल्ली, श्री. जनक दवे, सुरत, श्री. परेश शर्मा, गोहाती; प्रा. शंकर पुणतांबेकर, जळगाव; प्रा. पं. या. तरफदार, सेलू; श्री. श्रीनिवास जोशी, पुणे; श्री. माणिकलाल परदेशी, पुणे; श्री. हरिनारायण व्यास, पुणे; श्री. लालजी उपाध्ये, पुणे; डॉ. मो. दि. पराडकर, मुंबई, प्रो. मा. रा. मोहळकर, मुंबई; प्रा. अशोक कामत, पुणे; श्री. ग. वा. करमटकर, पुणे; श्री. गो. प. नेने, पुणे.

**साहित्य चर्चा मंडळ :** गुरुवार, दि. २१ नोव्हेंबरच्या बैठकीत डॉ. मु. श्री. कानडे (पुणे विद्यापीठ) यांनी 'प्राचीन कवी आणि त्यांचा मराठीचा स्वीकार' या विषयावर टिपण वाचले व नंतर त्यावर चर्चा झाली.

**व्याकरणकार कै. मोरो केशव दामले जन्मशताब्दी :** मराठी व्याकरणकार कै. मोरो केशव दामले यांची जन्मशताब्दी परिषदेने विशेषप्रकारे साजरी केली. जन्मशताब्दीच्या दिवशी दि. ७ नोव्हेंबरला प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर (स. प. महाविद्यालय) यांचे 'कर्तरी दामले आणि कर्मणी दामले' या विषयावर डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झाले. २४ नोव्हेंबरला दुपारी 'मराठी व्याकरणात संयुक्त क्रियापदे' या प्रा. अर्जुनवाडकरलिखित टिपणावर एक परिसंवाद झाला. परिसंवादाचे अध्यक्ष डॉ. द. न. गोखले होते. परिसंवादात पुढील व्यक्तींनी भाग घेतला. डॉ. प्र. न. जोशी, प्रा. अ. गं. मंगरूळकर, श्री. प्र. शं. जोशी, आचार्य वि. प्र. लिमये, डॉ. अशोक केळकर, प्रा. भीमराव कुलकर्णी, श्री. सु. बा. कुलकर्णी, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. शं. रा. दाते.

●●●

अनुक्रमणिका

